२३ वर्षात
८ राज्यस्तरीय
पुरस्कार व
४ आंतरराष्ट्रीय
पुरस्कारप्राप्त
दीपावली अंक

मुल्य रु. ४५/-

दीपावली विशेषांक २०१७

# उल्हास प्रभात

संपादक: गुरुनाथ पांडुरंग बनोटे

## उद्योग जगतातील उगवता तारा

दिपावलीच्या हार्दिक शुभेच्छा...

**प्रसाद गो. परब** शिवसेना शहरप्रमुख, वांगणी शहर

# साईप्रभात इंटरप्रायझेस

**साईकृपा**
प्रो. प्रसाद परब
बिल्डर्स अँड कॉन्ट्रॅक्टर

**साईप्रतिक इंटरप्रायझेस**
जमिन, एन.ए. प्लॉट, फ्लॅट खरेदी विक्रीसाठी संपर्क साधा

पत्ता : साई विसावा बंगला, परब कंपाऊंड, डोणे रोड, वांगणी (प.) फोन: ऑ. ०२५१-२६६००३१/४१, मो. ९८२२२७१२४१




# नेरळ विकास परिवर्तन आघाडी

## ग्रामपंचायत नेरळ

## सरपंच सौ. सुवर्णा सुधाकर नाईक

सदस्य

मंगेश रा. म्हस्कर, नितेश शाह, प्रथमेश मोरे, सुनिता हजारे, अनिता भालेराव, राजेश मिरकुटे, सदानंद शिंगवा, सुवर्णा राजू मोरे, अश्विनी पारधी




मुलांची सततची चिडचिड, अभ्यासात लक्ष न लागणे, केलेला अभ्यास विसरणे, परिक्षेची भिती वाटणे, आळस-कंटाळा येणे तसेच मनावरील व शरिरावरील ताणतणाव घालविण्यासाठी लवकरच सुरु होत आहे नियमित बॅच

संपर्क

ए/ १२-१३, नामदेव प्लाझा, मांजर्ली चौक, बदलापूर (प.) जि. ठाणे ४२१५०३

**९२८४८ ९९४१९**


दीपावली विशेषांक २०१६


दीपावली विशेषांक २०१५


दीपावली विशेषांक २०१४


दीपावली विशेषांक २०१३

## २३ वर्षाची दिवाळी अंकाची परंपरा


दीपावली विशेषांक २०१२


दीपावली विशेषांक २०११


दीपावली विशेषांक २०१०

स्थापना
१-६-१९९४

# उल्हास प्रभात

वर्ष २३
ई-आवृत्ती

दीपावली विशेषांक २०१७

न्यू दिल्ली रजि.नं. RNI NO.MAHMAR/2002/10557

कार्यकारी संपादक: सुगंधा गुरुनाथ बनोटे    संपादक: गुरुनाथ पांडुरंग बनोटे

## अंतरंग

**प्रत्येक घरा-घरात, आपल्या जीवनात क्षणा-क्षणाला उपयोगी पडणाऱ्या, माहितीचा आम्ही या अंकात समावेश केला आहे.**

**महिला, पुरुष, मुले-मुली, तरुण-तरुणी, लहानांपासून ते वयस्करांपर्यंत प्रत्येकाने वाचावा असा उपयुक्त अंक.**

# उल्हास प्रभात दीपावली विशेषांक २०१७

## अंतरंग



## काव्य प्रभात



**याशिवाय आरोग्य विषयक माहिती, मेनू, टिप्स, विनोद, चांगले विचार आणि बरेच काही...**


| सहाय्य | मुखपृष्ठ | टाईप सेटिंग | रंगीत सजावट |
|---|---|---|---|
| सावळाराम जाधव | बदलापुर येथील निमेश जनवाड | सौ. सुगंधा गुरुनाथ बनोटे | भाई जाधव |

अंतर्गत सजावट : कु. गौरव गुरुनाथ बनोटे, कु. सौरव गुरुनाथ बनोटे

हे साप्ताहिक मालक, मुद्रक, प्रकाशक व संपादक गुरुनाथ पांडुरंग बनोटे यांनी प्रिया ऑफसेट, प्रेस बाजार, साईबाबानगर, उल्हासनगर ३, ता.उल्हासनगर, जि. ठाणे. ४२१ ५०३. महाराष्ट्र. येथे छापून, ३ ओमकार दत्त अपार्टं, वाणी आळी, कुळगांव, बदलापूर (पू.) ता.अंबरनाथ, जि. ठाणे.४२१ ५०३ महाराष्ट्र येथून प्रसिध्द केले.



फोन : ९२७०१७५४१३ / ९८५०५६४५६५

ई-मेल: ulhasprabhat30@gmail.com / banotegp@gmail.com

कार्यालय : गाळा न. ए / १२,१३ नामदेव प्लाझा, मांजर्ली चौक बदलापुर (प.) ता. अंबरनाथ, जि. ठाणे ४२१ ५०३. महाराष्ट्र. संपर्क : ३ ओमकार दत्त अपार्टं, वाणी आळी, कुळगांव, बदलापूर. (पू.), ता. अंबरनाथ, जि. ठाणे.४२१ ५०३. महाराष्ट्र. कायमचा पत्ता : मु.पो.काराव, वांगणी, ता. अंबरनाथ, जि. ठाणे. ४२१ ५०३ महाराष्ट्र.

दीपावलीच्या हार्दिक शुभेच्छा!



**सौ. रुपाली संदिप बनोटे**

सदस्य : ग्रामपंचायत काराव

# आयुष डेव्हलपर्स

**काराव**

**श्री. संदिप बनोटे**

संपर्क : मोबा. ९८२२८९६५१५



**समृध्दी यावी सोनपावली**
**उधळणं व्हावी सौख्याची**
**भाग्याचा सर्वोदय व्हावा**
**वर्षा व्हावी हर्षाची**
**इंद्रधनुष्याचे रंग फुलावेत**
**शुभेच्छा ही दिपावलीची!**



# राजू पाटील



**दीपावलीच्या हार्दिक शुभेच्छा!**



# *DEEPALI BUILDSCAPES*



**श्री. स्वामी दारविन**



**वनरुम किचन, टू रुम किचन उपलब्ध.**

**ऑफिस:**६, विवेकानंद आर्केड, धन्वंतरी हॉस्पीटल जवळ, स्टेशन रोड, बदलापूर (पू.) जि. ठाणे. **संपर्क: 806668344**

शुभ दिपावली

# गुरुमंत्र

सुखी जीवनाचा यशस्वी मार्ग

मोटिवेशनल गुरु

## श्री. गुरुनाथ बनोटे

मनी मॅग्नेट | संमोहन | वास्तुशास्त्र | रेकी | अॅक्युप्रेशर | योगा

## उपाय, उपचार व क्लास

मुलांची चिडचिड आणि अभ्यासात लक्ष न लागणे, केलेला अभ्यास विसरणे, परिक्षेची भिती वाटणे, आळस-कंटाळा येणे तसेच मनावरील आणि शरिरावरील ताण-तणाव घालविण्यासाठी लवकरच सुरु होत आहे विद्यार्थ्यांसाठी नियमित बॅच

संपर्क

ए/१२-१३, नामदेव प्लाझा, गांजली चौक, बदलापूर (प.)
भ्रमणध्वनी: ९२८४८९९४१९




# संपादकिय....

## नवे वर्ष

यावर्षीही दिवाळी अंकात जाहिरात देऊन जाहिरातदारांनी दाखविलेल्या
सहकार्याबद्दल प्रथम मी सर्वांचे आभार मानतो आणि
सर्वांना दिपावलीच्या हार्दिक शुभेच्छा देतो!

प्रत्येक वर्षाची येणारी दिवाळी म्हणजेच नविन वर्ष होय. दरवर्षी नविन वर्ष आनंदात आणि सुखा-समाधानात जावा अशीच तुम्हा आम्हा सर्वांची इच्छा असते. यावर्षीदेखील आपण हिच प्रार्थना या कर्ता-करविल्या चरणी करुयात!

आमच्या सर्व वाचक, हितचिंतक आणि जाहिरातदार यांच्या सहकार्यामुळेच बाजारात शेकडो नव-नविन दिवाळी अंक येत असताना आम्ही २३ वर्ष सातत्याने टिकून आहोत. ते केवळ आमच्यावर प्रेम करणाऱ्या आपल्यासारख्या थोरा-मोठ्या व्यक्तींमुळेच! दीपावलीच्या शुभ दिनी उल्हास प्रभातचा २३ वा दीपावली विशेषांक आपल्या हाती देताना आम्हाला अतिशय आनंद होत आहे. मात्र यावर्षी आम्हाला अनेक जाहिरातदारांना दिवाळी अंकात जाहिरात देण्यासाठी नकार द्यावा लागला. कारण उशीरा आलेल्या जाहिराती छापता येत नाहीत. आणि अंकालाही उशीर करता येत नाही. वेळेत अंक काढणे यालाच आम्ही प्राधान्य देत असून त्यामुळेच अनेक जाहिरातदारांना नाईलाजास्तव आम्हाला नकार द्यावा लागतो. त्याबद्दल आम्ही दिलगिरी व्यक्त करतो.

आमच्यावर सर्व वाचक, हितचिंतक, जाहिरातदार, वितरक आणि साहित्यिक यांनी दाखविलेल्या विश्वासाला आम्ही कधीही तडा जाऊ देणार नाही. दिवाळी निमित्त आमच्या या सर्व वाचक, हितचिंतक, जाहिरातदार साहित्यिक आणि वितरक यांना ही दीपावली सुख,समृध्दी,आनंदी आणि भरभराटीची जावो हिच ईश्वर चरणी प्रार्थना!



संपादक
गुरुनाथ पांडुरंग बनोटे






# आयुष पेंटस्

एशियन पेंटस्चे
अधिकृत
डिलर

कॉम्प्युटराईज्ड् २५ हजार कलर शेड बनवून मिळतील.
वॉटर प्रुफिंगची कामे करुन मिळतील.

प्रो.प्रा. बाळासाहेब मस्के




शॉप नं. ४, श्री साई श्याम को. ऑप. हौ. सोसा. लि., घोरपडे चौक, एम.आय.डी.सी.रोड, कात्रप, बदलापूर (पू)
फोन: ०२५१-२६९१००० मोबा.: ७७०९७६६९६



दिपावलीच्या हार्दिक शुभेच्छा





श्री. अनिल शिवराम भगत
मा. नगरसेवक कु.ब.न.प.



सौ. सुवर्णा सुनिल भगत
मा. नगरसेविका कु.ब.न.प.



श्री. सुनिल शिवराम भगत
नगरसेवक, मा. बांधकाम सभापती कु.ब.न.प.




# आई मी जिजाऊ होणार

- प्रा. महंमद शेख
म्हसळा, जि. रायगड

आई मी, मुलगी म्हणून जन्माला आल्यानंतर घरातील सर्वाचे चेहरे काळवंडलेले, सर्वानी माझे दु:खी अंत:करणाने स्वागत केले. असे तूच मला सांगितले. माझ्या जन्माची बातमी समजल्यावर घरात जिलेबी वाटण्यात आली. पण आई मुलगी जन्मल्यानंतर जिलेबी किंवा बर्फी का वाटतात? आई म्हणाली, अग जिलेबी किंवा बर्फी या पदार्थाचा उल्लेख व्याकरणातील ती या शब्दाने केला जातो. म्हणून मुलगी जन्माला आल्यानंतर जिलेबी किंवा बर्फी वाटण्याची परंपरा समाजाने रुढ केली आहे.

पण आई, मुलगी झाल्यानंतर पेढे वाटले तर काय अनर्थ होईल. नुकसान होणार नाही गं! पण पुरुष प्रधान समाजाला कोण समजावून सांगणार? स्त्रियांनी समाजाचे नितिनियम पाळायचे असतात. तोडायचे नसतात. पुरुषांनी समाजाचे नियम मोडले तरी चालतात. आई जिच्या हाती पाळण्याची दोरी ती राष्ट्राचा उध्दार करी असे म्हटले जाते मग, मी ज्या पाळण्यात आहे त्या पाळण्याची दोरी तुझ्या हाता आहे व मी पाळण्यात आहे म्हणजे राष्ट्राचा निश्चितच उध्दार झाल्याशिवाय राहणार नाही. अगं, तुझ्या जन्मानंतर घरातील तो पाळणा घराच्या छताला टांगून ठेवला आहे. म्हणजे आई माझ्या जन्मानंतर घरात मुलच जन्माला आले नाही काय गं? तू ज्या पाळण्यात होतीस तो पाळणा अशुभ मानून त्याला छताला टांगला आहे. तुला पांढऱ्या पायाची म्हणून हिणवले जात असताना मला काही दिवसानंतर पुन्हा दिवस गेले. पुन्हा घरातील वातावरण गंभीर बनले. पण त्या काळात गर्भलिंग परिक्षण बंदी कायदा नव्हता. तुझ्या वडिलांनी मला दवाखान्यात नेले. दवाखान्यात माझे गर्भलिंग परिक्षण करण्यात आले. डॉक्टरांनी सांगितले पोटात मुलाची वाढ होऊ लागली आहे.

घरातील सर्वाना आनंद झाला. सर्वजण तुझे कौतुक करु लागले. पण आई माझे कशासाठी कौतुक केले जाऊ लागले? आई म्हणाली अगं, तुझ्या पायगुणामुळेच घरात मुलगा जन्मला येणार अशी प्रत्येकाची भावना झाली. आई मी तर पांढऱ्या पायाची आहे ना? अगं समाजाची हिच तर गंमत आहे. मला मुलगा झाला. घरातील सर्वाना आनंद झाला. तू आजपासून त्याला दादा म्हणायचे. आई तो तर माझ्यापेक्षा लहान आहे.

आई म्हणाली, तो लहान असला तरी तो दादा आहे. दादाच म्हणत जा समजलं. बाईच्या जातीने जे सांगितले आहे तेवढेच ऐकावे आणि करावे. हळू-हळू माझा दादा मोठा होवू लागला. त्याला शाळेत पाठविण्याची चर्चा घरात होवू लागली. मला नगरपालिकेच्या प्राथमिक शाळेत पाठविण्यात आले आणि माझ्या दादाला इंग्रजी माध्यमाच्या शाळेत पाठविण्याचे आई वडिलांनी ठरविले. मी म्हटले मला पण इंग्रजी माध्यमाच्या शाळेत पाठवा नां. आई लगेच डोळे वटारुन म्हणाली, तुला शिकवून आमचा काय फायदा होणार आहे? तुझा दादा आपल्या घराचा आवक आहे. म्हणून आपण सर्वांनी त्याला आवक दादा म्हणायचे. दादाला आवक दादा का म्हणायचे असा प्रश्न माझ्या मनात निर्माण झाला. आई म्हणाली, अगं दादाच्या रुपाने आपणाला हुंडा, दागदागिने, सन्मान सगळे काही आवक करता येणार आहे तो आपल्या वंशाचा दिवा आहे.

दुसऱ्या दिवशी मी नगरपरिषदेच्या शाळेच्या वर्गात गेले. वर्गात मुले-मुली एकत्र होती. पण मुलांच्या पाठीमागे सर्व मुली बसल्या होत्या. मी बाईना म्हटले मला मुलांच्या पुढे बसायचे आहे. बाईनी माझ्याकडे रागाने डोळे वटारुन पाहिले. त्यावेळी माझ्या लक्षात आले की, स्त्रीच स्त्रीची शत्रु आहे. बाईनी वर्गातील फळ्यावर सुविचार लिहिला होता. स्त्री पुरुष समानता हीच भारतीय संस्कृतीची महानता. हा सुविचार वाचल्यानंतर समाजाच्या व बाईच्या वर्तनातील विसंगती मला जाणवली. वर्गाच्या भिंती बोलक्या होत्या. भितीवर राजमाता जिजामाता, सावित्रीबाई फुले, इंदिरा गांधी, कल्पना चावला, झाशीची राणी लक्ष्मीबाई यांच्या प्रतिमा पाहून माझा ऊर भरुन आला. आई माझ्या मनात क्षणभर विचार आला. आम्हा स्त्रियांना इतक्या महान कर्तबगार स्त्रियांचा वारसा लाभला असताना आज आम्हा स्त्रियांचे जीव उपेक्षित का बनू लागले आहे.?

आई आमच्या शाळेत १५ ऑगस्टला ध्वजारोहणासाठी आपल्या गावच्या सरपंच सौ. भारती काकू यांना बोलाविण्याचे ठरविण्यात आले. ध्वजारोहणासाठी सरपंच आल्या पण आपल्या गावातील सर्व पुरुषांनी १५ ऑगस्टच्या कार्यक्रमावर बहिष्कार टाकला. एका स्त्रीने फडकविलेल्या राष्ट्रध्वजाला आम्ही वंदन करणार नाही असे म्हणत सर्व पुरुष उठून गेले. आई आपल्या देशात पंतप्रधान इंदिरा गांधींनी लाल किल्ल्यावर २६ जानेवारी, १५ ऑगस्ट रोजी सुमारे १६-१७ वर्षे या देशाचा तिरंगा फडकविला. आपल्या गावातील पुरुषांनी भारतीकाकूंना विरोध करणे योग्य आहे का? सर्व राजकिय पक्ष व नेते स्त्रियांना केवळ आपला स्वार्थ साधण्यासाठी राजकारणात आणतात असे मला वाटते. माझे विचार ऐकून आई मला म्हणाली, अगं, अजुन पुरुष प्रधान समाजाची मानसिकता बदललेली नाही. आई माझ्या वर्गातील एका मुलीचे नाव नकुसा आहे. मला नकुसा या नावाचा अर्थ सांग ना. आई म्हणाली, अग नकुसा म्हणजे नको असताना जी जन्माला येते ती नकुसा. एक दिवस नकुसा शाळेत रडू लागली. तिला रडण्याचे कारण विचारले तर ती म्हणाली माझ्या आई-वडिलांना व डॉक्टरांना तुरुंगात टाकले आहे. नकुसाच्या आईने डॉक्टरांच्या मदतीने पोटात असणारा मुलीचा गर्भ पोटातच मारुन स्त्रीभ्रुण हत्या केली होती.

आई एके दिवशी शाळा तपासण्यासाठी शिक्षणाधिकारी शाळेत आले. शिक्षणाधिकारी माझ्या वर्गात आले. आम्हाला त्यांनी विविध प्रश्न विचारले. मला म्हणाले तू कोण होणार? मी पटकन उत्तर दिले मी जिजाऊ होणार. बाळ तू जिजाऊ का होणार? असे शिक्षणाधिकाऱ्यांनी मला विचारले. आई मी म्हटले आपल्या देशाला महासत्ता घडविण्यासाठी घराघरात शिवबा निर्माण व्हावेत म्हणून आज जिजाऊची आवश्यकता आहे. म्हणून मी जिजाऊ होणार. माझे उत्तर ऐकताच शिक्षणाधिकारी माझ्याकडे आश्चर्याने पाहत वर्गाच्या भिंतीवर असलेल्या कर्तबगार पराक्रमी स्त्रियांच्या प्रतिमामध्ये माझी प्रतिमा शोधू लागले.




- धनाजी जनार्दन बुटेरे
मु. पोई, ता. कल्याण,

गणपतराव देशमुख, प्रतापराव सरनौबत, काशिनाथ पवार पुर्वीचे कॉलेजमधील जीवलग मित्र. तिघांनी आकाशात उडण्याची स्वप्न पाहिली. पण ते त्यांना जमले नाही. तिघे मुंबईतच राहतात. गणपतराव देशमुख, बोरीवलीला प्रतापराव बांद्र्याला तर काशिनाथ दादरला. तिघे कॉलेज जीवनापासूनचे यार. कॉलेजमध्येच त्यांची मैत्री फुलली. आणि येथेच ते जीवाभावाचे मित्र झाले. आयुष्याच्या आठवणी देवून कॉलेजमधून बाहेर पडले. आधी मध्ये भेटीगाठी होत. मग भेटीगाठी विरळ होत गेल्या. मात्र मनात एकमेकांच्या मैत्रिचा दीप सदैव तेवत होते. पुढे स्वतंत्र जगत राहिले.

दादर रेल्वे स्टेशनजवळ आय.डी.एल. च्या गल्लीत बघ्यांची गर्दी जमली होती. एक साठीचा इसम एका भय्याबरोबर तावातावाने भांडत होता. प्रतापराव त्याच बघ्यांपैकी एक. भांडणाऱ्या इसमाचा आवाज प्रतापरावांच्या ओळखिचा वाटला. म्हणून प्रतापराव बघ्यांना सारत गर्दीतून पुढे आले. नजर थोडी अंधुक झाली होती. डोळ्यावरचा चष्मा काढला. धोतराच्या सोग्याने चष्मा साफ केला. आणि भैय्याबरोबर भांडणाऱ्या व्यक्तीकडे नीट निरखून पाहिले. त्याची खात्री झाली. त्याचा आनंद गगनात मावेनासा झाला. ते तसेच पुढे झाले आणि म्हणाले गणप्या लेका लहान मुलासारखा काय भांडतोस, लेका भांडणाची तुजी सवय अजुन गेली नाही लेका? गणपतराव अचंबित झाले. या आलम दुनियेत या गणपतरावाला एकेरी नावाने हाक मारणारा इसम कोण? भैय्या बरोबर भांडायचे सोडून त्यांनी समोरच्या म्हाताऱ्याकडे एक नजर टाकली आणि भांडण तसेच अर्ध्यावर सोडून तो तसाच प्रतापरावाला बिलगला. बघ्यांचा रसभंग झाला. भांडणाचा शेवट न होताच भांडण अर्ध्यावर सुटलं.

"पत्त्या अरे दोस्ता गड्या कस रे ओळखलस या म्हाताऱ्या






"दोस्ताला ?" अरे म्हातारा झाला म्हणून काय झाले, भैय्या बरोबर भांडायची सवय नाही गेली अजून दोस्ता. "तुझ्या या भांडण्याच्या सवयीमुळे अेळखलं, दोस्त को दोस्त ना पहेचाने ओ दोस्ती ही क्या."

दोघांनी उरभेट घेत एकमेकांना अलिंगन दिले. दोघांचे डोळे पानावले. कितीतरी वेळ ते एकमेकांच्या मिठीत विसावले होते. आणि डोळ्यात दोघांच्याही भूतकाळ डोकावू लागला. ३० वर्षापुर्वीचे ते दादर रेल्वे स्टेशन, प्लाटफार्म क्र.३ वर इंडीकेटरखाली एक लाकडी बाक होता. त्या बाकावर बसून तासंतास गप्पा मारायचे. त्याच प्लाटफार्मवर दोघे हातात हात घेऊन बसले होते. पुर्वीचा लाकडी बाक जावून त्याठिकाणी स्टील बाक आला होता. त्याच बाकावर बसून ते जुन्या आठवणींना उजाळा देत होते. पत्या लेका खूप आठवण यायची तुझी, आणि काशाची पण, १२-१३ वर्ष लोटली असतील पण कुठेच पत्ता नाही. दोस्ता डोळ्यांची पारणे फिटली बस्स आज खुप खूष आहे. स्वर्ग मिळाले दोस्ता बस्स आता काशा भेटला की झालं. गणप्या मी ही शोधायचो तुम्हाला, पण हाती काहीच लागत नव्हतं रे दोस्ता, फार हिरमुसळा व्हायचो. या बाकावर किती वेळ येवून बसायचो. पण सारे व्यर्थ, जावू दे. काशाची पण आठवण येते रे, गणप्या मी ही शोधायचो पण सारे मुसळ केरात कसा विसरु दोस्ता तुम्हाला. आणि प्रतापराव शांत झाला. त्याचे डोळे पाण्याने भरले.

बरं जाऊ दे सारे, फार वर्षांनी भेटतोस घरची कशी आहेत ? आईबाबा कसे आहेत ? आणि मुले रे किती ? वहिणी कशी आहे ? प्रतापराव हवरटासारखा प्रश्न विचारु लागला. त्यावर शून्य नजरेत पाहत गणपतराव उद्गारले सारे क्षणभंगुर मित्रा सारे क्षणभंगुर. तु आणि काशा सोडलास तर आता माझ्याकडे काहीच नाही. हताशपणे गणपतराव उद्गारला. काहीच नाही म्हणजे ? म्हणजे मित्रा आई-बाबा गेलेले १०-१२ वर्ष उलटली. मला २ मुले शिकून खूप मोठे झाले अगदी आभाळा एवढे. एक अमेरिकेत तर दुसरा जपानला. जी गेली कार्टी ती अजुन आलीच नाही. अगदी आईच्या चितेला अग्नी द्यायला सुध्दा आली नाही. या गणपतराव देशमुखाने दोन मुलं जीवंत असताना स्वत:च्या पत्नीला स्वत:चे हाताने मुखाग्णी दिला. बायको गेली आणि सारं हरवलं मित्रा. मोठा बंगला आहे मुलांचा. पण ते घर खायला उठतय. म्हणून बोरीवलीच्या जुन्या चाळीत परत राहायला आलो. प्रेमाचा शब्द आणि प्रेम दोघांनी माझ्या बरोबर वैर पत्करलं. आहे. म्हणून प्रेमासाठी फिरत असतो. पाय नेतिल तिकडे जातो. म्हातारा बाप कसा एकटा राहत असेल, काय खात असेल याची जराही चिंता नाही कारट्यांना. त्यांना वाटतय दोन चार पैशाची पुडकी म्हाताऱ्याच्या उरावर फेकली की झालं संपलं. आपलं कर्तव्य, पैशाने सारं मिळतय हेच पोरांना ठाऊक आहे. जगण्यासाठी थेरड्यांना प्रेम पण लागतंय हे कुठे त्यांना माहित. गणपतरावांच्या डोळ्यातून गंगायमुना अखंड वाहत होत्या. मित्राचा हात खांद्यावर होता. त्यांना खूप दिवसाचं रडायचं होतं. पण रडायला आपलं माणूस हवं होतं. आज प्रतापरावांच्या रुपाने तसा माणूस मिळाला होता. प्रतापरावांच्या रुपाने त्यांना मायेचा माणूस भेटला होता. म्हणतात ना मायेला माया घासल्या शिवाय रडायला येत नाही. आज प्रतापरावांच्यापुढे तो मन मोकळ करत होता. भळभळती जखम वाहू देत होता. पत्या दोन नातू पण एकाचं दर्शन नाही. गणपतराव हमसून हमसून रडत होते. चष्मा काढून धोतराच्या सोग्याने डोळे पुसले. आणि म्हणाले अस्सं सारं आहे. तुझीच तेवढी मायेची उब शोधत होतो. एक दीर्घ

श्वास सोडून गणपतराव भानावर आले. आणि पुन्हा म्हणाले, मीच काय ते पाप केले जाऊ दे! भोग भोगतोय दुसरं काय? तुझं काय कुशल ना? गणपतरावांनी विचारलं.

कसल कुशल. तुझ नि माझं सारखच बघ. माझा ही एक मुलगा आहे. खूप मोठा साहेब झालाय, आकाशात भराऱ्या घेतोय. पैशाची गंगा वाहते, सुनबाई नोकरदार, दोघांचा पगार अधिक वरची कमाई म्हणजे लोकांच्या माना पिरगाळायच्या, त्यात घरात सासू सासरे आणून ठेवल आहेत. आणि जन्मदात्या बापाला रस्त्यावर काढले आहे. घराबाहेर? गणपतरावांनी आश्चर्य चकित होऊन विचारले. हो घराबाहेर काढले आहे. म्हणे त्याच्या आलेल्या पाहुण्यांशी मी चांगला व्यवहार करत नाही. त्यांना मी पिटाळतोय, त्यांचे पाहुणे कोण रे पैसे देवून आपली काम करणारी माणसे. गरीब बिचारी असतात मी सांगतो याला पैसे देऊ नका. माझे विचार पटले तर ती जातात निघून त्याचा राग हा माझ्यावर काढतो. मी आहे स्वाभिमानी. ही मानसिक गुलामगिरी नको वाटली. आणि सोडले घर पाय नेतिल तिकडे जातो. वरचा देईल ते खातो आणि जेथे छप्पर असेले तेथे झोपतो.

पण गड्या साहेबा सारखा राहतोस? गणपतराव म्हणाले. त्याचं काय आहे, कार्ट्यानं दोन नंबरची खूप माया जमवली आहे. बस्स थोडा हात मारला. जास्त नाही पाच लाख आहेत या थैलीत. अरे पत्या कुणाला सुगावा लागला तर तोही तुझ्यासारखाच हात मारील. अरे गणपत या कलकट मलकट थैलीकडे कोण पाहते. आणि नेले तर नेले कुणाच्या बापाचे रे, हा प्रतापराव सरनोबत कुणाच्या मर्जीवर जगत नाही, तो स्वत:च्या हिंमतीवर जगतो. बरं दोस्ता सर्व जगात जा ही कार्ट्याची औलाद सारखीच, जाऊ दे काशा कधी भेटला का? गणपतराव. अरे हो बोलण्याच्या भरात काशीनाथचं विचारायचं राहून गेले. हो काशीनाथ भेटतो काय?प्रतापराव. काशीनाथला खूप शोधलं पण त्याचा काय मागमूस लागत नाही बघ.

दादरला आलो की न चुकता ३ नंबरवर जाऊन येतो. तेथे बसतो. तासंतास त्याची वाट पाहतो. जराही दिसत नाही दोस्त कधी. मग हिरमुसळा होऊन परत येतो. पत्या बरं झाल तुला घराबाहेर काढले चल मला ही आधार हवा होता. तुझ्या रुपाने तो आधार मिळाला आता मस्त राहू दोघे. उडत गेली रे ती पोरं गणपतराव अल्लड मुलासारखा म्हणाला. आज दोघं मनसोक्त बोलले.एकत्र जेवण केले. काशीनाथ पवार च्या शोधात विरारफास्ट पकडून विरार गाठले. प्रवासात सुख दु:खाच्या गप्पा-टप्पा झाल्या, मागिल आठवणी काढल्या गेल्या. पण काशिनाथ पवार सापडला नाही. मग दोघे गणपतरावाच्या घरी गेले. रात्र एकत्र घालविली. भूतकालाच्या पाठीवर स्वार होऊन मस्त भटकून आले. बऱ्याच दिवसांनी दोघं ही स्वतंत्र काय ते अनुभवत होते. रात्री ठरले उद्या काशिनाथ पवारला शोधायचं. आता काशिनाथची शोधमोहिम सुरु झाली. कारण काशिनाथ जुन्या घरी राहत नव्हता. त्याने घर बदललं होतं. मग नित्याची भेटीची ठिकाणे, उद्याने, बागा, नाना नानी पार्क, चौपाटी, सारं फिरुन झाले त्याचवेळी दादर मधिल सर्व ठिकाणी जाऊन पाहिली. मग मामलेदार कचेरीतून मतदार यादी घेऊन काशिनाथचं घर गाठले. पण तो घरात नव्हता. शेजारी चौकशी केल्यावर समजले. काशिनाथ कर्जत जवळ एका वृध्दाश्रमात दिवस कंठित आहे. दोघांनी मित्राच्या ओढीने कर्जत गाठलं. काशिनाथची भेट झाली. तीन यार मिळाले. तिघे ही कृतकृत झाले. ऊरभेट

झाली. गप्पा झाल्या. गप्पांमध्ये काशिनाथची करुण कहाणी कळली. त्याला एक मुलगा मुलाचा चांगला उद्योग, सुन ही पैसेवाली बक्कड पगाराची नोकरी. दोघेही बाहेर मग काशिनाथला कोण सांभाळणार. म्हणून त्याची रवानगी वृध्दाश्रमात झाली. त्यात तो मधुमेहाचा रुग्ण, एक हृदयविकाराचा झटका येऊन गेलेला. अशा अवस्थेत बेट्याने त्याला येथे सोडले. बरं सोडले तर सोडले पण सहा महिने पोराचं दर्शन नाही. आलाच तरी फ्लाईंग व्हिजीट. काशिनाथ मरणाची वाट पाहतोय. पण ते ही येत नाही. काशिनाथची बायको बाळंतपणात गेली सावत्र आई कडून छळ होईल म्हणून त्याने दुसरे लग्न नाही केले. त्यातच फळ म्हणून की काय? काशिनाथ मरण यातना भोगत होता.

पोरा म्हाताऱ्यांना जगायला पैसे लागत नाही. त्यांना मायेची उब लागते. कहाणी सांगता सांगता काशिनाथ ढसाढसा रडत होता. रडत-रडतच आपले दु:ख ओकत होता. बऱ्याच दिवसापासून कोणाला तरी सांगावं असं सारखं वाटत होतं. आज तुम्ही भेटले आणि मन मोकळं झालं. पोराला पहायला जीव असुसला रे पण नाही येत इकडे. पुढे त्याला काहीच सांगता आले नाही. अरे धत् त्या पोरांच्या, उडत गेली रे ती पोरं काशा प्रतापराव कळवळला. काशा तुझ्यापेक्षा आमचे काही वेगळं नाही. गणपतराव म्हणाले. म्हणजे गणप्या, काशिनाथ म्हणाला, म्हणजे तुझ्यासारखेच आम्हीपण फेकलेले बाप आहोत.प्रतापराव उद्गारले.

अरे काशा या जगात सगळी कार्टी सारखीच रे फक्त पैसा आणि बायको या पलीकडे कोणतचं नातं नाही. बैल म्हातारा झाला की कसाबाला कापायला विकतात., गाय भाकड झाली की, उकीरड्यावर सोडतात. आयुष्यभर मालकाचे ओझे वाहणारा गाढव म्हातारे झाले की मरायला त्याला ही वळचणीला सोडतात. आणि आई-बाप म्हातारे झाले की हीच दिडदमडीची कार्टी जन्मदात्या आई-वडिलांना वाऱ्यावर सोडतात. गणपतरावाच्या जिभेवरचा ताबा सुटला. काशिनाथ दोस्ता चल, अरे किती जगायचं हे फेकलेले आयुष्य. लोकांनी लाचारिने दिलेले हे जीवन. कुत्रे ही आपले पोट भरतात. गिधाडेही सडलेले मास खाऊन वाऱ्यावर स्वार होतात. मग आपल्याला जगायला ही कार्टी का लागतात. चल मित्रा ही मायाची मुंबई नगरी फार आफाट आहे. येथे पोट भरायला असंख्य येतात. आणि पोट भरतात. चल मित्रा आमच्याबरोबर या प्रतापने त्याच्या मुलाचा बंगला लाथाडलाय आणि ४० वर्षापुर्वीच्या चाळीत राहायला आलाय. चल तिघे एकमेकांचा आधार होऊ. कुत्र्यासारखं किती जगायचं. त्यांनी भू म्हटले की आम्ही भुंकायचे, त्यांनी छू म्हटले की पळायचे आणि त्यांनी फेकलेल्या तुकड्यावर जगायचे. चल आमच्याबरोबर तेथे फक्त आपण तिघे आसू.

तिघे मुंबईच्या दिशेने निघाले. आज पुन्हा ते जुन्या दोस्तीचा अनुभव घेत होते. तिघांच्या चेहऱ्यावर एक वेगळा समाधान होता. आपली माणसं भेटल्याचा आनंद चेहऱ्यावर वाहत होता. जाता-जाता ठरले सर्व बंधन झुगारुन द्यायची आणि मोकळं जीवन जगायचं जे आयुष्यात केले नाही ते करायचे. जे शरिराला बाधक ते खायचे, जीवनाचा मनमुराद आनंद घ्यायचा. तिघांचं पक्क ठरलं. रात्री उशिरापर्यंत पार्टी रंगात आली होती. गोड, तिखट, तळलेले सर्व पदार्थांची चंगळ होती. दारु विदेशी, देशी सर्व प्रकार होते. दारु प्यायल्यावर माणसं मनातील बोलतात ते आज सारं मनातील ओकत होते. डोळ्यात आसवांची गर्दी झाली होती. प्रत्येक जन आपली करुण कहाणी सांगत होता. आसवांना वाट मोकळी करुन देत होता. तिघे आज हमसून हमसून रडले. ग्लासावर ग्लास रिचवले. तसे तिघे ही न पिणारे पण आज तिघे ही यारी निभावत होते. मध्यरात्र उलटून गेली होती. तरी पार्टी रंगली होती. आणि दोन दिवसांनंतर वर्तमानपत्रात बातमी आली. तिन वयोवृध्दांनी एकत्र आपली जीवन यात्रा संपविली.



# भावनांचा ओलावा आटला का?



- शशिकांत काळे
डहाणू

१०० वर्षापुर्वी जेव्हा मोठ्या प्रमाणावर औद्योगिकरण झालेले नव्हते त्या वेळी बहुसंख्य समाज शेतीवरच अवलंबून होता. शेती उत्पन्न हेच एकमेव साधन असल्याने एकत्र कुटुंब पध्दती अनिवार्यच होती. बलुतेदार जरी बिगर शेतीमध्ये असले तरी त्यांची कामेही शेतीवरच अवलंबुन होती. दोघांनाही एकमेकांची गरज होती. त्यामुळे एकमेकांना सांभाळून घेतले जात होते.

औद्योगिकरणामुळे गावातील तांत्रिक कामे करणाऱ्यांची गरज कमी झाली. त्याचबरोबर त्यांचे शहरात स्थलांतर झाले. शहरामधील उद्योगांमध्ये तंत्रकुशला बरोबर अंगमेहनत आणि कारकुनी कामासाठी स्थलांतर झाले. स्थिरस्थावर झाल्यानंतर त्यानी त्यांचे संसारही शहरामध्येच थाटले. आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र झालेली हि पिढी नुसतीच त्यांच्या कुटुंबापासून दूर गेली नाही तर त्यांचे कुटुंबावरील अवलंबीत्वही कमी झाले. शेतीकाम, सणावारासाठी गावी परतणे म्हणजे नुसताच रोजगार बुडत नव्हता तर प्रवास खर्चाची फोडणीही बसत असे. तरीही पुर्वी संस्कारामुळे हि पिढी नियमीतपणे गावाला घरी जात होती. ती आमच्या वडिलांची पिढी होती. आम्हा मुलांना शहरी वातावरण राहिल्याने ती ओढ वाटत नाही. आजही परदेशात स्थिर झालेल्या पहिल्या पिढीला आपल्या गावाची, जुन्या घराची ओढ वाटते. पण ती ओढ दुसऱ्या, तिसऱ्या पिढीला वाटत नाही. हा अनुभव आहे.

एकमेकांमध्ये गुंतून जाण्यासाठी एकमेकाचा सहवास व त्याच बरोबर अवलंबित्वही कारणीभूत असते. जस जसे अवलंबित्व कमी होत जाते तसतशी भावनिक गुंतवणूकही कमी होत जाते. घर हेच विश्व असणारे बालक आई-आजी यांच्या बरोबर गुंतलेले असते. कारण त्या स्त्रीया त्याच्या

शारिरीक तसेच बौध्दीक गरजा पुऱ्या करतात. क्षुधा शांतीसाठी आईची गरज भासते. तर बौध्दीक गरज आजी गोष्टी वगैरे सांगून पुरी करत असते. पण मुल जेव्हा शाळेत जावू लागते. तेव्हा त्याची गुंतवणूक आई-आजी ऐवजी मित्र, शिक्षक यांच्यामध्ये विभागली जाते. कॉलेजमध्ये घरापेक्षा मित्राचीच ओढ जास्त वाटते. कारण ते नुसतेच समवयस्क नसतात तर ते त्यांच्या उत्साहालाही प्रोत्साहित करीत असतात. त्या पुढील काळात हीच भावनिक गुंतवणूक पती/पत्नी, मुले ह्या मार्गाने करीत असते. हे नैसर्गिक सत्य आहे. तरीही पुर्वीच्या काळी एकमेकांची विचारपूस फक्त कुटुंबापुरतीच नव्हे तर इतर गावकऱ्यांचीही विचारपूस केली जात असे. अगदी गाडीमधल्या शेजाऱ्याचीही विचारपूस कौटुंबिक माहितीही आवर्जुन केली जात असे. कारण वेळ प्रसंगी त्याचीच मदत होत असे. आधुनिक सोयींमुळे एका फोनवर संरक्षणापासून सर्व सेवा, वस्तु उपलब्ध होत असल्याने शेजाऱ्यांचीही गरज भासत नाही. आज हे अवलंबित्वच कमी झाल्यामुळे दुसऱ्यांशी संपर्क ठेवण्याची गरजही वाटत नाही.

शहरीकरणाबरोबर शिक्षण, पाश्चात्य विचार सरणी त्याच बरोबर येणारे व्यक्ती स्वातंत्र्याचे विचार यांनी ही आपला पगडा बसवायला सुरुवात केलेली होती. शहरातील स्थलांतरीत तरुण वर्ग कमावता आणि स्वावलंबी झाल्यामुळे वडिलधाऱ्या व्यक्तींच्या जोखडा खालुन मुक्त झाला. उलट गावाकडील शेतीसाठी असणोर मनुष्यबळ कमी झाल्याने आई-वडिलच मुलांवर अवलंबून राहत होते. समाज सुधारणेच्या वावटळीखाली सामाजिक बंधने कोलमडून पडली होती. समाजापेक्षा व्यक्ती श्रेष्ठ गणली जाऊ लागली. सामाजिक बंधन ही संकल्पनाच आपण मोडित काढली. साहजिकच व्यक्ती समाजापासून वेगळी झाली. हल्ली तर मुलांच्या अजाणत्या वयात त्याला स्वतंत्र खोली, मोबाईल, टीव्ही सारख्या वस्तु दिल्या जातात. मग ते मुल कुटुंबापासून तुटले तर त्यामध्ये आश्चर्य नाही. फेसबुक, व्हॉटस्प सारख्या माध्यामातून ही मुले असंख्य मित्र जोडत असतात. पण त्यातले खरे मित्र कोणीही नसतात. कारण ते सर्वजण आभासी जगातच राहणारे असतात. आपल्या समोरच्या व्यक्तीबरोबर चालू असलेला संवाद अर्धवट सोडून शेकडो मैलावरील व्यक्ती बरोबरच्या संभाषणाला प्राधान्य देणारा तो मोबाईल फोन अशी माझी मोबाईल फोनची व्याख्या आहे.

ज्याकाळी स्त्रिया शिकलेल्या नव्हत्या, आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी नव्हत्या त्या काळात त्या घर सांभाळत असत. घर म्हणजे घराची चार भिंतीची वास्तु नव्हे तर घरातील, कुटुंबातील व्यक्तीला सांभाळण्याचे मोठे काम त्या पिढीने केलेले आहे. नातेसंबंध जपणे, आचरणामधून संस्कार करणे, सहयोगाचा आदर्श ठेवणे. भावी पिढीवरील संस्कार करण्यामध्ये त्या स्त्रीयांचा १०० टक्के सहभाग होता हे मान्य करावेच लागेल. आज स्त्रिया शिकल्या, अर्थार्जनासाठी घराबाहेर पडल्या.आर्थिक स्वातंत्र्या बरोबर आचार, विचार स्वातंत्र्यही उपभोगू लागल्या. हे सर्व घरात बसून होणारे नव्हते. परिणामी घर ही संकल्पनाच मोडीत निघाली आहे. आजचे घर म्हणजे प्रशस्त वास्तु. घरातील आणि परिसरातील सुखसोयी तसेच गरज म्हणून जेवायला, झोपायला जागा झालेली आहे. म्हणूनच रोज किमान एक तरी जेवण एकत्र घ्या असे सांगावे लागत आहे. ह्या आधुनिक घरात घराला घरपण देणारी माणसे राहत नाहीत. कारण ती घराला घरपण देणारी माणसे सदासर्वदा घराबाहेरच असतात. आईकडे, आजीकडे त्या संस्कारक्षम वयामध्ये काऊ चिऊचा घास भरवायला वेळच नसतो. ते मुल घरात येते. टेबलावरचे झाकून ठेवलेले गार अन्न खाते. हॉटेलमध्ये ही त्याला गरम अन्न मिळते. पण घरी मात्र थंडगार अन्नावरच त्याला त्याची भूक भागवावी लागते. आणि हे सर्व त्याच्या भावी उन्नतीसाठीच होत असते. निदान त्याला तरी तसे ऐकवले जाते. त्याच्या भावनाही अन्नासारख्या थंडगार पडत जातात.

भावनांचा ओलावा टिकवण्यामागे घरात राहणाऱ्या स्त्रियांचे योगदान अगदी १०० टक्के होते. त्या काळातही ही पुरुष वर्ग सर्वसाधारणपणे घराबाहेरच राहत होता. संसारामध्ये त्याचा वाटाही नगण्यच होता. आता घरात राहणारी स्त्री घराबाहेर पडलेली आहे. त्यामुळे ती संस्कार करणारी भावनांचा ओलावा जपणारी यंत्रणाच बंद पडलेली आहे. यामागे स्त्रीचे स्वातंत्र्य, स्त्री विकास यांना दोष देण्याचा उद्देश नाही. पण सद्य परिस्थितीचे अवलोकन करणे हा आहे. समाज बदलाचे चक्र उलटे फिरवता येणार नाही. हे अशक्य आहे. स्वातंत्र्य मिळविण्यासाठी बळीदानाची त्यागाची आवश्यक असते. असे म्हणतात. आज आपण परस्पर सुसंवाद, भावनाचा ओलावा यांचा त्याग करुन व्यक्ती स्वातंत्र्याची किंमत मोजत आहोत.

दिपावलीच्या

हार्दिक शुभेच्छा...

**सौ. स्नेहा अविनाश पातकर**

माजी नगराध्यक्षा
माजी नगरसेविका, कुळगांव-बदलापूर नगरपरिषद

**श्री. अविनाश दत्तात्रय पातकर**

माजी नगरसेवक
कुळगांव-बदलापूर नगरपरिषद

जनसंपर्क कार्यालय

ओंकारेश्वर सदन, गांवदेवी रोड, अनंतनगर, कुळगांव-बदलापूर (पूर्व) जि. ठाणे- 421 503
मो. 9822218391



# ग्लॅमरची क्रेझ

- राजेंद्र वैद्य
कल्याण (प.)

तिच्या ॲकॅडमीच्या ग्राऊंड फ्लोअरपासून तिसऱ्या मजल्यापर्यंत रांगा लागल्या होत्या. रांगेत सर्व मुलीच होत्या. सगळ्याच्या डोळ्यात उत्सुकता ओसंडत होती. रंगीत फुलपाखरासारख्या त्या युवती इंटरव्ह्यूसाठी अधीर झालेल्या. व्हीडिओ कॉन्फरन्सीने तसे प्रत्येकीचे इंटरव्ह्यू झालेले होते. इंटेलिजन्सी टेस्टमध्ये मेरिटला आलेल्या मुलीच प्रत्यक्ष मुलाखतीसाठी आज आल्या होत्या. आज त्यांच्या नशिबांची परीक्षा होती. कुणी डोळे मिटून रांगेत उभे राहिल्या-राहिल्या आपल्या देवाचं स्मरण करत होत्या. कुणी गळ्यातल्या ताईत दोन्ही डोळ्याला लावत होत्या. तर कुणी उभ्या उभ्या पोथी वाचत होत्या. कुणी खांद्याना स्पर्श करुन येशूची आळवणी करत होत्या. एखादी गुडघे टेकून अल्हाचं स्मरण करत होती. हे सारं कशासाठी इटरव्ह्यू पास होण्यासाठी बहुतेक जणींनी एक गोष्ट आवर्जुन केली होती ती म्हणजे छातीला, कमरेला एकदम टाईट कपडे. जे झाकायचं ते उघडं करुन दाखवण्याची स्पर्धाच लागलीय असं येणाऱ्या जाणाऱ्या लोकांना वाटत होत. कुणा बरोबर फ्रेंडस् आले होते कुणाबरोबर भाऊ, कुणाबरोबर प्रियकर तर कुणाचा नवरा सोबतीला आला होता. बरेच तरुण त्या रांगेच्या अवती भोवती रेंगाळत होते. हपापल्या नजरेनं त्या सुंदरीचं यौवन, लावण्य, नखरा न्याहाळत होते. मुलींच्या चौपट गर्दी भोवताली जमलेली होती. शेवटी आयोजकाना पोलिस बंदोबस्त ठेवावा लागला.

पण हा प्रकार काय होता? हे होते मॉडेल घडवणाऱ्या क्लासमध्ये इन्स्टिट्यूटमध्ये ॲडमिशन घेण्यासाठीची धडपड. शुभ्रा एक नामांकित मॉडेल होती. तिने कुभम डान्स ॲकॅडमी काढली होती. कुभमचा अर्थ होता. कु म्हणजे कुचिपुडी, भ म्हणजे भरत नाट्यम आणि म मणिपुरी तिन्ही प्रकारची नृत्ये या कुभम नृत्यालयात शिकवण्यात येणार होती. यासाठी काही लाख रुपये फी होती. रांगेतल्या मुली हुरळून गेल्या होत्या. अमुक नट, बॉलिवुडचे अमुक व्यक्ती आत इंटरव्ह्यूला आली आहे. म्हणजे एक्झमिनर म्हणून त्या ॲट्रॅक्टिव्ह पर्सोनेलसना बघण्याची घाई प्रत्येकीला झाली

होती. आज ॲटिट्यूड आणि फिगरची टेस्ट होती. काही तरुणींना हे माहित होतं एवढ्यात एक मुलगी आतून बाहेर आली तिने सांगितलं. आत कपडे उतरावे लागतात. झालं या विषयावर रांगेत खळबळ माजली. कुणी रांग सोडून बाहेर पडल्या तर कुणी हे काय ह्या विचारात पडल्या. तोकड्या कपड्यातल्या मुली पूर्ण पोषाखातल्या मुलींना डोळ्याने हिणवू लागल्या. मॉडेल बनना हे, तो उसमे क्या शर्म है, मै तो उतारुंगी एक जण बेशकपणे म्हणाली.

मॉडेल शुभ्रा मॉब पासून दूर राहाव म्हणून सगळं मॅनेज करुन बाहेर देशात गेली होती. तर तिची अलका सगळं कामकाज पाहत होती. अलका वगळता कमिटीत पाच सहा पुरुषच होते. दिवसभर इंटरव्ह्यूच्या राऊंडस् चालु होत्या. अलक कॅंडिडेसच्या प्रश्नानी वैतागली होती. तिने रात्री आठच्या सुमारास अंदाज घेतला अजून किती रांग आहे. दोन-तीन मुली होत्या. अलकाला बरं वाटलं.

मै, अंदर आ सकती हू? बाहेर स्वर आला. येस कम इन प्लीज अलका उद्‌गारली. मॅडम आपका नाम? स्वरा, स्वरांजली मी मराठी आहे. त्या मुलीने उत्तर दिलं. कमिटी मेंबर्सनी काही प्रश्न विचारले. स्वराने उत्तर दिली. न डगमगता तिने कमिटीला विचारल. तुम्ही मुलींची निवड नृत्य शाळेत प्रवेश देण्यासाठी करताय की डान्सबारमध्ये मुली पाठवायच्या आहेत म्हणून. तू असं का विचारतेस अलकाने विचारले. नृत्य शाळेसाठी तुम्हाला मॉडेल बनण्याचं शिक्षण दिलं जाणार आहे. नाच शिकण्यासाठी कपडे काढायची गरज का? सगळे अवाक झाले. त्या युवतीची निवड केल्याचं अलकाने तिला तावडतोब सांगितलं. आणि वरच्या मजल्यावर घरी जायला निघाली. आता ती खूप थकली होती. ती थेट बेडरुमकडे वळली. तिने बेडरुमच दार बंद केलं. एसी सुरु केली. गादीवर स्वत:ला लोटून दिलं. डोळे बंद केले आणि अचानक तिला पुर्वीच्या आठवणी येऊ लागल्या. स्वराची बेडर नजर तिला घाबरवत होती. ती स्वत: तिच्या धाडसी प्रश्नानं आंतर्बाह्य हादरली होती. आणि याच तरुणपणातल्या अविचारी वागण्याने तिचा जीवनपट विस्कळीत झाला होता. तिला आयुष्यात खूप दगाबाजी सहन करावी लागली. स्वत:च्या वेड्या आंकाक्षेपुढे लाचार व्हाव लागलं होतं. स्वरानं डान्सबार हा शब्द उच्चारला आणि तो कानावर पडताच तिला अस्वस्थ वाटू लागलं. मिटलेल्या डोळ्यापुढे तिचं मागील आयुष्य एकेका घटनेसहित गरगर गिरक्या घेत होतं. एक वळणावर तिचा घात झाला होता.

अलका मुलची दार्जिलिंगची राहणारी. एका सुखवस्तू, खानदान श्रीमंत घरातली सुस्वरुप सुंदर मुलगी तिने मागावं आई-वडिलांनी ते द्यावं असं तिच बालपण आणि तारुण्यकाळ गेलं. तिच्या वडिलांचा दार्जिलिंग हे पर्यटन स्थळ असल्याने लॉजिंग बोर्डीगचा व्यवसाय होता. शिवाय दार्जिलिंग एक्सप्रेस नावाची कंपनी होती. टुरिझमचा व्यवसाय या नावाने चालायचा. अलकाकडे श्रीमंती नांदत होती. अलका लहानाची मोठी झाली. कॉलेजला जाऊ लागली. डोंगर उतारावर चहाच्या मळ्यात मुंबईच्या सिनेमाचं शुटिंग आहे असं कॉलेजमध्ये समजलं. योगायोगाने सिनेमावाले त्यांच्या लॉजमध्ये उतरले. अलका आनंदाने वेडी झाली. तिला लहानपणापासून सिनेमा बघण्याचं वेड त्यात घरीच सिनेसृष्टी उतरली. ती लॉजमध्येच रेंगाळू लागली. त्या लोकाचं बिनधास्त वागणं,एकमेकाला कडकडून मिठ्या मारणं वगैरे-वगैरे तिला खूप आवडत असे. त्यातच तिला रस वाटण्याच तिच वय होतं. ते सिनेमातले तरुण पुरुष मंडळी अलाकडेच बघायचे. गोड गोड बोलायचे. तू सिनेमात येशिल का? विचारायचे. अलकाला खूप आनंद होई. एका तरुणाने तिला खूप वेड लावलं सिनेमाचं शुटिंग झालं. ते लोक परतीच्या प्रवासाला लागले. अलका हिरमुसली. खिन्न झाली. तिला चैन पडेना. तिने स्वत:ला आरश्यात पाहिलं. तिची तिलाचा ती आवडली. काही दिवस ती गप्प राहिली आणि एक दिवस एका टूर अँड ट्रॅव्हल्सच्या गाडीबरोबर मुंबईला पळून आली. बरोबर खूप पैसे आणले होते. ती नटी होण्याची स्वप्न पाहत मुंबईत आली. चित्रपटाच्या वेडापायी कशाचीच तिला फिकीर वाटत नव्हती. तिने मुंबईतले अनेक स्टुडिओ पालते घातले. तिच्या घरच्या

लॉजवर ज्या सिनेमाचे लोक आले होते तो सिने स्टुडिओ तिने शोधून काढला. तिला मनातून हवा असलेला तरुण भेटला. ती एका लॉजवर उतरली होती.

तिने सिने इंडस्ट्रीतल्या माणसावबरोबर ओळखी वाढवल्या. पुन्हा पुन्हा ती त्यांना भेटू लागली. त्या मुलाला लॉजवर बरोबर घेऊन जाऊ लागली. इंडस्ट्रीतल्या आणि त्या तरुणाच्या म्हणजे रणबीरच्या स्पर्शातून तिला एक कळलं की आपली फिगर खूप सुंदर आहे. आपल्याला ह्या भांडवलावर खूप पैसा मिळवता येईल. बघता-बघता ती रणबीरच्या प्रेमात पडली. तिने रणबीरशी लग्न करुन शांत-सुखी संसार करावा, सहजीवन आनंदात घालवावं असा विचार केला होता. त्या वयात तसे विचार स्वाभाविक होते. तिने रणबीरशी सुखी संसाराची स्वप्न पाहिली पण त्याने चार दिवस मौज केली. सर्व स्वप्नांचा चुराडा झाला. जशी अलका एका वळणावर भलत्यात वाटेवर गेली तशीच ती एका वळणावर भानावर आली. ती सावध झाली. ह्या फसव्या दुनियेत अर्थ नाही. हे तिला उमगलं. तिने गावाचा रस्ता धरला वडिलांची क्षमा मागितली. त्यांनी मुंबईला तिला पुढील शिक्षणासाठी पैसे देण्याचे आश्वासन दिलं. ती मुंबईला परत आली व बी.ए. एल. एल. बी. एल.एल.एम झाली. अधुन-मधून आरसा तिच्या रुपाची प्रशंसा करायचा आणि तिची अवस्था दोलायमान व्हायची. पण ते क्षणापुरतच. तिने मुंबई हायकोर्टात वकिली सुरु केली. ती अत्यंत हुशार होती. तिला डान्सबारचं आकर्षण होतं. ते आता परिवर्तित झालं. आणि तिने हॉटले अँड बार असोसियनशी संपर्क साधला. अत्यंत हुशारीने ती डान्स बारमधल्या मुलींच्या केसेस लढू लागली. डान्स बार संबंधात किडनॅपिंग, रेप, मर्डर या केसेस येत असत. प्रत्येक केसमध्ये अलका प्रखर लढा देत असे.

अलकाने लग्न केलच नाही. पण तिला इथे राहताना सोबतीची गरज वाटू लागली. त्यापेक्षा तिला मातृत्व ही कल्पना स्वस्थ बसू देईना. तिने लग्न न करण्याचा आपला निर्णय आई-वडिलांना कळविला. एका बारवालेला झालेल्या मुलीला तिने कायदेशीर प्रक्रिया पूर्ण करुन दत्तक घेतलं. ती एक गोंडस मुलगी होती. ती अनैतिक संबंधातून झालेली कुमारी मातेची मुलगी होती. ती मुलगी आपले आपत्य सांभाळू शकत नव्हती. तर अलकाला कुमारिका असताना आई बनण्याची इच्छा होती. तीच अनाथ बालिका म्हणजे शुभ्रा. शुभ्रा इंजिनिअर झाली. पण तिला नोकरीचे पाश नको होते. तिला कलेला वाहून घ्यायचं होतं. त्याप्रमाणे तिने नृत्य कला आत्मसात केली. आणि डॉन्स अॅकेडमी उघडायचा निर्णय अलकाला सांगितला. त्याप्रमाणे आज मुलाखती झाल्या. शेवटची मुलाखत झाली ती स्वराची. स्वराच्या प्रश्नाला कृतिने उत्तर द्यायचं अलकाने ठरवलं. तिचा मराठमोळा पण गोड चेहरा अलकाला रात्रभर दिसत होता. तिने सकाळी स्वराला फोन लावला. स्वरा मी चेअरमन मिसेस अलका बोलत्येय. तुला माझी विनंती आहे तू या फंदात पडू नकोस. मी तरुणपणी ग्लॅमरला भुलले, भरकटले तुला नोकरीची गरज असेलच तर मी तुला नोकरी देते. पण सिनेमा, मॉडेल हे खूळ डोक्यातून काढून टाक. आणि आज मला भेट. वेळीच शहाणी हो माझ्या शुभ्राचही मी कौसिलिंग करत्येय. तुला मी डीसकन्टेक्ट करत्येय असं नाही. पण मॅडम तुम्ही असं का म्हणताय? पलिकडचा प्रश्न. अगं मी तेच थोडक्यात सांगितलं. आणि जे सत्य आहे ते सांगितलं. तू धीट आहेस, हुशार आहेस पण ह्या क्षेत्रात दिखाव्याला, पैश्याला किंमत आहे. पण स्टेबिलिटी नाही. चार दिवसाची मजा आणि आयुष्यभर सजा असा प्रकार आहे. अलकाने पुन्हा मन उलगडून आणि मनापासून सांगितलं.

पण मॅडम ते कपड्याचं? स्वराचा पुन्हा प्रश्न. अग मुली ते खोटं आहे. आपण स्वत:शी प्रामाणिक राहिलं आणि वेळीच सावध झालं. चार हात दूर राहिलं तर काहीही वेडवाकडं घडत नाही. ती एक अफवा उठवली होती. पण तू माझ्या सांगण्याचा विचार कर.अलकाने फोन ठेवून दिला. तीन चार दिवस निघून गेले अलका स्वराला विसरुनही गेली. तिच्या कोर्टाच्या कामात गुंतून गेली. मे आय कम इन मॅडम? अलका केस स्टडी करण्यात मग्न होती. अचानक कानावर आलेल्या प्रश्नाने तिची लिंक तुटली. ती म्हणाली एस कम इन. समोर स्वरा उभी होती. "ये स्वरा काय झालं". तुझं नक्की? अलकाने विचारलं. होय मॅडम मला सिलेक्शनचं लेटर द्या आणि फी सांगा किती भरु ते. मी अॅकॅडमी जाईन करणार आहे. अलका तिच्या निर्णयाने चकित झाली. तिच्याकडे पाहत राहिली. ज्याचं करावं भलं तो म्हणतो माझंच खरं. अलकाला नवल वाटल की आज मुली वाटेल ते करायला धजावत आहेत. मी एवढं समजावलं पण ही मुलगी ऐकत नाही.

## मेनु

### आलु चाट

साहित्य : पाव किलो लहान बटाटे, एक मोठी वाटी दही, एक चमचा जिरेपूड, अर्धा चमचा पुदीना पावडर, दोन उभ्या चिरलेल्या मिरच्या, दोन मोठे चमचे चिंचेची चटणी व हिरवी चटणी, एक बारीक चिरलेला कांदा, एक लहान चमचा चाट मसाला, दोन मोठे चमचे तेल, चवीनुसार मीठ.

कृती : पाण्यात थोडे मीठ टाकून बटाटे उकडून घ्यावेत. साल काढून काट्याने त्यांना थोडे टोचे द्यावे. किंवा तुकडे करावे. कढईत तेल टाकून बटाटे गुलाबी रंग येईपर्यंत परतून घ्यावे. दुसऱ्या कढईत एक चमचा तेल टाकावे. त्यात जिरे, पुदिना टाकून त्यात बटाटे सोडावेत. परताना त्यात मीठही मिसळावे. थंड झाल्यावर चाट मसाला टाकावा. प्लेटमध्ये हे बटाटे घेऊन दह्यात कांदा, हिरवी मिरची व हिरवी चटणी मिसळून हे मिश्रण बटाट्यावर टाकावे. वरुन चिंचेची चटणी टाकून खायला द्यावे.




# उद्योगजगतातील उगवता तारा निमेश जनवाड

-नरेश इंगावले
naresh.ingawale@gmail.com
mob.7744844923

परदेशात राहणाऱ्या भारतीय नागरिकांच्या मागणीनुसार सणासुदीच्या अनेक गोष्टी आपल्या देशातील वेगवेगळ्या भागातून जात असतात. मग त्यात गणपती असो, नवरात्री-दसरा असो किंवा दिवाळी असो त्या गोष्टी तिथे मिळाल्यावर तिथल्या नागरिकांचा प्रत्येक सण आनंदात साजरा होतो. परदेशी भारतीयांचा आनंद द्विगुणित करण्याचे काम चिंतामणी क्रिएशन या संस्थेचे मालक निमेश प्रभू जनवाड या तरुणाने केले आहे. व पुढेही करत राहणार आहे. परदेशातील नागरिकांच्या घरोघरी बदलापूरच्या सहा महिला बचत गटांनी रंगवलेल्या दिवाळीच्या विविध आकाराच्या पणत्या यावर्षी परदेशात प्रकाशणार आहेत.

निमेश जनवाडचा शाळकरी मुलगा ते यशस्वी उद्योजक हा प्रवास सोपा झाला नाही. त्यासाठी त्याने काय-काय केले, कशी मेहनत घेतली. त्याला या प्रवासात कोणी-कशी मदत केली याची माहिती घेतली पाहिजे. निमेशचा जन्म मुंबईतील कुर्ला या ठिकाणी १९९२ रोजी झाला. तिथे त्याचे पाचवीपर्यंत शिक्षण झाले. तो सहावीत असताना त्याचे कुटुंब बदलापूरमध्ये राहण्यास आले. हे जनवाड कुटुंब मुळचे महाराष्ट्र कर्नाटक सीमेवरील एका गावातील मध्यमवर्गीय कुटुंब. त्यावेळी त्याच्या कुटुंबाचा दिवाळी पणत्या-दिवे रंगवून-सजवून विकण्याचा व्यवसाय सुरु होता. निमेशने सहावीलाच या व्यवसायात आपले पहिले पाऊल टाकले. त्यावेळी हा व्यवसाय फक्त मुंबई पुरताच मर्यादित होता. एकीकडे शाळा शिकत असताना निमेश व्यवसायातील बारकावे माहित करुन घेत होता. चढउतार पाहत होता. बारावीपर्यंत निमेशला व्यवसायातले खाचखळगे बऱ्यापैकी उमगले होते. बारावीनंतर व्यवसायात दुसरा टप्पा सुरु झाला.

हा व्यवसाय वाढविण्यासाठी कुटुंबातील जाणकार म्हणजे त्याचे मामा, बहिण, आजी यांचं त्याला मार्गदर्शन होतं. तो मुंबई आणि आजुबाजूच्या परिसरात सर्व सुपर मार्केट्स, राजकारणी-पुढारी, छोटे, मोठे दुकानदार, कॉर्पोरेट ऑफिसेस,



सरकारी ऑफिसेस या ठिकाणी जाऊन त्यांना कन्व्हेन्स करत होता. मार्केटिंग करत होता. निमेशची हॉटेल मॅनेजमेंट क्षेत्रात जाण्याची इच्छा होती. पण जास्त फीमुळे त्या इच्छेवर पाणी फिरलं. त्यामुळे नैराश्य आलं. काय करावं हे नक्की होत नव्हतं. नंतर पुर्णपणे विचार करुन त्याने आपल्या कुटुंबाचा हा व्यवसाय पुढे नेण्याच्या दृष्टीने तयारी सुरु केली. ती म्हणजे चिंतामणी क्रिएशन संस्थेची स्थापना होय. पण हे इतक्या सहजा-सहजी झाले नाही. डिसेंबर २०१२ च्या दरम्यान विक्रोळीतील ब्लूमा एनर्जी या कंपनीत सुरक्षा रक्षकाची नोकरी केली. ७०००/- रुपये पगार होता. तिथे दोन-तीन शिफ्टमध्ये काम करुन ५०,०००/- रुपये जमवले आणि त्याच पैशात त्याने बदलापूरच्या भारत कॉलेजमध्ये बिझनेस मॅनेजमेंट कोर्सच्या पहिल्या वर्षाची फी भरली. कॉलेज सुरु झाले. पण दोन वर्षाचा गॅप पडल्यामुळे अभ्यासात गती येत नव्हती. इथेच त्याला मनाली भेटली. तिने त्याला अभ्यासात खूप मदत केली. निमेशने पहिल्या वर्षी ५३ % दुसऱ्या वर्षी ६५ % आणि तिसऱ्या वर्षी ६३% गुण मिळवून हा कोर्स पुर्ण केला.

हा कोर्स पुर्ण झाल्यानंतर नोकरीसाठी भटकंती सुरु झाली. कुठे रिसेप्टनिस, तर कुठे क्लार्कची नोकरी असा ७-८ महिने प्रवास चालु असताना कुटुंबाच्या व्यवसायाची तळमळ चालु होती. कामाच्या ठिकाणच्या बॉसेस-मालक लोकांना पाहून आपणही बॉस होऊ शकतो का? असं मनात यायचं. त्याच वेळी आपला घरचा व्यवसायातच आपण काहीतरी भरीव कामगिरी करायची हे नक्की केलं. इथुनच निमेश आणि चिंतामणी क्रिएशन संस्थेची बाटचाल सुरु झाली. छोट्या-मोठ्या एक्स्पोर्टस लोकांच्या भेटी घेतल्या. अनेकांना कन्व्हेन्स करत होता. त्यातूनच वाशीच्या पुजन इंटरप्रायजेस या कंपनीने २०१५ साली पहिली संधी दिली. त्यांच्या मदतीने इतर एक्स्पोर्टस लोकांची ओळख झाली. त्यातील काहींनी निमेशला ऑर्डर दिल्या. या सर्व ऑर्डर्स चिंतामणी क्रिएशनच्या नावाने घेतल्या गेल्या. चांगली पॅकिंग, सुंदर डिझाइन्स, आकर्षक रंगसंगती, कुठेही मोडतोड नाही, डॅमेज नाही यामुळे पुजा इंटरप्रायजेसप्रमाणे इतरही एक्स्पोर्टसचा विश्वास बसला. यामुळे नवी उमेद निर्माण झाली. या प्रवासात जोडीला मनाली होतीच. २०१६ साली स्थानिक पातळीवर ह्या व्यवसायात चांगलाच जम बसला. २०१७ उगवलं आणि निमेश अर्थात चिंतामणी क्रिएशनच्या आयुष्यात महत्वाचा टर्निंग पॉईंट आला. व्यवसायासाठी महत्वाचा असलेला कॅटलॉग बनवला. त्यात गणपती मुर्ती, गरबा, दाडिंया, दिवाळी पणत्या, शोभेचे दिवे, पुजेची थाळी, रांगोळी या संबंधीचे फोटो लावण्यात आले. गरज म्हणून लॅपटॉप घेतला. आकर्षक ब्रोर्शस छापण्यात आली. हे सर्व साहित्य घेऊन अनेक एक्स्पोर्टर्सच्या भेटी घेतल्या. यावेळी काहींनी सकारात्मक प्रतिसाद दिला. तर काहींनी नकारात्मक. हळूहळू चांगल्या कंपन्यांची कामं मिळाली. लोकांचा विश्वास बसला. याचवेळी मार्केटमधुन दुबईचे मसाला किंग धनंजय दातार यांचा इमेल आयडी मिळाला. त्यांान टीव्हीवर अनेक कार्यक्रमातून पाहिलं होतं. त्यांचे विचार ऐकले होते. निमेशने त्यांना सर्व माहिती मेल केली. जानेवारी २०१७ च्या तिसऱ्या आठवड्यात धनंजय दातारांचा दुबईहून फोन आला. लवकरच भेटण्याचं ठरलं त्याप्रमाणे फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्यात दातारांच्या वाशी ऑफिसमध्ये भेट झाली. दोन ते तीन तास झालेल्या या भेटीतच दातारांनी गणपती मूर्ती, नवरात्री गरबा, दांडिया, दिवाळी पणत्या, दिवे अशा विविध गोष्टीची ऑर्डर दिली. एक लाखाचा ॲडव्हान्सही दिला. ही ऑर्डर एप्रिलमध्ये पूर्ण केली. त्यांच्याशी जुनमध्ये पुन्हा भेट झाली. त्यात गणपतीसाठी ८५ थर्माकोल मखर्सची ऑर्डर मिळाली. ती मखर्स जुलैला दुबईला पाठवली. अशाप्रकारे निमेश अर्थात चिंतामणी क्रिएशनचा सातासमुद्रापार व्यापार सुरु झाला.

याचप्रकारे अनेक एक्स्पोर्ट क्षेत्रातील संजय कुलकर्णी, परिमल ठक्कर, किर्तीकुमार पटेल, विपुल दोशी, देवेंद्र भाई, शेखर तेलवणे, जनार्दन भाई, रोहन अटल, योगेश शेलार, प्रमोद भौर, शेखर भाई या व्यक्तींनी मोलाचे सहकार्य केल्याचे निमेश आर्वजुन सांगतो. भविष्यात नवे क्रिएशन्स, प्रिटिंगच्या जोरावर जगभरात चिंतामणी क्रिएशनचं नाव झळकवायचं आहे. सर्वांशी नुसतं व्यावसायिकच नाही तर चांगल



नातं निर्माण करायचयं. चिंतामणी फाऊंडेशन ही समाजसेवी संस्था निर्माण करुन या संस्थेच्या अंतर्गत बदलापूर परिसरातील खेड्यापाड्यातील गरीब लोकांपर्यंत पोहचून त्यांच्यासाठी सामाजिक सहकार्य व रोजगार देण्याचा प्रयत्न करणार असल्याचे निमेश सांगतो. याच दरम्यान १८ जुलै २०१७ रोजी निमेश आणि मनाली आयुष्यभरासाठी एकमेकांचे जोडीदार झाले.

गणेशोत्सवाची जय्यत तयारी सुरु झाली. मूर्तिकारांची लगबग सुरु झाली. परदेशातही गणेशोत्सवाचे वेध लागले आहेत. महाराष्ट्रातील अनेक ठिकाणांहून गणेशमूर्ती परदेशात जात असतात. बदलापूरसारख्या छोट्या सांस्कृतिक शहरातही परदेशातून गणेशमूर्तींची मागणी दिवसेंदिवस वाढत आहे. यावर्षी अमेरिका, ऑस्ट्रोलिया, दुबई, मॉरिशस, कॅनडा, बँकॉक या ठिकाणी शाडूच्या व प्लास्टर ऑफ पॅरिसच्या मिळून १५०० मूर्ती बदलापूरहून पाठवण्यात आल्या. चिंतामणी क्रिएशन या संस्थेच्या निमेश जनवाड या २३ वर्षीय तरुणाने ही कमाल केली आहे. बदलापूरच्या अनिल पंतोजी व सचिन चोणकर या दोन मूर्तिकारांनी निमेशला मोलाचे सहकार्य केले आहे. वेगवेगळ्या आकाराच्या २५० प्रकारच्या शाडूच्या व पीओपी (प्लास्टर ऑफ पॅरिस) च्या आठ इंचापासून अडीच फुटांपर्यतच्या मूर्तींचा समावेश यात आहे. सर्व मूर्तींना पाण्याचे रंग वापरले आहेत.



चिंतामणी क्रिएशनने अमेरिकेला २५०, ऑस्ट्रोलियाला ३२५, दुबईला ३७५, मॉरिशसला २२५, कॅनडाला १२५, बँकॉकला १२० पीओपीच्या गणेशमूर्ती पाठवल्या आहेत. या सर्व मूर्ती एप्रिलपासून पाठवायला सुरुवात होते. जूनच्या शेवटच्या आठवड्यात शेवटची मूर्ती रवाना झाली. या मूर्तीची ऑर्डर डिसेंबरमध्ये मिळाली होती. चिंतामणी क्रिएशनची पॅकिंग पध्दती एकदम अनोखी आहे. मूर्तीच्या आकाराप्रमाणे इनर बॉक्स बनवला जातो. त्यात बबल रॅपने पूर्णपणे गुंडाळलेली मूर्ती ठेवली जाते. मूर्तीच्या खाली आणि चारही बाजुंना १५ एमएमची थर्माकॉलची शीट ठेवली जाते. नंतर मूर्तीभोवती थर्माकोलच्या तुकड्यांनी इनर बॉक्स भरला जातो. जर मूर्ती



१८ इंचापेक्षा कमी असेल तर असे दोन इनर बॉक्स एका मोठ्या कोरोगेटेड बॉक्समध्ये खाली-वर आणि चारही बाजुंनी थर्माकोलची शिट टाकून तो बॉक्स पॅकिंग टेपने सीलबंद केला जातो. १८ इंचापेक्षा मूर्ती मोठी असेल तर कोरोगेटेड बॉक्समध्ये एकच इनर बॉक्स ठेवला जातो.

निमेश जनवाड याने २०१५-१६ मध्ये बिझनेस मॅनेजमेंटची डिग्री मिळवलेली आहे. शिवाय घरचा दिवाळी डेकोरेटिव्ह दिव्यांचा ३० वर्षापासूनचा व्यवसाय आहे. त्यात वयाच्या १२ वर्षापासून त्याने लक्ष घातले आहे. तो सांगतो दुबईची गणेशमूर्तीची ऑर्डर अनपेक्षित मिळाली. तिथले मसाला किंग धनंजय दातार यांना दिव्यांच्या ऑर्डरसाठी वाशी कार्यालयाला भेटलो असता त्यांनी गणेशमूर्तीबाबत विचारणा केली आणि दोनच दिवसात त्यांची ऑर्डर मिळाली.

बदलापूरमधून चिंतामणी क्रिएशन या संस्थेने अशाच प्रकारच्या सणासुदीच्या गोष्टी उदा. शाडूच्या गणेशमूर्ती, नवरात्रीसाठी लागणारे गरबा (मटका) दिवाळीसाठी लागणारे अनेक प्रकारचे दिवे अमेरिका, ऑस्ट्रोलिया, दुबई, मॉरिशस, कॅनडा, दक्षिण आफ्रिका, बँकॉक या देशात रवाना होत असतात. सध्या चालू असलेल्या नवरात्रीसाठी लागणारे गरबा मातीचा मटका विदेशात रवाना झाले आहेत. त्याचबरोबर दसरा-दिवाळीसाठी लागणारे अनेक प्रकारचे दिवेही पाठवण्यात आले आहेत. यात साधे दिवे, अखंड दिवा, लक्ष्मी-गणपती दिवे, दिवाळी शो-पीस, शो-दिवे, पूजा थाळी, रंग-रांगोळी १०० किलो, मेणाच्या पणत्या, लक्ष्मी-गणपतीचे फोटो, लक्ष्मीपूजनाचे कीट असे सामान वरील देशात पोहचले आहे. परदेशाप्रमाणे स्थानिक पातळीवरील बाजारपेठेतही चिंतामणी क्रिएशनने वेगवेगळ्या प्रकारचे दिवे पाठवले आहेत. त्यात पटेल रिटेल ३ हजार दिवे पॅकेट, कल्याणमधील रामकृष्ण



बाजारमध्ये ५ हजार दिवे पॅकेट, बदलापूरमधील राजकारणी आपल्या मतदार संघात वाटण्यासाठी ५ हजार दिवे पॅकेट आणि मुंबईतील राजकारणी २५ हजार दिवे इथुनच घेतात.

गणेशमूर्तीप्रमाणे २ हजार गरबा (पुजेचे मटके) दिवे, दिवाळी गिफ्ट सेट वरील सर्व देशात यशस्वीरित्या पोहचतात. कारण त्यांची पॅकींग पध्दत याकडे स्वत: निमेश जनवाड आणि त्यांची पत्नी मनाली जातीने लक्ष देतात. चिंतामणी क्रिएशनद्वारे विविध आकाराच्या पणत्या दिवे वेगवेगळ्या रंगांनी रंगवून सोनेरी किंवा रुपेरी चमकी लावून आकर्षक बनवण्याचे काम बदलापूरमधील सहा महिला बचत गटातर्फे केलं जातं. त्याशिवाय इतरही ५० जणींचा हातभार या कामाला सतत लागत आहे.

राजस्थानहून मागवलेला कच्चा माल आणि रंगसंगतीचे साहित्य या महिलांच्या घरोघरी पोहचविला जातो. त्यांना पणती-दिवा कसा आकर्षक बनवायचा याचं ट्रेनिंग दिलं जातं. नंतर तयार झालेला माल पॅकिंगला पाठवला जातो. या महिलांना या कामाचा मोबदला त्यांच्या मागणीप्रमाणे म्हणजे आठवड्याने, पंधरा दिवसांनी किंवा महिन्याने दिला जातो. वर्षभर हे काम चालु असतं. या महिला घरातील सर्व आवरुन हे काम करताना दिवसाचे २०० रुपये कमवून घर चालवण्यावरोबर स्वत:च्या पायावर उभं राहत आहेत.



बचत गटाच्या महिलांना पणत्या-दिवे सजवण्याचे काम दिल्यामुळे त्यांना रोजगारही मिळतो, त्या आपल्या पायावर उभ्या राहू शकतात. शिवाय आमची सर्व तयार माल पाठवण्याची वेळही पाळली जाते. यात मोठं काही नाही आम्ही फक्त निमित्त मात्र आहोत. या व्यवसायात कुटुंबातील सर्वांनीच सदैव मदत केली. यात माझी पत्नी, वडील, आई, भाऊ, मामा-मामी, आजी यांबरोबर सचिन कारंडे, शेखर परेरा, रीना परेरा, राजु पॉल, पुन पॉल, मोहम्मद शेख यांच्या मदत आणि आशिर्वादाशिवाय मी एवढी मोठी भरारी मारु शकलो नसतो. असं निमेश सांगतो. गणपती बाप्पाचा आशिर्वाद राहावा म्हणून संस्थेचे नाव चिंतामणी क्रिएशन ठेवल असल्याचेही निमेश सांगतो.

nimesh@chintamanicreation.com
chintamani.creation21@gmail.com
mob.8793333278




- उमेश गंगाधर पारसकर
बदलापूर

ब्रम्हदेवानी सर्वप्रथम जलचर नंतर थलचर व त्यानंतर वायूचर व अनेक प्रकारचे जीव-जंतू निर्माण केले. हे सर्व प्राणी व जीव-जंतू इ. त्यांच्या सृजनशील बुध्दीनुसार फक्त खाणे-पिणे व उत्पत्ती करण्याइतपतचं त्यांची मजल असायची. यात ब्रम्हदेवाचं समाधान झालं नाही. तेव्हा ब्रम्हदेवाने सगळ्यात शेवटी एक अद्‌भूत मानवी शरीर यंत्राची रचना करुन इतर प्राण्यांच्या तुलनेत विचार करायची कुशाग्र बुध्दी दिली जी कुठल्याही प्राण्यात नसते. व या पंचमहाभूते (भूमी, जल, अग्नी, वायु व आकाश) व मन, बुध्दी, अहंकार यांचा उपयोग करुन एक अद्‌भूत शरीरयंत्र तयार केले. त्यात दशेंद्रीय स्थुल व सूक्ष्म गुण इ. प्रदान करुन त्या यंत्राचे नाव मानव असे दिले व त्यांच्या अपेक्षेप्रमाणे हा मनाव काही प्रगती घडवू शकेल या हेतूनेच मानव नामक अद्‌भूत यंत्र तयार केले. या सर्व प्रकारामुळे माणसात "जिज्ञासा" नामक प्रवृत्ती जागृत झाली त्यामुळे "टू.बी. ऑर नॉट टू बी" ही भावना निर्माण झाली.

मानवी मन जिज्ञासेने भरले आहे. तो जर जिज्ञासू नसता तर भौतिक वा आदिभौतिक प्रगती करुच शकला नसता. बुध्दी व जिज्ञासा ही मानवाला मिळालेली दैवी देणगी आहे. जेव्हा मुलगा लहान असतो व त्याला बोलता येत नाही, त्या अवस्थेत तो जे काही बघतो त्या वस्तुविषयी जाणण्याची त्याची जिज्ञासा असते पण व्यक्त करता येत नाही. म्हणून तो फक्त हावभावांनी आपली जिज्ञासा व्यक्त करीत असतो. मुलगा जेव्हा बोलायला सुरुवात करतो तेव्हा कुठलीही वस्तु

बघितली की, तो आपल्या तोतऱ्या भाषेत विचारत असतो. हे काय आहे ? ते काय आहे ? व त्याच्या प्रश्नांची सरबती सुरु होते व जोपर्यंत तुमचे उत्तर त्याच्या मनाला पटत नाही तोपर्यंत त्याचे प्रश्न सुरुच असते. तुम्हालाच कंटाळा येतो व शेवटी रागावून तुम्ही त्याला शांत बसायला भाग पाडता.

तात्पर्य एकच की माणूस जन्मापासूनच जिज्ञासू असतो. जिज्ञासाच नसेल तर त्याचे मन कार्य प्रवण होणार नाही. व कार्यप्रवणाखेरीज मनुष्य आपल्या ध्येयापर्यंत पोहचु शकत नाही.

"जिज्ञासा विरुध्द श्रध्दा"

झाडावरनं फळ (सफरचंद) खाली पडताना सर्वानीच बघितले होते वर फेकलेले दगड खाली पडताना सगळ्यानींच बघितले होते पण त्यांना प्रश्न पडला नव्हता. अथवा जिज्ञासा झाली नव्हती म्हणून त्यांच्यात कोणी गुरुत्वाकर्षण शक्तीचा शोध करणारा "न्यूटन" झाला नाही.

बादलीत शिगोशिग पाणी भरलेलं असताना लोटा बादलीत बुडवला असता बादलीचे काही पाणी खाली पडलेले काही कमी लोकांनी बघितलं नव्हतं पण त्यातला कुणीही "आर्किमिडीज" झाला नाही.

प्राचीन काळात भारतीयांना प्रश्न पडत नव्हते. कारण ते अजिज्ञासू होते श्रध्देवरच त्यांची सगळी भिस्त होती. श्रध्दा ही मानवी जीवनाला मारक ठरते उपकारक नाही. जे दिसते किंवा सांगितले जाते त्यावर संपूर्ण विश्वास ठेवणे म्हणजेच श्रध्दा. पण श्रध्देने जिज्ञासेच्या प्रश्नांना विरामच लागतो. ज्ञानाचा विकास खुंटतो. श्रध्देने तात्कालिक संतोष मिळू शकतो पण चिरकालिक सौख्य मिळु शकत नाही. फार पुर्वी लोकांना पृथ्वी स्थिर दिसत होती. व सूर्य पृथ्वीची प्रदक्षिणा करताना दिसत होता. या विचाराचे रुपांतर धार्मिक श्रध्देत परिवर्तित झाले. व जे श्रध्दाळू होते त्यांनी हे मान्य केल्यामुळे त्यांची जिज्ञासा खुंटल्यामुळे पुढच्या प्रश्नांना पूर्णविराम मिळाला. पण जे श्रध्दाळू नसून जिज्ञासू होते त्यापैकी एकाने (गॅलिलिओ) अथक प्रयत्नानंतर वैज्ञानिक दृष्ट्या शोध लावला की सूर्य स्थिर आहे व पृथ्वी व इतर ग्रह त्याच्याभोवती प्रदक्षिणा घालतात. याकरीता माणसाने जिज्ञासू असावे. श्रध्दाळू नव्हे.

श्रध्देने मनुष्य जिज्ञासा पुर्ण करु शकत नाही. व श्रध्देने जिज्ञासेला धाकावरती दडपून टाकली जाते. व त्याचा अंतिम परिणाम म्हणजे विज्ञानाचा विकास होऊच शकत नाही. या श्रध्देच्या प्रभावामुळे आपण वैज्ञानिक अविष्कारात खूप मागे आहोत. श्रध्दाळू वर्ग लक्षात घेता आपल्या भारतात मंदिरांची कमतरता कधीच पडली नाही. या देशाचे अधिकांश श्रध्दाळू लोक देवावर विश्वास ठेवतात. श्रध्दा ठेवतात. त्यांना वाटते आपला भार देवांनी त्यांच्या खांद्यावर घेतलेला आहे. तो करेल ते खरे. ही व तत्सम श्रध्दा ठेवणे त्यांना फार सोपे असते. पण त्यामुळे लोकं अजिज्ञासू होतात व त्यांची वैज्ञानिक प्रगती खुंटते.

शेकडो वर्ष आपण भाक्तीयोगाबद्दल ऐकत आलो आहोत. आपल्या इथं भक्तांची कमतरता आहे ना भक्तीची अथवा श्रध्देची पण दु:खे कधी दूर झालीत काय ? नाही. श्रध्दा व भक्ती ही मनुष्याच्या (साधकाच्या) आयुष्यातील प्रारंभिक गोष्ट आहे. अंतिम नव्हे. जिज्ञासुंना तत्वज्ञानातील प्रश्नांची उत्तरे शोधण्याचे दोन मार्ग आहेत. एक आंतरिक मार्ग व दुसरा बाह्य मार्ग. आंतरिक मार्ग साधनेतून जातो तर बाह्यमार्ग विज्ञान प्रविष्ट विश्लेषणाच्या मार्गाने. दोन्ही मार्ग सारख्याच कष्टाचे व आत्मपीडेचे आहेत.

तत्व ज्ञानाच्या क्षेत्रात जिज्ञासूला प्रश्न खूप आहेत. व त्यातील अधिकांश प्रश्न सर्वव्यापी आहेत. ते फक्त मानवाच्या व भौतिक जगाबद्दलचेच नाहीत तर संपूर्ण विश्वाबद्दलचे आहेत. जिज्ञासा ही कालजेयी आहे. या जिज्ञासेला अंत नाही. युगानयुगे ही जिज्ञासा मानवी मन व्यापुन आहे. व ती भौतिक व अदिभौतिक विकासाची जननी आहे. जिज्ञासा ही वैज्ञानिक प्रगतीची द्योतक आहे. असं म्हणतात "प्रयत्नांती परमेश्वर" म्हणजेच आधी प्रयत्न व नंतर परमेश्वर माणूस प्रयत्नांनी परमेश्वराला पण प्राप्त करु शकतो.

उदाहरणार्थ श्रीमद भगवद् गीतेत श्री कृष्णांनी एक सुंदर उपदेश दिला आहे की, जर तुम्ही धर्म कराल तर तुम्हाला परमेश्वराला मागायलाच लागेल. पण जर तुम्ही कर्म म्हणजेच प्रयत्न कराल तर परमेश्वराला तुम्हाला द्यायलाच लागेल. म्हणजे प्रयत्न किंवा कर्म हे धर्म किंवा परमेश्वरापेक्षाही श्रेष्ठ रत्न आहे.

देशवासी मित्रांनो श्रध्दाच जर ठेवायची असेल तर देवाच्या ऐवजी प्रयत्नांवर ठेवा म्हणजे तुमचे उद्दिष्ट साध्य होईपर्यंत तुम्ही प्रयत्नच करीत राहणार व तुम्हाला तुमच्या कार्यात यश मिळेल यात काहीच शंका नाही.






- किरण आचार्य
बदलापूर

वेधशाळेच्या कार्यालयात रात्रीपासून गडबड, गोंधळाचे वातावरण होते. वेगवेगळ्या उपग्रहांकडून आलेले फोटो त्यावरुन मॅपिंग करुन वेगवेगळे अंदाज बांधण्याचे काम सुरु होते. देशपांडे कंटाळले, साठे साहेबांच्या केबिनकडे वळले. आणीबाणीच्या परिस्थितीत बरेचदा दिवसरात्र अंदाज बांधणे आणि लक्षात आलेले न आलेले अनुमान त्वरीत वर्तमानपत्रात तसेच न्यूज चॅनलला पाठवणे हे देशपांडेचे काम. अशावेळी ताण वाढल्यास साठेंची केबिन ही त्यांना स्वत:ला रिलॅक्स करण्यासाठी हक्काची जागा. साठेदेखील केबिनमध्ये कसलेसे सॅटेलाईट इमेज मॅपवर ठेवून काहीतरी निरीक्षण करीत होते. देशपांडे नॉक करुन आत आले. साठे व देशपांडेंची नजरानजर झाली.

कमालीची परिस्थिती आहे देशपांडे, साला अंदाज बांधताच येत नाही नेमके काय होणार याचा. हो साहेब वादळ येणार हे तर नक्की आहे. पण त्याचा जन्म कुठे आणि कधी होणार हे एकाही इमेजवरुन लक्षात येत नाही. वाऱ्यांची दिशा प्रत्येकवेळी बदलत आहे. देशपांडे तुमचा अभ्यास काय सांगतो? काय होईल? नेमके कोणत्या दिशेला जाईल हे वादळ? साहेब कसला अभ्यास? आपल्याला काय शिकवतात हो आपल्या अभ्यासक्रमात? भौगोलिक रचना. त्याचा अभ्यास करतो आपण. महाराष्ट्राची, देशाची, खंडाची, जगाची भौगोलिक रचना. कुठे पर्वत आहे, कुठे पठार आहे, कुठे जंगल आहे. नद्या, खाडी, समुद्र, वाऱ्याची दिशा या सगळ्या अभ्यासक्रमातून काय शिकतो आपण? देशपांडे काहीतरी महत्वाचे बोलणार हे साठेंच्या लक्षात आले. मॅपवरील नजर त्यांनी वर केली आणि हलकेसे स्मित करीत देशपांडेकडे बघितले. केबिनमध्ये ते दोघेच होते आणि केवळ सहकर्मचारी एवढ्यापुरते त्यांचे नाते नव्हते तर त्यापलिकडे एक सुरेख मैत्रीपुर्ण नाते त्या दोघांचे होते.

आपण कालपासून येणाऱ्या वादळाचा अंदाज घेण्याचा केविलवाणा प्रयत्न करतोय पण मला वेगळेच वाटते साहेब. काय? "साहेब आपण अंदाज घेतो आणि तो नेमका चुकतो. आपण सांगतो पाऊस पडणार, नेमके ऊन पडते. आपण सांगतो अतिवृष्टीची शक्यता, नेमकी दुष्काळाची परिस्थिती निर्माण होते. आपण बरेचदा घडणाऱ्या नेमक्या घटनांच्या आसपासही नसतो." "निसर्ग आहे देशपांडे, तुम्ही आणि मी निसर्गाला आव्हान देऊ शकत नाही. दुसरी गोष्ट आपण जे काही अनुमान वर्तवितो ते दृष्य भागावर आहे. अदृश्य भाग आपल्याला माहीत नसतो. परिस्थिती क्षणाक्षणाला बदलते." अगदी बरोबर मला तेच म्हणायचे आहे. दृष्य आणि अदृष्य वादळ येणार असे लक्षात आल्यावर आपण ते कोणत्या दिशेने जाणार हे नेमके ते कुठे निर्माण होणार होते त्यावरुन आणि त्या वेळच्या वाऱ्यांच्या दिशेवरुन ठरवतो. हो अगदी बरोबर. आणि बरेचदा आपला अंदाज चुकतो. कारण वाऱ्याची दिशा सतत बदलते. करेक्ट सर, नेमके तेच कारण आहे. वादळ निर्माण होणार, ते वाऱ्याच्या दिशा बदलत येणार आणि शेवटपर्यंत अंदाज बांधू देणार नाही. नेमके काय म्हणायचे आहे तुम्हाला? वादळ निर्माण होण्याच्या परिस्थितीला आपण कंट्रोल करु शकलो तर? अगदी वादळ थांबवणे शक्य नसले तरी त्याच्या तालावर आपण नाचण्यापेक्षा त्याला त्याच्या जन्माआधीच हातात घेतले तर त्याची दिशा आपण ठरवू शकतो.

कल्पना चांगली आहे देशपांडे, पण वांदा हा आहे की, वादळी वातावरण परिस्थिती आणि नेमका वादळाचा जन्म यातील सीमारेषा खुप पुसट आहे. कारण वादळाचा जन्म नेमका कुठे होईल हे भुकंपाप्रमाणे आहे. आजही भुकंप झाल्यावर त्याचे केंद्र लक्षात येते. मोकळ्या मैदानावरील एका दगडावर तो बसला होता. संध्याकाळची वेळ होती. साधारण चार वाजताची दुपारभर सूर्याने आग ओकून जमिनीला तापवले होते. मैदानावर आता हलका वारा सुटू लागला. त्या वाहत्या वाऱ्याबरोबर छोटे-छोटे वावटळ जन्माला येत होते. मध्येच मैदानात माती फेर धरुन गोलाकार नाचत होती. हातात सिगारेट घेऊन तो एकटक त्या गोल फेर धरुन स्वच्छंद भटकणाऱ्या वावटळीकडे बघत होता. अचानक सिगारेटचा चटका बसला आणि तो भानावर आला. किती वेळ आपण असेच बसून आहोत हे त्याला समजलेच नाही. सहज इकडे तिकडे नजर फिरवताना त्याला मैदानाच्या टोकाकडून एक व्यक्ती छत्री घेऊन येताना दिसली. छत्रीचा रंग आणि चालीवरुन त्याने ओळखले की ती कादंबरीच आहे.

जितके जलद होईल तितके जलद तो तिथून निघाला. निघताना मनात पक्के होते की वळून पाहायचे नाही. तरी जाताना नेमके मान वळली. आणि त्याच्या लक्षात आले की कादंबरी त्याला हात हलवून आवाज देत थांबायची खूण करत होती. त्याने जणूकाही त्याचे लक्षच नाही अशा पध्दतीने नजर फिरवून चालु लागला. पुन्हा मागे न पाहता थेट वाट मिळेल तसा तो निघाला. बराच वेळ चालतोय असे लक्षात आल्यावर तो थांबला. नेमका कुठे आलोय हे पाहण्यासाठी त्याने खालची नजर वर केली. ही त्याची नेहमीची सवय जेव्हाही त्याला. एखाद्या ठिकाणाहून सगळ्यांना टाकून बाहेर निघून जायचे असले, म्हणजे खाली मान घालून तो सरळ चालू लागे. जोपर्यंत तो खालची मान वर करुन बघत नसे. आता तो बाजारात आला होता. एव्हाना पश्चिमेला ढग जम झाले होते. वातावरण बदलले होते. पण पाऊस पडेल की नाही हे सांगता येत नव्हते. तरी एकंदरीत परिस्थिती पाहता

आता घरी जाणेच योग्य असे त्याला वाटले. मघाशी वाहणारा वारा आता स्तब्ध होता. पानांची हालचाल बंद झाली होती. सारे काही स्तब्ध झाले. एक वेगळीच शांतता निर्माण झाली. वादळापुर्वीची शांतता म्हणतात ती हीच.

कॉलेजात त्याला वर्गात मुले चिडवत. देशपांड्या सांग ना पाऊस कधी पडेल? किंवा सांग ना रे, आम्ही घरातून निघताना ऊन असते आणि नेमके अर्ध्या रस्त्यात आल्यावर पाऊस आम्हाला नेमके गाठतो. असे का होते रे? एक ना अनेक प्रश्न विचारुन त्याला कॉलेजमधून मुले चिडवायची. त्याने कधी मुलांना प्रत्युत्तर दिले नाही. आता त्याचे वडिल वेधशाळेत शास्त्रज्ञ आहेत तर त्याला सगळी माहिती असलीच पाहिजे का? आपले वडिल वेधशाळेत नेमका अंदाज कसा लावतात हे थोडेच त्याला माहित असणार? हा, एक मात्र नक्की हे अंदाज चुकीचे निघतात ते खरे.

तो घरी परतला व सरळ त्याच्या खोलीत निघून गेला. त्याचे घर म्हणजे छान दोन मजली बंगला. बऱ्याच खोल्या. त्याने कधी मोजल्या नाही. आला की सरळ आपल्या वरच्या खोलीत ते निघून जायचा. लहानपणी पूर्ण घरभर वावरायचा. पण तेव्हा भाग वेगळा होता. दहावी झाली आणि बारावीसाठी सायन्स घेण्याचे जेव्हा वडिलांनी ठरवले, तेव्हा परिस्थिती बदलू लागली. सायन्स अकरावी सोबत इंजिनियरिंग सीईटी, आय. आय. टी. साठी वेगळा क्लास. सगळे काही मनाविरुध्द सुरु झालं. वाऱ्याची दिशा बदलू लागली. घरात राहणे नकोसे झाले. वावरणे बंद झाले. आई-वडिल आणि तो केवळ तिघेच या बंगल्यात राहतात. पुर्वी संवादासाठी माणसे कमी आहेत असे कधी वाटत नव्हते. पण हल्ली मात्र एवढ्या मोठ्या घरात केवळ तिघेच आहोत असे वाटायला लागले. संवाद कमी म्हणजे जवळपास बंदच झाला. घरात आवाज किंवा बोलणे दुर्मिळ झाले. एक वेगळीच स्तब्ध शांतता. वादळापुर्वीची शांतता म्हणतात ती हीच का? "काकू हे घ्या पेढे. माझा नंबर लागला मेडिकलला." अचानक खालुन आलेल्या आवाजाने तंद्री भंगली या घरात खूप वेळाने संवाद ऐकू आला. बहुधा घरालाही दचकायला झाले असेल. आवाज ओळखीचा होता. "मला अनिल दिसला होता, आता येताना, पण न थांबता निघाला तो. मी किती आवाज दिले त्याला मागुन पण काय माहीत त्याला ऐकूच आले नाहीत बहुधा."

ही कादंबरी त्याची चुलत बहिण. प्रचंड हुशार. जे-जे प्लॅनिंग करते जे ठरवते ते सगळच जमतं तिला. दहावीला टॉप, बारावीला टॉप आता मेडिकलला. काका नशीबवान आहे. असे वडिल म्हणतात. कारण कादंबरीसारखी मुलगी आहे त्यांना आणि मी.... त्यांचे मोठे स्वप्न भंगले आहे. मी बारावी आणि इंजिनियरिंग सीईटी मध्ये फारसे काही करु शकलो नाही. मुळात मला काही करायचे नव्हतेच. मला गायला आवडते. गाण्याची विशेष आवड आणि आजही आहे पण खूप विचार खूप गोंधळ आणि मनात कोंडलेले एक वादळ.

लहान असताना कसेही असले तरी आपले आई-वडिल त्यांचे नियम याविषयी आपल्याला फारसे काही वाटत नाही. पण हळूहळू जेव्हा आपल्या सामाजिक कक्षा वाढू लागतात, तेव्हा आपलं स्वत:चं व्यक्तिमत्व निर्माण होऊ लागतं. तेव्हा लक्षात येतं. प्रत्येक व्यक्ती परिपूर्ण नसते. हळूहळू त्याच्या लक्षात आल्या त्याच्या आणि आई-वडिलांच्या मर्यादा. दरी वाढत गेली, बोलणे जवळपास बंद झाले. बोलायचे खूप होते पण... मला सिगारेट प्यायची सवय लागलीय हे त्यांना सांगायचे होते. त्याचे कारण सांगायचे होते. त्याची घुसमट

सांगायची होती. त्याला गायनात करिअर करायचे आहे ते सांगायचे होते. बाहेर आता पाऊस कोसळु लागला. छान संततधार सुरु आहे. सगळीकडे चिंब वातावरण झालय आणि तितकच कुंद आणि गुढ. या पावसाच्या धारांचा एक लयबध्द आवाज येतोय. सतत कानावर आदळून तो आता सरावाचा झालाय. त्याचं असं वेगळ अस्तित्व जाणवत नाही. घराच्या छतावरुन खाली कोसळणाऱ्या पाण्याचा आवाज वेगळा पण त्याचेही वेगळे अस्तित्व फार काळ टिकले नाही. पावसाच्या सरींच्या आवाजाप्रमाणे तोहि सरावाचा झाला आणि त्या आवाजात एकरुप झाला. संध्याकाळ सरुन रात्र झाली. रंगमंचावरील प्रकाशयोजना बदलावी त्याप्रमाणे. सतत वाटतय पाऊस अजुनही सुरु आहे. वारा स्तब्ध आहे मी खिडकीत उभा आहे.

"चल खाली जेवायला डॅडी वाट बघतायत." आई आली आणि म्हणाली. डॅडी वाट बघतायत म्हटल्यावर काय बोलणार? डॅडी आमच्या घरातील पहिले आणि शेवटचे महत्वाचे व्यक्तिमत्व. त्यांच्यासमोर कोणीही काहीही बोलणार नाही कारण बोलायचेच नसते. मी मुकाट माझ्या खोलीतून आईच्या मागुन निघालो. जिना उतरुन खाली आलो. डायनिंग टेबलवर सर्व जेवण सुंदर सजवले होते. आईची सौंदर्यदृष्टी खूप छान आहे. जेवणाऱ्या टेबलापासून सर्व घर तिनेच सजवले आहे. कधी-कधी वाटतं माती झाली तिच्या आयुष्याची काही काही करु शकली नाही ती. म्हणजे मला करियर म्हणायचे नाही, पण घरातसुध्दा सजावटीमध्ये तिला हव तसं मुक्त स्वच्छंद स्वातंत्र्य दिल गेले नाही. या तिच्या क्षेत्रात सुध्दा डॅडी त्यांच्या अधिकाराचा वापर करायला विसरले नाही. नेहमीप्रमाणे चुपचाप जेवत असताना डॅडी म्हणाले, तुझी ॲडमिशन झाली आहे. उद्या तुला निघायचय. कोणती ॲडमिशन? कुठे? आणि मी घर सोडून जायचं? काही बोलायचे नाही. काही विचारायचं नाही, चर्चा तर नाहीच नाही. मी आईकडे बघितलं ती मुकाट जेवत होती.



बाहेर पाऊस सुरु होता. अचानक मोठ्ठा आवाज झाला. खिडक्यांवरील काचांवर लख्ख प्रकाश उमटला. मागोमाग सोसाट्याच्या वाऱ्यांचा आवाज बाहेरील. संथ, संततधार पाऊस वातावरण अचानक बदललं. खिडकीतून बाहेर बघितलं. निसर्गाने रौद्र रुप धारण केल होतं. आई व डॅडी जेवण आटोपून झोपले होते. मी जेवणाच्या टेबलावरुन कधी उठलो, कधी माझ्या खोलीत आलो काहीच आठवत नाही. मी बाहेर बघत उभा राहिलो. बाहेर एक वादळ आकार घेत होतं. पण बाहेरच नाही, एक वादळ माझ्या आत खोल कुठेतरी आकार घेत होतं. बाबांचा मोबाईल वाजला. त्यांना वेधशाळेतून फोन आला. परिस्थिती लक्षात येत नव्हती. इमर्जन्सी लावली. त्यांना तातडीने ऑफीसला जावे लागले.

"घ्या देशपांडे चहा घ्या." साठेंच्या आवाजाने देशपांडे भानावर आले. "उद्या अनिलला दिल्लीला जायचय. ॲडमिशन झाली त्याची. सगळी तयारी केलीय मी. तरी त्याला निरोप द्यायला मी नाही." देशपांडेनी मन मोकळ केलं. होईल, सकाळपर्यंत वादळाची पोजिशन क्लिअर होईल. साहेबांनी धीर दिला. रात्रभर पाऊस कोसळला. सकाळी देखील त्याची संततधार सुरु होती. अनिल बाहेर पडला सहज फेरफटका मारायला. पण तसे त्याने आईला सांगितले नाही. आणि तिने विचारले नाही. मान खाली घालून तो निघाला. त्याच मैदानाकडे आला. पण त्या मैदानात फेर धरणारी माती व त्या मातीसोबत गरगर फिरणारी वाळलेली पाने नव्हती. चिखल झाला होता. तरी एक मोठासा दगड बघून तो बसला. कालची एक सिगारेट होती खिशात. ती शिलगावली. पाऊस कोसळतच होता. साठेंच्या केबिनमधून बाहेर पडताना देशपांडेंनी विचारले. वादळाचा अंदाज येत नाही. मी काही सूचना करुन दिल्या आहेत. जरा घरी जाऊन आलो असतो. चालेल का? "जा अनिलला अभिनंदन, बेस्ट ऑफ लक सांग." साठे.

"काय रे लबाडा, काल मी किती हाका मारल्या तुला. बघून पण न बघितल्यासारखे केलेस आणि निघून गेलास. अनिलने दचकून बघितले. हातातली सिगारेट फेकली. अरे चालत रे कशाला फेकलीस? मी काही घरी जाऊन लगेच सांगणार नाही. कुठे निघालीस? त्याने विचारले. अरे काल

काकांची म्हणजे तुझ्या डॅडीची भेट झाली नाही. बाबा म्हणाले, जाण्यापुर्वी काकांची भेट घेऊन त्यांचे अशिर्वाद घेऊन जा. मी निघतेय ना आज. मेडिकलची अॅडमिशन घ्यायची आहे दिल्लीला. नंतर बहुधा परत येणार नाही. कादंबरी नंतर बरेच काही बोलत होती. म्हणजे कादंबरी दिल्लीला मेडिकलला चालली म्हणून मी दिल्लीला आजच इंजिनियरिंगला जायचे आहे. वातावरण अचानक बदलू लागले. पावसाचा जोर वाढू लागला. अचानक कुठेतरी कमी दाबाचा पट्टा निर्माण झाला आणि वाऱ्याने जोर पकडला. समुद्रात कुठेतरी चक्रीवादळाची स्थिती निर्माण झाली. देशपांडे रस्त्यात असताना मोबाईलवर फोन आला. अहात तिथुन परत या. वादळ आलय. पटापट अलर्ट द्यायचे आहे. इट्स इमर्जन्सी.

अनिल उठला. छत्री वाऱ्याच्या जोराने उलटी झाली. त्याने ती सोडून दिली. देशपांडे ऑफिसमध्ये पोहचले. सर्वजण पटापट सॅटेलाईटचे अपडेट घेत होते. आणीबाणी होती. वारा आणि पाऊस, दोघांनी रुद्र अवतार घेतला. होता. आधी अंदाज कसलाच नव्हता आणि पुढे काय होणार हे देखील कळत नव्हते. केवळ काय घडतय ते बघणे हेच हातात होते. अनिल तसाच भिजत पुढे निघाला. रेल्वे स्टेशनवर आला. समोर ट्रेन होती त्यात बसला. ट्रेन निघाली. आणि ट्रेनने हळूहळू वेग घेतला. वेधशाळेत कामात गर्क असलेल्या देशपांडेचा फोन वाजला. अहो अनिल कुठे गेलाय? तुम्हाला काही सांगितले का? साठे समोर उभे होते. फोन घरुन आहे हे त्यांना समजले. देशपांडे वादळ हे समुद्रात निर्माण झाले आहे. ते हळूहळू जमिनीकडे सरकतय. वादळाला जमिन लागली की मंदावेल आणि थांबेल. ते जरा जमिनीकडे सरकल की जा तुम्ही घरी. साठे निघून गेले. देशपांडे मटकन खाली बसले. त्यांच्या मनात विचार येत होते. माझ्या घरातून एक वादळ बाहेर निघून गेलय, ते भरकटलय कोणत्या दिशेने गेलय? त्याला जमिन लागेल का?

ट्रेनच्या बाहेर वारा आणि पावसाने रौद्र रुप धारण केले. असेच रौद्ररुप अनिलच्या मनातील वादळाने धारण केल आणि तो आता त्या तडाख्यात सापडला. आणि वादळ नेईल त्या दिशेने निघाला. देशपांडे तसेच बसून होते. त्यांच्या मनात विचार होते. वादळ नेमके कसे निर्माण होते? त्याचे कारण काय? या घरातील वादळाचा आपल्याला अंदाज आला नाही? आपल्याला हे सुध्दा कुठेच का शिकवत नाही?





-अनिल जावकर
अलिबाग


शाळेत असताना काळ, काम, वेग असे त्रैराशीक राशीला येऊन बसते ते कायमचेच. संसार चक्राला जोडलेले हे तीन घोडे. प्रत्येकाची चाल वेगळी. काळ कधी कानात वारा सिरल्यागत चौखुर उधळतो कधी अडेलतटु बनतो. गणिताच्या तासाला आम्हाला वाटायचे की शाळेतील तमाम घड्याळे बंद पडली आहेत. उलट खेळाचा तास मात्र भुरकन उडून जायचा. एखादी रहस्यकथा वाचतांना रात्रीचे दोन कधी वाजले ते कळत नाही. गीतारहस्य वाचताना मात्र वारंवार घड्याळाकडे लक्ष जाते. जांभया येतात व नकळत डुलकी लागले.

दुसरा कामचुकार विद्यार्थी वर्षभर उनाडक्या करतो व परीक्षा तोंडावर आली की रात्रीचा दिवस करतो. कर्मचारी निवृत्त होईपर्यंत झोपा काढतो व भांडीकुंडी रस्त्यावर येऊन पडली की रडायला लागतो. हा दुसरा घोडा अगोदर कुरणात चरत राहतो व नंतर दुगाण्या झाडू लागतो. काळ व काम त्यांचे नकुल सख्य आहे. आइनस्टाईन नामक शास्त्रज्ञाने तिसऱ्या घोड्याचे इतर दोन घोड्यांबरोबर काय नाते आहे हे विषय करुन सांगण्याचा प्रयत्न केला वेगरुपी रोग माणसाला अनेक प्रकारांनी व अनेक कारणांनी पछाडतो. गाडीतून प्रवास करीत असताना आपल्या शेजारी एक सुंदर तरुणी येऊन बसते. लगेच आपल्याला वाटते की गाडी फारच वेगात धावत आहे. ती जर मंदगतीने धावली अथवा थांबली तर बरे होईल., तिसऱ्या स्टेशनवर ती तरुणी खाली उतरते. व एक बोकड

शेजारी येऊन बसते. वेगाविषयीची आपली कल्पना लगेच बदलते. हा प्रवास एकदाचा संपेल तर बरे होईल. असे वाटू लागते. पत्नी माहेरी गेली की काहीची मस्ती सुरु होते तर काहींची साडेसाती. सरड्याप्रमाणे वेग रंग बदलतो व सापाप्रमाणे कात टाकतो.

काळ, काम, वेग ह्याचा ताळमेळ साधता न आल्याने सामान्य माणूस कष्टी होतो. त्याच्या जिवाची तमगम होते. वैफल्याची भावना मनात रुजते. अकारण भावनांचा उद्रेक होऊ लागतो. संन्यास घ्यावा, आत्महत्या करावी, कुणाचा तरी गळा घोटावा इत्यादी विचार मनात वारंवार येऊ लागतात. महागडे मानसोपचार करुनही फायदा होत नाही. आता ह्या चक्रव्यूहातून बाहेर पडायचे तरी कसे? असा प्रश्न पडतो.

संसाररुपी भवसागतून तरुन जाताना प्रार्थनारुपी होडीतून केलेला प्रवास सुखकर होतो. आपल्याला वाटते त्यापेक्षा कितीतरी अधिक सामर्थ्य प्रार्थनेत आहे. असे टेनिसन म्हणतात. प्रार्थनेपासून लाभ होण्यासाठी आपले मन शुध्द असायला हवे. मनात किल्मीष अथवा अडसर असू नये. जर मनाच्या आतल्या कप्प्यात वासना अथवा शल्य दडून बसले असेल तर वेळीच योग्य ती उपाययोजना केली पाहिजे. मन मोकळे झाले की मन:शांती मिळते व अंतर्बाह्य विस्मयकारक बदल घडून येतात. कधीकधी असे घडते की ज्याला आपण आपले मानले आहे तोच नेमका धोका देतो. आपण ह्या अस्तानितल्या निखाऱ्यास पाण्यात पाहू लागतो. परंतु हीच वेळ आहे की सुडबुध्दी न ठेवता अशा व्यक्तीस सद्‌बुध्दी देण्याची याचना आपण प्रभूजवळ केली पाहिजे. "जो तो को कांट बुवै, ताही बोव तू फुल" असे संत कबीर म्हणतात. आणि खरेखरच ह्या उक्तीचा पडताळा जयपुरच्या एका सोनारास आला. त्याच्या मुलीचे लग्न होते. सर्व तयारी झाली. मुहूर्त केवळ दोन तासावर येऊन ठेपला. नी इकडे त्यांचा नोकर मुलीसाठी केलेली वीस पंचवीस लाखांची आभुषणे घेऊन पसार झाला. विशेष म्हणजे हा नोकर लहानाचा मोठा ह्याच घरात झाला होता व सारीजणे त्याला कुटुंबाचा एक घटक मानायचे आता करायचे काय? सोनारावर तर आकाश कोसळले. वारातीची घोडी नवरदेवास घेऊन आली. तशी सोनाराने आपले पागोटे काढून आपल्या व्याह्यांच्या पायावर ठेवले. व झाला प्रकार त्यांना कथन केला. आता माझी लाज व मुलीचे भवितव्य आपल्या हातात आहे. रडत-रडत त्याने सांगितले. व्याही म्हणाले तुम्ही कन्यादान करा पुढचे आपण बघून घेऊ. लग्न व्यवस्थित पार पडले. मुलगी सासरी रमली. सोनार मात्र अस्वस्थ होता. देवा मुलीचे तर बरे चालले आहे परंतु नोकराची काही बातमी नाही. त्याला तू तो जेथे असेल तेथे सुखात ठेव अशी तिन्य नियमाने देवासमोर प्रार्थना करायचा. पुढे एके दिवशी हा पळून गेलेला नोकर स्वत:च्या पायाने परत आला. आभूषणांचे बोचके मालकासमोर ठेवून तो म्हणाला, झाल्या प्रकाराचा मला अतिशय पश्चाताप होत आहे. मला क्षमा करा. मला दूर सारु नका. सोनाराने नोकरास पोटाशी धरले. दुसऱ्या दिवशी ते दोघे मुलीच्या सासरी गेले. सारी आभूषणे व्याह्यांच्या समोर ठेवून सोनार म्हणाला, लग्नात मुलीला स्त्रीधन देऊ शकलो नाही परंतु आता देवाच्या दयेने मुलीसाठी केलेली सारी आभूषणे मला परत मिळाली आहेत. आपण त्यांचा स्वीकार करावा. व मला उपकृत करावे. व्याही हसून म्हणाले, अहो मुलीच्या रुपाने साक्षात लक्ष्मीच आमचे घरी आली आहे. धंद्यात बरकत आली आहे. मला आता कसलीच अपेक्षा नाही. परंतु एक विनंती करावीशी वाटते. आपण मला हुकुम करा. सोनार हात जोडून म्हणाला, माझ्या सुनेसारखी सुंदर सद्‌गुणी मुलगी तुमच्या पाहण्यात कुठे असेल तर सांगा. कारण आता माझा द्वितिय पुत्र विवाहयोग्य झाला आहे. व्याही म्हणाले, सरतेशेवटी पश्चातापाने पावन झालेल्या नोकरास दोघा व्याह्यांनी नवीन धंदा सुरु करुन दिला. व त्यास सन्मार्गावर परत आणले. इथे आपण बघतो की जो नित्यनियमाने प्रार्थना करतो. प्रभूचरणी स्वत:स समर्पण करतो तो आपल्या तामसी गुणांना मुरड घालण्यास शिकतो. अशा व्यक्तीच्या ठाया सद्‌भावना, विवेक, दया, क्षमा आदी गुणांचा विकास होतो. फलस्वरुप त्याचे स्वत:चेच नव्हे तर समाजाचे देखील भले होते. प्रार्थना पश्चातापाचे चिन्ह आहे. आत्मशुध्दी व

आत्मनिरिक्षणाचा मार्ग आहे.

प्रार्थना ही आपण स्वत:च्या स्वार्थासाठी न करता दुसऱ्याच्या भल्यासाठी केली पाहिजे. कुणाचे तळपट व्हावे म्हणून केलेली प्रार्थना देवाच्या कानावर पडत नाही मुलाने आपल्याला न विचारता लग्न केले म्हणून शांताबाई नाराज होत्या. हुंडापांडा तर सोडूनच द्या पण एक परजातीय मुलगी सून म्हणून घरात आली तेव्हा त्यांचे जणू नाकच कापले गेले. दररोज त्या देवासमोर प्रार्थना करायच्या देवा माझा मुलगा मेला तरी चालेल पण ही बया विधवा झालेली मला बघू दे. असे म्हणायच्या. इकडे सुनेला सर्वतोपरी छळण्याचे काम सुरुच होते. एकदा असे झाले की शांताबाई न्हाणीघरात पाय घसरुन पडल्या. कमरेपासून घोट्यापर्यंत प्लॅस्टर लागले. त्या परावलंबी झाल्या. साऱ्या विधी त्या अंथरुणातच करु लागल्या. मुलगा व आप्तईष्ट दुरुनच हळहळ व्यक्त करु लागले. सून मात्र पुढे सरसावली. सासूची मनोभावे सेवा करु लागली. तेव्हा ती सहा महिन्यांची गरोदर होती. व पहिले बाळंतपण असल्याने माहेरी जाण्याची तिची इच्छा होती. एके दिवशी नवरा तिला म्हणाला, शबाना चल मी तुला गुलबर्ग्याला तुझ्या आईकडे सोडून येतो. आता उशीर केलास तर पुढे तुला बसचा, गाडीचा प्रवास झेपणार नाही. तेव्हा शबाना म्हणाली, अहो मी गेले तर सासूबाई एकट्या नाही का पडणार? माझ्याशिवाय त्यांना दुसरे कोण बरे आहे? मी काही माहेरी जात नाही .माझा जीव रमणार नाही तिथे. सासूबाईची याद येत राहील. सासुबाईचे कान भिंतीला होतेच. सुनेचे उद्‌गार ऐकले व त्यांचे डोळे उघडले. घळाघळा अश्रु वाहू लागले. त्यांचे मन शुध्द झाले. पुढे शबानाची वेळ आली तेव्हा "देवा माझ्या सुनेची लवकर सुटका कर" बाळ बाळंतीण दोघेही सुखरुप घरी येऊ दे. मी तुझी खणानारळाने ओटी भरेन. अशी प्रार्थना करु लागल्या. आज सासू आपल्या सुनेला तळहाताच्या फोडाप्रमाणे जपते.

प्रार्थनेचे अथवा पुजेचे फार अवडंबर करु नये. कर्माचा त्याग म्हणजे भक्ती नव्हे. असे रविंद्रनाथ टागोर म्हणतात. केवळ पूजाअर्चा करण्यात वेळ काढणाऱ्या व्यक्तीकडे बघून आपली समजूत होते की हा फारच देवभक्त आहे व देवाशी ह्याचे फारच जवळचे संबंध आहेत. तसेच आपण बघतो की गणपतीची अथवा नवरात्रीची वर्गणी जो केवळ अकरा रुपये देतो तो नास्तिक ठरतो तर जो एक हजार देतो तो धार्मिक ठरतो. मुंबईत सार्वजनिक गणेश उत्सवाचा सारा खर्च तेथील एक गुंड करायचा. देवाच्या कार्यासाठी पैशाकडे बघत नाही असे सारेजण म्हणायचे. हाच समाजकंटक हातभट्टी, मटका, वेश्याव्यवसाय करुन दररोज लाखो रुपये कमवातो. या गोष्टीकडे सोयीस्कररित्या दुर्लक्ष केले जायचे. स्वत:ची पापकर्मे लपवण्यासाठी धार्मिकतेची मोरपिसे लावून कदाचित आपण इतरांची फसवणूक करु शकतो. परंतु खरोखरच जर प्रार्थनेपासून मन:शांती मिळवायची असेल तर सरळ मन व तरल भाव ह्या दोन्हींचा समागम हवा. मोजक्या शब्दात एकाग्र होऊन केलेली प्रार्थना अधिक फलदायी ठरते.

प्रत्येकाला आपले एक स्वत:चे असे श्रध्दास्थान हवे. श्रध्दास्थानाची कुठलीच परीभाषा नाही. प्रत्येकाने स्वत: त्याची महती ओळखावी. व गोडी चाखावी. श्रध्दा, जात, धर्म, स्थलकाळ, ऐतिहासिक वा भौगोलिक चौकटीत सामावली जात नाही. शिर्डी, हाजीमंलग, माऊंटमेरी, पंढरपूर या व अशा अनेक ठिकाणी सर्व धर्माचे व जातीचे स्त्री-पुरुष दरवर्षी जमतात. ते केवळ श्रध्देपोटीच. बंगलोर येथील डॉ.

देवी शेट्टी यांच्याकडे अनेक देशातील पिडीत लोक आशेने येतात. ह्या सर्वांना बंगलोर तीर्थस्थान वाटते. तर डॉ. देवीच्या रुपाने साक्षात परमेश्वराची भेट होते. मेसेडोनिया देशाच्या मदर टेरेसा आपण त्यांना देवाचा अवतार मानतो. ईश्वर मग तो कुठल्याही रुपात असो आपल्याला सुख शांतीच देतो. जसजसे आपण त्याच्या समीप जातो तसतसे आपल्याला कळते की ईश्वर आपल्या हृदयात आहे. त्यासाठी रोम, चारीधाम, काशी आदी केलेच पाहिजे असे नाही. ईश्वराचे साम्राज्य तुमच्या हृदयात आहे. असे उद्‌गार लॉर्ड जीझस यांनी आपल्या अनुयायांना उद्देशुन काढले होते. तर पापांची स्विकृती हीच खरी मुक्ती असे ल्युथर यांनी म्हटले आहे.

"ज्याचे मन निर्मळ त्याला मिळते सुखाची हिरवळ." ज्याची कायाच नव्हे तर मायादेखील नितळ आहे त्याला भक्तीचा परिमळ परमोच्च आनंदाची अनुभूती देतो. ज्याच्या मुखी मंत्र त्याच्यावर ईश्वरी छत्र, प्रार्थना म्हणजे मनाची संवेदना व ईश्वराची साधना आहे. ईश्वर भावाचा भुकेला आहे. त्याला पोपटपंची नको, पारायणे नकोत, जागरण नकोत. छाती पिटून केलेला आक्रोश नको. देणग्या नकोत. त्याला हवा सद्‌भाव, सामंजस्य व एकोपा. "पोथी पढी पढी जग मुआ, पंडीत हुवा न कोय, ढाई अक्षर प्रेमका, पढे सो पंडीत होय." असे संत कबीर म्हणतात. तर शांती समान दुसरे सुख नाही. असे तुलसीदास म्हणतात. "ज्याने मनाला जिंकले त्याने जगाला जिंकले" असे शकराचार्य म्हणतात. यावर बहिणाबाई म्हणतात, "मन वढाय वढाय, उभ्या पिकातल ढोर, मन पाखरु पाखरु आता व्हत भुईवर, गेल गेलं आभाळात"

मृत्यू ही सर्व प्राणीमात्राला मिळालेली ईश्वरी देण आहे. असे महत्मा गांधीनी एके ठिकाणी लिहिले आहे. जन्म व मृत्यू आपल्या हाती नाही. परंतु मधला संक्रमणाचा काळ हसत खेळत व्यतित करणे मात्र आपल्या हातात आहे. या भूतलावर किती काळ वास्तव होते त्यापेक्षा ते कसे होते याला अधिक महत्व आहे. चित्त प्रसन्न ठेवा, सर्व दु:खे दूर होतील. असा उपदेश भगवान श्रीकृष्ण करतात. युध्दात अर्जुनाने सारथ्य भगवंतांनी केले. आयुष्यात आपणच आपले सारथी असतो. काळ, काम व वेग ह्या तीन अवलख वारुंना जर आपण प्रार्थनेची वेसण घातली तर जीवनरथ हाकरण्यास सोपे जाईल यात शंकाच नाही.





# सकारात्मक दृष्टीकोन

**- संतोष शरदराव पाठक**
खडकपाडा, कल्याण

एका नामांकित कंपनीत लेडीज रिसेप्शनिस्टची जागा भरायची असते. नामांकित वृत्तपत्रात जाहिरात देण्यात येते. कंपनीची मार्केटमध्ये क्रेझ असल्यामुळे अर्जही महापुरासारखे येतात. त्यातून शार्टलिस्ट झालेल्यांच्या ठरलेल्या दिवशी मुलाखती सुरु होतात. बॉस स्वत:च मुलाखत घेत असतो. एकीची मुलाखत चालु असतानाच टेबलावर फोनची रिंग सुरु होते. मग डिर्स्टब झाल्याने बॉस त्रासून फोन उचलतो. काहीसा चिडलेल्या आवाजात हॅलो कोण? मात्र तिकडे अतिशय गोड आवाज येतो. नमस्कार सर मी देवयानी बोलतेय. फोनवरुन तो गोड आणि मंजुळ आवाज ऐकून त्याचा राग उतरतो. आणि म्हणतो बोला, काही नाही तुमच्या ऑफिसमील रिसेप्शनिस्टच्या जागेसाठी मलापण यायचय बॉस. मग प्रॉब्लेम काय आहे? इथे मुलाखती सुरु आहेत. तुम्हीही येऊ शकता. तेच तर ना सर मलाही यायचं. पण ट्रॅफिक जाममध्ये अडकलीय. पोहचायला उशिर होतोय बॉस ओके ओके या तुम्ही.

इकडे मुलाखत सुरु असते. पाच ते सहा जणींच्या मुलाखती होतात. पण त्या बॉसच्या कानात त्या देवयानीचा मधुर आवाज गुंजत असतो. साधारण एक तासांनी पुन्हा फोन येतो सर ट्रॅफिक जाम कमी झालं आहे. मी निघाली आहे. पण प्लीज सर उशिर झाला तर समजून घ्या. बॉस हरकत नाही पण तुम्ही शक्यतो वेळेत या. पुन्हा तोच आवाज ऐकून बॉस विचार करु लागला. खरेच किती सौजन्यशील मुलगी आहे. फोनवरचा आवाज ऐकून मी मंत्रमुग्ध होतोय. हिच मुलगी आहे आपली परफेक्ट रिसेप्शनिस्ट! तरी तिकडे अजुन शिल्लक उमेदवारांच्या मुलाखती चालूच असतात. पण बॉस या मुलाखती औपाचारिकतेसाठी घेत असतो. कारण त्यासाठी देवयानी फिक्स झालेली असते. इतक्यान पुन्हा फोन येतो. सर मी तुमच्या ऑफिसच्या इमारतीच्या पार्किगमध्ये आहे. पण गाडी लावायला जागा नाहीये. मी बाहेर रस्त्यावर कुठे जागा मिळतेय का ते पाहून येते. सर प्लिज त्यामुळे थोडा उशिर होतोय. बॉस हरकत नाही या तुम्ही सावकाश. आता बॉसला तिला भेटायची आणि पाहायची उत्सुकता लागलेली असते. इतक्या मंजुळ आवाजाची मुलगी कशी असेल? मॅनर्स तर चांगले दिसतात. नक्की हिलाच घेऊया. आणखी तीन-चार उमेदवार शिल्लक

असतानाच एक चिठ्ठी घेऊन शिपाई कॅबिनमध्ये येतो. चिठ्ठीवर सर मी देवयानी आलेय तुमच्या ऑफिसमध्ये. बॉस बाकी उमेदवारांची लिस्ट बाजुला ठेवून लगेच तिला बोलावतो. देवयानी आत येते आणि बॉस एकदम दचकतो. दारात एक सावळी आणि काहीसा ग्रामीण ढंग वाटावा अशी देवयानी उभी असते. बॉसचा भ्रमनिरास होतो. त्याच्या अपेक्षेत तिची प्रतिमा जरा वेगळीच असते. तुम्ही निराश झालेला असणार कारण तुमच्या अपेक्षेप्रमाणे मी सुंदर नाही. ते मलाही माहित आहे पण सर मी इथे येण्याअगोदर तुमच्या कंपनीची माहिती काढलीय. त्यानुसार इथे बाहेरुन येणारे कस्टमर कोणीच नसतात. इथली सर्व कामे फोनवर चालतात. आणि फोनवर आवाज चालतो, सौंदर्य नाही. आणि म्हणून अगदी ठरवून तुमच्याशी अशी तीनदा फोनवर बोलून मी इथे पोहचली. माझा आवाज तो तुम्ही ऐकला आता काय तो तुम्ही निर्णया घ्या. त्यावर तात्काळ बॉसने ड्रॉवरमधून अपाईंटमेंट लेटर काढले त्यावर सही केली आणि म्हणाले उद्या सकाळी रिसेप्शन टेबलवर मला तू दिसली पाहिजेस. ऑल द बेस्ट.

आपल्यात उणीव आहे किंवा आपण कशात कमी आहोत याचा विचार न करता आपल्यात ती पॉझेटिव्ह बाब आहे याचा विचार केलात तर आपण या जगात देवयानी सारखे नक्की यशस्वी होऊ. ⬟

---

हसा

पत्नी : अहो ऐकलंत का? आपल्या शेजाऱ्यांनी ५० इंचाचा एलईडी आणलाय. तुम्हीसुध्दा आपल्यासाठी आणा ना?

पती : अगं ज्याच्याकडे एवढी सुंदर पत्नी आहे तो एवढा फालतू वेळ टीव्ही पाहण्यात का म्हणून घालवेल?

पत्नी : अहो तुम्ही पण ना. थांबा आता मी तुमच्यासाठी गोडाचा शिरा करुन आणते.

---

एक लठ्ठ माणूस आपल्या चारमजली इमारतीच्या छतावरुन खाली पडला. हॉस्पीटलमध्ये शुध्दीवर आल्यावर त्याने विचारले, सिस्टर मी वाचलो काय?

सिस्टर : तुम्ही वाचलात, पण ज्यांच्या अंगावर तुम्ही पडलात ते चौघेही मरण पावले.

---

डोळ्याचे डॉक्टर : (लेडी पेशंटचे डोळे चेक करताना) बाई नवऱ्याकडे जसं बघता तसं बघा.

बाई : पण का?

डॉक्टर : डोळ्यात ड्रॉप टाकायचा आहे.




# बदफैली

- सुरेश गोविंद देहेरकर
मुलूंड , मुंबई.

सौंदर्य हे कुणाची मिरासदारी नाही. सौंदर्य हे कुठेही पहावयास मिळते. सौंदर्य गरिबाच्या झोपडीत असते, श्रीमंताच्या अलिशान बंगल्यात असते आणि राजाच्या राजवाड्यातही असते. सौंदर्य पुरुषाला घायाळ करते आणि काही वेळा घातकही ठरते. निदान सखूच्या बाबतीत तरी तसेच घडले.

सख्या कुंभाराची सखू ही रुपवान पत्नी. तिला स्वत:च्या सौंदर्याचा खूप अभिमान होता. आपल्या नजरेनेच ती पाहणाऱ्याला घायाळ करायची. गोरीपान, धष्टपुष्ट, भरदार छाती, भेदक डोळे, सरळ नाक्षिका असे सारी काही तिच्यात होते. तिच्याशी बोलायला मिळावे म्हणून लोक काही तरी सबबी शोधत. तिला ते कळायचे पण ती ते हसण्यावर नेई. हसताना तिच्या गालाला खळी पडे तर पाहणाऱ्याच्या पोटात खड्डा पडे. सख्या सुंदर मडकी बनवायचा. तो एक उत्कृष्ट कलाकार होता. सखू त्याची प्रेरणा होती. सखुला सोडून तो

कुठेही जात नसे. पण एक दिवस मात्र त्याला तिची साथ सोडून जावे लागले. अगदी कायमचे. सख्याचं घर बैठे होते. पुढे ओटी व मागे पडवी. या शिवाय माजघर, देवघर, स्वयंपाकघर व पाव्हण्यांसाठी वेगळ्या दोन खोल्या. मडकी बनवण्यासाठी लागणारी माती व इतर सामान-सुमान तो पडवीत ठेवायचा. पडवीमध्ये खूपच अडगळ असायची. पुढे अंगण व मागे परसदार असे साधारणपणे जागेचे वर्णन करता येईल. घराच्या भिंती मातीच्या होत्या. वर कौलारु होते. मागे परसदारी झाडे-झुडपे असल्याने सरपटणाऱ्या प्राण्यांची ये-जा असे. पण कोकणातल्या लोकांना त्याचे कधी भय वाटले नाही. गिऱ्हाईकाची ऑर्डर पुरी करायची असल्याने सख्या त्या दिवशी लवकर उठला. डोळे चोळत तो माती आणण्यासाठी पडवीत गेला. पण डोळ्यावरची झोपेची झापड व अपुरा सूर्यप्रकाश यामुळे मातीत वेटोळे घालून बसलेला साप त्याला दिसला नाही. सख्याने मातीत हात घालताच सापाने कडकडून दंश केला. सखुला काय करावे ते सुचेना. तिने शेजाऱ्या-पाजाऱ्यांना हाका मारल्या सारे धावत आले. परंतु सरकारी दवाखान्यात नेईपर्यंत त्याची प्राणज्योत मावळली होती. सख्याच्या मागे पत्नी सखु व २ वर्षाचा मुलगा राम हे दोघेच राहिले. कुटुंबाचा कर्ता पुरुष गेल्याने तिच्यावर आभाळ कोसळले. शेजारी-पाजारी व नातेवाईकाने तात्पुरती मदत केली. नंतर मात्र हात आखडता घेतला. सखु एक धीट व बिनधास्त बाई होती. सख्या गेला तेव्हा तिचे वय फक्त २५ वर्षाचे होते. ती डगमगली नाही. तिने कंबर कसली व पुन्हा मडकी बनवण्याचा मूळ धंदा करु लागली. पण मुलाची जबाबदारी व धंदा यांचा मेळ बसेना. शिवाय सख्याएवढी ती कुशल कारागीर नव्हती. त्यामुळे तिचे काम कमी झाले.

तिला आर्थिक मदत करणाऱ्यांपैकी काहीनी तिच्याकडे शरीर सुखाची मागणी केली. तिला काय करावे सुचेना. ती मडकी विकायला गावात जाऊ लागली. तिच्या सौंदर्यावर फिदा होऊन लोक मडकी घेऊ लागली. पण तिला लोकांचा अनुभव मात्र वाईट आला. काही गिऱ्हाईक तिच्या हाताला जाणून-बुजून स्पर्श करीत. तर काही टोमणे मारत. तिच्या पाठीमागे लोक वाईट साईट बोलू लागले. पण तिने तिकडे दुर्लक्ष केले. आपल्या बाळाकरता तिला ते नाईलाजाने करावे लागे. नवऱ्याच्या मागे सुंदर व रुपवान स्त्रीला जगणे किती अवघड व मुश्कील असते याचा अनुभव तिला येऊ लागला. आणि एक दिवस जे घडायला नको होते ते घडले. तिचा शेजारी विजय साळवी सखू घरात एकटी आहे पाहून शिरला व त्याने तिच्यावर बलात्कार केला. त्याच्या मनाची तृप्ती होईपर्यंत त्याने तिच्याशी जबरी संभोग केला. सखु काहीच करु शकली नाही. सखुचे मूल आईची विटंबना उघड्या डोळ्यानी पाहत होता. नाहीतरी दोन वर्षाचे मूल काय करणार होते. विजय साळवी हा प्रख्यात गुंड होता. पोलिसही त्याला घाबरायचे. त्याच्यावर असंख्य गुन्हे असूनही पोलिस त्याचे काहीच वाकडे करु शकले नव्हते. सखुनी रितसर पोलिस स्टेशनात तक्रार नोंदवली पण फरारी विजय साळवी पोलिसांना काही मिळाला नाही.

गावातले लोक त्या प्रकारानंतर उघड-उघड तिच्याकडे शरीर सुखाची मागणी करु लागले. शिवाय २५ वर्षाच्या तरुणीला पोटाच्या भुकेसारखी शारिरीक भूकही असू शकते. हे नाकारुन चालणार नाही. ती आता बदनाम झाली होती. मग तिनेही लाज लज्जा सोडली. ती निर्लज्ज झाली. आपल्या पोटच्या मुलाला तिने आईकडे नेऊन ठेवले. त्यामागे एकच उद्देश होता की हे सारे मुलाला बघायला लागू नये. स्त्रीचे शील काचेच्या भांड्यासारखे असते. एकदा तडा गेला की

तो सांधता येत नाही. ती जातीने कुंभारीण होती. पण फुटलेले मडके आता सांधता येणार नाही हे तिने ओळखले. तिने चक्क गावठी दारुचा धंदा सुरु केला. बाटली बरोबर लोकांना बाईही मिळू लागली. पोलिसांना हप्ते मिळू लागले. सखुबाईचा धंदा संपुर्ण गावात प्रसिध्द झाला. लोक तिला बदफैली बाई म्हणू लागले. पण तिला जगाची पर्वा नव्हती. आपल्या देहाचा तिने बाजार मांडला. बाजार म्हटल्यावर गिऱ्हाईकांची काय कमी? अर्थात शरीर सुखाकरता कोण गिऱ्हाईक निवडायचे हा अधिकार तिचा होता. संपुर्ण कुंभारवाडा बदनाम झाला. अनधिकृत दारुचा धंदा व वेश्या व्यवसाय यामुळे तिला भरपुर पैसा-अडका मिळाला पण तिचे मन :स्वास्थ बिघडले.

कॉलेज कुमार, मध्यमवर्गीय, अधिकारी आणि स्वत :ला साळसुद म्हणणारे असे एकेक करुन सारेजण येऊ लागले. सौंदर्याकरीता म्हातारे, कोतारे पण वेडे झाले. तिला हसूही येत होते आणि स्वत :चा रागही येत होता. आणि पुन्हा हेच लोक तिला बदफैली ठरवत होते. सखु गोरीपान व सुंदर तर होतीच पण तिचा उफाड्याचा बांधा, पुष्ट नितंब, उन्नत उरोज आणि सर्वात महत्वाचे तिचे ह्रदयाचा ठोका चुकवणारे आव्हानात्मक व भेदक डोळे साऱ्यांना घायाळ करायचे. तिच्याकडे जाणारा प्रत्येकजण तृप्त होईपर्यंत संभोग करायचा. तिचे संपुर्ण शरीर एक खेळणे झाले होते. ज्याला पाहिजे त्यांनी हातात घ्यावे. कुस्करावे व फेकून द्यावे. साऱ्यानीच तिच्या शरीराचे एखाद्या लांडग्याप्रमाणे लचके तोडले. रवीने ताक घुसळावे तसे तिचे शरीर घुसळले. त्याचा परिणाम व्हायचा तोच झाला. तिचे शरीर थकले. गात्र शिशिल झाली. जवानीचा जोश ओसरला. निरनिराळ्या रोगानी तिला ग्रासले. खूपच त्रास व्हायला लागल्यावर ती डॉक्टरकडे गेली. डॉक्टरांनी तिला तपासले व सांगितले तिला एडस् झाला आहे. तेव्हा तिच्या पायाखालची वाळु सरकली. तिचे दुसऱ्याला घायाळ करण्याचे सौंदर्य तिच्याकरता घातक ठरले.

आपल्या मागे आपल्या मुलाचे काय होणार या विचाराने ती हादरली व कोलमडून गेली. तिचे कशातही मन रमेना. त्यातच पोलिसांनी तिच्या गावठी दारुच्या अनधिकृत धंद्यावर छापा टाकला. तिला मुद्देमालासहित पकडले व तुरुंगात टाकले. तिच्या मोठ्या होत चाललेल्या मुलाला आपल्या आईचे हे प्रताप कळले तेव्हा त्याला मेल्याहून मेल्यासारखे झाले. पण आता पश्चाताप करण्याची वेळ निघून गेली होती. ती तुरुंगातून सुटून आल्यावर आपल्या १० वर्षाच्या मुलाला भेटली. तिने वडिलांच्या मृत्यूनंतर काय काय झाले ते मुलाला सांगितले. कुंभार वाड्यात व गावात तिला तोंड काढायला जागा राहिली नाही. सर्वाच्या दृष्टीने ती आता बदफैली बाई ठरली होती. अखेर एक दिवस मनाचा निश्चय करुन दोघं मायलेक गावाबाहेरच्या नदीवर गेले. दोघा मायलेकरानी हातात हात घेऊन नदीच्या खोल पात्रात उडी मारुन आत्महत्या केली. बदफैलीने जीवनाचा शेवट केला. पण असंख्य प्रश्न मागे सोडले. त्याची उत्तरे समाजाला शोधावीच लागतील.

१) नवऱ्याच्या मृत्यूनंतर २५ वर्षीय तरुणीला शरीरसुख घेण्याचा अधिकार नाही का? जर ते पुरुषाला चालते तर स्त्रीला का नाही?

२) पाश्चिमात्य देशात विवाहित स्त्री व पुरुषाला अनेक मैत्रिणी असतात. त्याना कोण नावे ठेवत नाही मग एक स्त्री म्हणून बदफैली सारख्या स्त्रीला तो निकष लावता येणार नाही का?

३) बदफैलीला वाम मार्गाला भाग पाडणारे गुन्हेगार नाहीत का? तसेच तिला बदफैली म्हणणाऱ्यांनी पण तिच्याकडून शरीरसुख घेतले त्यांना नैतिकदृष्ट्या तो अधिकार आहे का?

४) सौंदर्य हा शाप आहे की वरदान हे कुणी ठरवायचे?

५) तथाकथीत समाज सुधारक व स्त्री संरक्षण संघटना अशावेळी कुठे असतात. ते अशाबाईस अर्थसहाय्य व धीर देण्याचे कार्य का बरे करत नाहीत?

६) सरकारकडून अशा स्त्रीयांना वेळेवर संरक्षण व अर्थसहाय्य का मिळत नाही. अपराध्यांना शासन का होत नाही. अनधिकृत धंदे सरकारी यंत्रणा का चालून देते. बदफैलीला नावे ठेवणाऱ्यांना अंतर्मुख होऊन याचा विचार करावा.



---

## हसा

एक तरुणी एका कंपनीत मुलाखत द्यायला जाते.

मॅनेजर : तुला खेळासंबंधी काही माहिती आहे का?

तरुणी : हो.

मॅनेजर : शब्दखेळ खेळता येतात का तुला ?

तरुणी : हो. इश्श,त्यात काय मोठे? मी शब्द खेळात तरबेज आहे. आजपर्यंत मी अनेक कंपन्यामध्ये हा खेळ यशस्वीपणे खेळले.त्या खेळाचा प्रेमात चांगला उपयोग केला आहे.तुमची परवानगी असेल तर इथेही खेळू का?.




# टर्निंग पॉईंट

**- सुभाष ल. झेंडे**
डोंबिवली (प.)

जुलै महिन्यातील पहाटे पासून कोसळणारा धो-धो पाऊस थोडा थांबलेला पाहून मनिषाताई जरा गॅलरीत येऊन त्यांनी आकाशाकडे पाहत त्या मनाशीच स्वगत बोलत होत्या अजून आकाशात काळे ढग बरेच जमा झाले आहेत. आता परत पावसाची जोरदार सर येणार या विचारातच त्या घरामध्ये आल्या. सारे वातावरण कुंद झाले होते. कुठल्याही क्षणी पावसाला सुरुवात होईल असे वाटत होते. पण मनिषाताईचे सारं लक्ष राघवच्या वाटेकडे लागले होते. कारण आज कॉलेजला जाताना राघव छत्री न्यायला विसरला होता. या पावसात भिजले की त्याला सर्दी होते अन् मग डोकंही बधिर होतं. म्हणून त्यांना राघवची काळजी वाटत होती. तो पावसाला सुरु होण्यापुर्वी घरी आला तर बरं होईल. तेवढ्यात शेजारची नेहा कॉलेजातून घरी परत येत होती. तिने मनिषाताईंना गॅलरीत बघून ती म्हणाली काकू राघवची वाट पाहताय ना! तो पहा येतोय. तेवढ्यात त्यांना राघव येताना दिसला. त्याला पाहून त्यांना खूप बरे वाटले. राघव धावतच बिल्डींगच्या जीन्याजवळ आला. राघव तसा शांत आणि अबोल होता. तो कुणाशी जास्त बोलत नसे. आणि मुद्दाम ओळखी काढत नसे. पण अभ्यासात मात्र तो हुशार होता. नेहमी पुस्तकात डोके घालून बसणारा. आपला अभ्यास बरा नी आपण बरे. असे त्याचे वागणे होते. त्याला सी.ए. व्हायची इच्छा होती. त्या महत्वाकांक्षेपोटी तो अभ्यासच करीत असे. शेजारच्या ब्लॉकमध्ये राहणारी नेहा अधून-मधून मनिषाताईशी बोलायला यायची. तिला मनापासून राघव आवडायला. ती आली की तिचं सारं लक्ष राघवकडे असायचे. ती मधूनच राघवला विचारायची काय चालू आहे राघव? तो तिला मोघम उत्तर द्यायचा. काय करणार अभ्यास! अरे पण सारखा अभ्यास करुन कंटाळा येत नाही तुला? मला नाही येत कंटाळा. अरे घरी आलेल्या माणसांशी थोडं बोलावं. एवढा काही तू नापास होणार नाहीस बरं का? अग पण काय बोलावं तुझ्या प्रश्नांना मी उत्तर देतोय काय म्हणतेस तू? काही नाही तु कर अभ्यास. मी जाते असे म्हणून नेहा रागाने त्याचे नेहमीचेच शब्दांची फेर तपासणी ऐकून घरी निघून यायची. तिला कधी-कधी त्याचा खुप राग यायचा. पण नेहाला राघवकडे पाहून व त्याचा आवाज ऐकून बरे वाटायचे. खरं तर ती मनापासून त्याला पसंत करीत होती. तिने आपल्या मनातील गोष्ट कोणालाही बोलून दाखविली नाही. आता वर्ष होत आल होतं. तिला

वाटल राघव आपल्याशी बोलेल गप्पा करील किंवा आपलं कौतुक करेल पण काही नाही. त्याच्याकडून तिला रिस्पोन्स मिळतच नव्हता. अचानक नेहाला शॉकच बसला. तिचे आईबाबा अपघातात गेले. नंतर तिला मामा-मामीकडे राहावे लागले. मामाचा नेहावर खूप जीव होता. मामी मात्र भांडखोर, कजाग होती. ती नेहाला नीट वागवत नसे. घरातील सर्व कामे नेहाला करावी लागत असत. मामी नेहाला खूप त्रास द्यायची. पण नेहाला कॉलेज शिक्षण पुर्ण करायचे होते. म्हणून ती मामीचा त्रास सहन करत असे. नेहा बारावीत शिकत होती. तिच्याच कॉलेजमध्ये राघव शिकत होता. तो कॉमर्सच्या दुसऱ्या वर्षाला होता. दोघेही एकाच कॉलेजात शिकत होते. दोघांची वेळ सारखीच होती. राघव शेजारी राहायचा त्यामुळे घरातील कटकटीमुळे तिला एकच आशा होती की, राघवचं मन आपण वळवू व आपली एक दिवस मैत्री होईल. तिला तो खूप आवडला होता. तो आपल्याशी बोलेल पण तिच्या मनातील राघवला किंचितही कल्पना नव्हती. त्यामुळे एकतर्फी प्रेमापोटी तिचं मन तिलाच खात होतं.

सकाळच्या घाईगडबडीत नेहाकडून कपबशी फुटली ते पाहून मामीने अकांडतांडव केले. तिचा तो नेहमीचा चेहऱ्यावरील हावभाव पाहून नेहा घाबरली. मामीने जवळजवळ तासभर सर्व मुक्ताफळे उधळली. अन् नेहावर तोंडसुख घेतले. नेहाचे मन रागाने चरफडत होते. तिच्या तळपायाची आग मस्तकात गेली ती तशीच तयारी करुन कॉलेजात गेली. तीचे वर्गात लक्ष लागत नव्हते. कॉलेजच्या मधल्या सुट्टीत तिला राघवची आठवण झाली. तिने मनाशी निश्चय केला आज कोणत्याही परिस्थितीत आपण त्याला आपल्याशी मैत्री करायला लावणारच. ती त्याच्या क्लासरुममध्ये गेली. सारे विद्यार्थी निघून गेले होते. हा एकटाच पुस्तकात तोंड खुपसून बसला होतो. नेहाने त्याला खूप गोड बोलून अभ्यासाची विचारपूस करुन बोलते करण्याचा प्रयत्न केला. पण तो तिला फक्त हूं-हूं एवढेच उत्तर द्यायचा. तिच्या प्रश्नाच्या सरबत्तीला कंटाळून त्याने चिडून तिच्याकडे रागाने बघत म्हणाला, तू इथून निघून जा बरं. तेव्हा मात्र नेहाचे डोके तापले व पिसाळल्यासारखे करीत मनात तिने याला आज धडा शिकवायचा असे ठरवले. तिने मनाचा निश्चय करुन क्लासरुमचे दार बंद केले व स्वत:चे केस विस्कटून स्कर्टची बाही फाडली व ती ओरडू लागली, रडू लागली. वाचवा-वाचवा मला वाचवा असे सर्वांना ओरडून सांगू लागली. तेव्हा राघवचे तिच्याकडे लक्ष गेले तो पटकन उठून उभा राहिला. अग नेहा हे काय करतेस तुला काही कळतंय का? मी काय केलेय का? पण ती ऐकण्याच्या मन:स्थितीत नव्हती ती आरेडू लागली तिच्या आवाजाने इतर मुलं क्लासरुमकडे धावली. दार उघडताच नेहाचा अवतार पाहून सगळे राघवकडे धावले. काहीनी त्याच्यावर हात उघारले. सिनियर सर आले

त्यांनी इतर टिचर्सना थांबवले. राघवची अवस्था फारच केविलवाणी झाली होती. तो सारखा सांगत होता मी काहीही केलं नाही. ही खोटं बोलते. नाटक करते. पण त्याच्यावर कोणाचा अजिबात विश्वास बसत नव्हता. नेहा मात्र मुसमुसत होती. मनातून खुप खुष झाली होती. कसा बदला घेतला. आपण जिंकलो अशा तोऱ्यात ती सर्व तमाशा बघत होती. तिचा अवतार पाहूनच बघणाऱ्यांना अंदाज आले हे सारे खरे खरे वाटत होते. राघवचे कॉलेजमध्ये चांगले रेकॉर्ड आहे तो स्कॉलर आहे शिवाय होतकरु मुलगा आहे. आतापर्यंत त्याचे रेकॉर्ड चांगले आहे. तो कोणाच्या अध्यात ना मध्यात नसतो. तरीपण सर्व टिचर्सनी विचार करुन त्याला प्राचार्यांकडे नेले. नेहालाही बरोबर घेतले. नेहाची हालत पाहून सर्वांना नेहाचे खरे वाटत होते.

सर्वजण प्रिन्सीपॉलच्या केबीनमध्ये आले. त्यांनी राघवकडे पाहिले. त्यांनाही आश्चर्य वाटले. एका मुलीची राघव छेड काढेल हे त्यांच्या मनाला पटत नव्हते. राघव सर्वांचा लाडका विद्यार्थी होता. राम सरांचा तर आवडता विद्यार्थी त्यांचा राघवच्या बोलण्यावर पुर्ण विश्वास होता. पण इतर टिचर्सचे मन साशंक होते. एकूण या वयात अशा गोष्टी होऊ शकतात यावर कोणाचेही दुमत नव्हते. यात सालस, हुशार, मनमिळाऊ अशा बाबींचा आधार राहू शकत नाही. तेव्हा राघव कितीही कळकळून सर्वांना सांगत होता. पाया पडत होता. रडत होता. पण कोणीही त्याचे मत ऐकून घेत नव्हते. शेवटी व्हायचे तेच झाले. कोणतीही चौकशी न करता त्याला कॉलेजमधून काढून टाकले. त्याला कोणत्याही कॉलेजमध्ये प्रवेश मिळणार नाही असा शेरा पत्रात देण्यात आला. पत्र त्याच्या हातात देत प्रिन्सीपॉल म्हणाले, राघव तुझ्याकडून मला ही अपेक्षा नव्हती. असे घृणीत कृत्य कॉलेजमध्ये मला चालणार नाही. याचा परिणाम इतर विद्यार्थ्यांवर होईल त्याचे काय? हे ऐकताच राघवच्या पायाखालची जमिन सरकल्यासारखी झाली. त्याच्या मेंदुला झिंजण्या आल्यासारखे झाले. त्याचा चेहरा एकदम गंभीर झाला. त्याने प्रिन्सीपॉल सरांचे पाय धरले. विनवणी केली सर असं करु नका मला खुप शिकायचे आहे. माझ्या आयुष्याचा विचार करा. त्याचा काही उपयोग झाला नाही. तो शांत झाला एका क्षणात होत्याचं नव्हतं झालं. आज सरस्वती देवी त्याच्यावर नाराज झाली होती. या नेहाने माझा कोणत्या जन्माचा बदला घेतला होता. मला आयुष्यातून उठवले होते. याचवर्षी बाबा गेले. ते जाताना मी त्यांना शब्द दिला होता. मी पुढे खुप शिकेन. मी सी.ए. करीन. पण आता ते स्वप्न म्हणून राहिले. आई माझी सी.ए. होण्याची वाट पाहत आहे. मी सर्वांना नाराज केले. अशा अनेक विचारांनी त्याच्या मेंदूचा भुसा झाला. त्याचे सारे शरिर जड झाले होते. मेंदू सुन्न झाला होता. पायातली शक्तीच गेली होती. तो खाली मान घालून घरी आला. घरी पोहचताच आईने विचारले, अरे राघव किती उशीर मी केव्हाची वाट पाहतेय. तो आईला नजर न देता खाली मान घालून आपल्या खोलीत निघून गेला. आईने त्याला पाणी दिले. पण त्याचा उतरलेला चेहरा पाहून आईला काळजी वाटली. त्याचा निस्तेज चेहरा पाहून त्यांनी विचारले राघव काय झाल? तू असा नाराज का? आईकडे बघून त्याला एकदम गहीवरुन आले. त्याने आईला मिठीच मारली. व म्हणाला आई सारं संपल ग. माझ शिक्षण इथेच थांबलं. तुझ मोठं माणूस होण्याचं स्वप्न आता कधीच पुरे होणार नाही. आई तु विसरुन जा. अरे पण काय झाले. ते तरी नीट सांग. तो रडून शांत झाल्यावर झालेला प्रकार त्याने आईला सांगितला. त्याची आई त्याला म्हणाली चल मी येते सरांशी बोलायला. तो म्हणाला नाही आई आता

नको सगळं सांगून झालं. तेव्हा ती तरातरा उठून नेहाच्या घरी गेली. तिने तिच्या दोन थोबाडीत मारल्या आणि विचारलं खरं सांग राघवने तुला काही केलं होतं. तिने नुसतीच मान हलवून नाही सांगितले. तुला कधी त्रास दिला होता. नाही कदापि नाही. मग तु असं का केलस ? त्या नेहाला खूप बोलल्या पण ती गप्पच होती. हे सर्व ऐकून तिच्या मामीने तिला खूप मारले. व उद्यापासून तुझे कॉलेज बंद करते. मग तर झालं हिच तुला शिक्षा. मामीने तिला दम दिला. मामीच्या बोलण्याने नेहा आतून घाबरली. तिला कल्पना आली नाही हे प्रकरण इतके विकोपाला जाईल.

आता या घटनेला तीन आठवडे झाले. इकडे राघव घरात एकटाच बसून होता. त्याचे कोणीही मित्र त्याच्याकडे फिरकले नाहीत. मनिषाताई त्याला गावी कोकणात जाण्याबद्दल रोज थोडं थोडं बोलतं करुन तयारी करीत होत्या. गावी तसं एक मोठ एक मजली घर होतं. शेती होती आणि तुझ्या बाबांचे एकमेव मित्र सखाराम काका गावाला आहेत. त्यांनी तुझ्या बाबांना केव्हा सांगून ठेवलं आहे. की त्यांच्या कारखान्याचा व्याप खूप मोठा आहे. त्यांना मुलबाळ नाही. त्यांच्याकडे गडगंज संपत्ती आहे पण ती सांभाळायला हिशेब किताब लिहायला कोणी विश्वासू माणूस त्यांना हवा आहे. हे त्यांनी तुझ्यात पाहिले आहे. आपण गणपतीला गावी जातो तेव्हा ते नेहमी तुझ्याबद्दल आमच्या जवळ बोलत. तेव्हा राघव यापुढे तुला दोन मार्ग आहेत नोकरी किंवा बिझनेस दोन्ही मार्गाने यशाच्या शिखरावर जाऊ शकशील. तू हताश होऊ नकोस. झालं गेलं विसरुन जा. सर्व काही ठीक होईल. मनामध्ये निश्चय कर या जगाला दाखवून दे, माणसाच्या जीवनात चढउताराच्या लाटा तरंगतात. त्यातून मार्ग काढायचा असतो. कदाचित तुझा टर्निंग पॉईट असेल. मनिषाताई त्याला दररोज आधाराचे ज्ञानामृत देत असत. एकूण सारासार विचार करुन मनाशी काहीसा निश्चय करुन गावी जाण्यास तो तयार झाला. त्यामुळे मनिषाताईच्या मनातील चिंतेचे ढग वितळून गेले.

राघव गावी पोहचला. तो सखाराम काकाच्या घरी आला. काकांना मनिषताई व राघवला पाहताच खूप बरे वाटले. काकांनी लगेच राघवला दोन तीन दिवस आपला बिझनेस कसा करायचा त्यात महत्वाचे काय बघायचे, येणाऱ्या माणसांचे कसे संबंध ठेवायचे. माणसं कशी सांभाळायची एक ना अनेक गोष्टी व त्यातील अडी-अडचणी त्याला समजावून सांगत होते. हळूहळू तुला सारे समजेल. तुला जे समजणार नाही ते मला विचार मी सांगेन पण काम करताना सर्व काही लक्षात येईल तुझ्या. राघव मुळात हुशार असल्यामुळे त्याला लवकर समजत असे. आणि तो लक्ष देऊन ऐकत असे. मनापासून त्याने ती गोष्ट स्वत:च अंगिकारली. त्यामुळे मनिषाताई खुष होत्या. शेतावरचे काम पाहणारा जयराम त्याचा नोकर होता. त्याच्या मदतीने कामाकडे लक्ष देऊ लागला. त्यामुळे सखाराम काकांना बरे वाटले. हळूहळू राघव मागे झालेल्या घटना विसरु लागला. मनाला दुषित करणारे विचार त्याच्या मनपटलावरुन पुसट होत होते.

जसजसे दिवस जात होते तसतसा सखाराम काकांचा राघव वर विश्वास बसत चालला होता. त्याचे पारदर्शी मन काकांनी ओळखले होते. त्याच्या विचारांची उंची त्याच्या बोलण्यातून व कृतीतून नेहमी झळकत होती. राघव हुशार तर होताच पण अतोनात कष्ट करण्याची जिद्द त्याच्यात दिसत होती. कोणतेही काम तो मनापासून करीत होता. हाताखालील नोकरांना अतिशय मृदूभाषेत समजून सांगत होता. काका त्याच्या कामावर खूप खुष होते. त्यांनी मनिषाताईचे खूप आभार मानले.

आपल्या मुलाला जगण्याची दिशा मिळाली या विचाराने त्यांचे मन सुखावले. राघवकडे पाहून त्यांच्याशी बोलताना मनिषाताईनी त्याच्या मनाला झालेल्या जिव्हारी जखमांवर सुखाचा मलम लावून त्यापासून मिळणाऱ्या आनंदाने त्यांच्या चेहरा उजळला होता. राघवला काकांच्या सहवासाचा ओलावा मिळाल्याने त्याचे जीवन फुलून गेले होते. उत्साहित मनाने तो कामात मग्न झाला होता. आपल्या जीवनात आलेल्या वादळातून तो स्थिरावला होता. जीवनाची वावटळ शांत झाली होती.

राघवला गावाला येऊन पाच वर्ष पूर्ण झाली. राघव आणि मनिषाताई आता त्या गावच्याच झाल्या होत्या. राघवही आपल्या कामात पुर्ण मग्न होऊन गेला होता. त्याने काकांचा बिझनेस वाढवला होता. त्याची मोठ्या उद्योगपतीशी नेहमीच उठबस होऊ लागली. रोज वेगवेगळे प्रोजेक्टर चर्चा, मिटिंग होऊ लागली. बाजारपेठेत त्याच्या कंपनीचे नाव झळकू लागले. व्यापार जगतात त्याचं नाव झालं होतं. बिझनेसमध्ये त्याने प्रगती केली. यशोशिखरावर त्याच्या कंपनीची पताका झळकत होती. त्यामुळे सखाराम काका त्याच्या प्रगतीवर खूष होते.



त्यांनी मनोमन देवाचे आभार मानले.

एके दिवशी मनिषाताई एकट्याच बसल्या होत्या. या संधीचा उपयोग करुन घ्यावा म्हणून सखाराम काका मनिषाताईकडे वळून म्हणाले, वहिनी माझे मित्र राजेंद्र बाबु फार मोठे व्यापारी आहेत. त्यांची मुलगी चांगली शिकलेली आहे. घरंदाज, सुसंस्कृत, सुशील मुलगी आहे. दिसायलाही सुंदर व सालस आहे. ते परवा मला भेटले व म्हणाले त्यांना राघव खूप आवडतो. त्याच ते नेहमी कौतुक करतात. त्यांच्या मुलीसाठी ते राघवला विचारत होते. तेव्हा वहिनी तुमचा काय विचार आहे? मनिषाताई म्हणाल्या, भावोजी तुम्ही त्याला मुलगा मानता. तो तुमचा मानस मुलगा आहे. तुम्ही जे कराल ते योग्यच कराल ही माझी खात्री आहे. तुमचे उपकार कसे मानू तेच समजत नाही. बघा वहिनी, उपकार करीत नाही. माझा हा धर्म आहे. राघवचे वडिल व माझ्यात बंधुत्वाचे नाते होते. तेव्हा तुम्ही उपकाराची भाषा करु नका. हक्काने मला सांगा काही अडचण असेल ते ही मनसोक्त सांगा, मनात काही ठेवू नका. ठीक आहे भावोजी, तुम्ही म्हणता त्याप्रमाणे मुलगी पाहू या. काकांनी मुलगी पाहण्याचा कार्यक्रम एका दिवशी ठरवला.मनिषाताई आनंदी आणि उत्साही वाटत होत्या. त्यांच्या अंगावर आता भरजरी साड्या झळकत होत्या. दोन-चार दागिन्यांनी शरीर मढविले होतं. त्यांच्या उत्साह ओसंडून वाहत होता. त्या काकांच्या गाडीतून शहरातून फिरत होत्या. आपल्या मुलाच्या पुण्याईमुळे त्यांना हे वैभव प्राप्त झाले होते. राघवच्या यशाची घोडदौड चालुच होती. मुलीला पाहण्याचा कार्यक्रम पार पडला. सर्वांनाच मुलगी पसंत पडली. येणाऱ्या दोन-तीन महिन्यातच विवाह करण्याचे सर्वानुमते ठरले. सखाराम काका ही खूष होते. त्यांनी आपल्या मनातील इच्छा बोलुन दाखविली की राघवचे लग्न खूप धुमधडाक्यात करायचे. सर्वांना आमंत्रण करायचे. लोकांच्या लक्षात राहीले पाहिजे. असा समारंभ करायचा. त्यासाठी राघवचा विचार घेतला. नवीन बंगल्याची सजावट करण्यात आली. मनिषाताईची धांदल सुरु होती. त्यांनी आपल्या नणंदा व भावजयांना लग्नाचे आमंत्रण पाठविले आणि चार दिवस आधी येण्याची सुचना दिली. लग्नाचा मुहूर्त जसा जवळ येत चालला तसे मनिषाताईना काळजी वाटू लागली. पण मनिषाताईची नणंद व इतर मैत्रिणी बरोबर असल्यामुळे ती सर्वजण कामात हुशार असल्यामुळे कामाला भराभर सुरुवात

झाली. बोलता-बोलता लग्न येऊन ठेपले. सखाराम काका स्वतः जातीने सर्वांवर लक्ष ठेवून होते. आणि स्वतः ही उत्साहाने भाग घेत होते. काका म्हणाले लग्न खूप थाटात करायचे. आता खरी बंगल्याला शोभा येईल. मुलीच्या अंगावर कोणते दागिने घालायचे ते काकांनी सांगितले. चांदीने बनविलेल्या पैठण्या, सोन्याचे दागिने तोडे, नाका,कानातील दागिने, सोन्याचा चंद्रहार, पाटल्या, इ. मनिषाताईनी नणदेच्या मदतीने शालुची उंची वस्त्राची खरेदी केली.

लग्नाचा दिवस उजाडला. बंगल्यात गडबड सुरु होती. लग्नाचा सोहळा श्रीमंती थाटात धडाकेवाज दिसत होता. राघव एखाद्या राजपुत्रासारखा सजला होता. नवरी मुलगी सुंदर लावण्यवती राजकन्येसारखी दिसत होती. त्यात सोन्याच्या दागिन्यांनी नखाशिखान्त झालेली त्यामुळे तिची कांती अधिकच खुलून दिसत होती. लग्नाला खूप गर्दी झाली होती. बरेच मान्यवर व श्रीमंत उद्योगपती प्रतिष्ठीत लोकांनी हॉल भरला होता. चहुबाजूंनी सुगंध दरवळत होता. सर्वाचे चेहरे हसरे व आनंदी दिसत होते. खरच राघवने नशिब काढले होते. पण आज मनिषाताईना यजमानांची आठवण झाली होती. राघवने कष्टाने उद्योग जगतात आपले नाव रोशन केले होते. मानसी त्याच्यावर खूप खुष झाली होती. लग्न सोहळा उत्तम झोकात पार पडला. सर्व प्रतिष्ठीत लोक तृप्त होऊन आशिर्वाद देऊन निघून गेले. लग्नाच्या सोहळ्यातून राघव मोकळा झाला. लग्नानंतर लगेच दहा-बारा दिवसात तो आपल्या कामाला लागला.

राघव एके दिवशी आपल्या कारमधून कामाची पाहणी करण्यासाठी जात असताना त्याचवेळी त्याचे जुने शेजारी लिमये काका त्याला भेटले. त्यांना भेटून त्याला खूप आनंद झाला. एकमेकांची खुशाली विचारुन झाली. लिमये काकांनी नेहाचा विषय काढला. जुन्या आठवणींना उजाळा मिळाला. अरे नेहाचे लग्न झाले. तिचे मामा अकस्मित वारले. मग काय मामीचं घरावर संपुर्ण राज्य. मामीने एका वयस्कर माणसाशी नेहाच लग्न लावून दिलं. त्याला आधीची दोन मुले, पैशापोटी मामीने नेहाचा सौदा केला. नेहाचे दिवस फिरले. नशिबाने दगा दिला. तिचा नवरा संशयी निघाला. एकदाच ती माहेरी आली. नंतर परत आलीच नाही. तिने खूप वाईट केलं. परमेश्वराने तिला ही शिक्षा या जन्मीच दिली. त्यावर राघव म्हणाला, नाही काका असं म्हणू नका, माझ्या नशिबात होतं ते घडलं तिला काय दोष देऊ. माझी कर्म शुध्दी झाली. माझ चांगलं झालं. आता तिचं ही चांगल होऊ दे.असं म्हणत त्याने काकांना नमस्कार केला आणि घरी येण्याचे आमंत्रण दिले. राघवने दाखविलेला मोठेपणा, दिलदार स्वभावाचे त्यांना दर्शन घडले. अन भारावून ते आपल्या घराकडे वळले. ⬟

## आपले घर कसे सुंदर ठेवावे

घर म्हटले की, पसारा आलाच. पण तो पसारा वेळीच आवरला तर घर सुंदर राहते व सुंदर दिसते. त्यासाठी घरातील सर्वांनी आपापली कामे वेळीच केली तर घरात पसारा दिसत नाही. सकाळी झोपेतून उठताच प्रत्येकाने आपापल्या अंथरुण-पांघरुणाच्या घड्या घालून ठेवाव्यात. कपडे बदलल्यानंतर अंगावरील काढलेले कपडे व्यवस्थित घड्या घालून जागच्या जागी ठेवावेत. यामुळे नंतर ते शोधणे कठीण जात नाही. शाळा-कॉलेजमध्ये शिकणाऱ्यांनी आपल्या अभ्यासाचे सारे साहित्य व्यवस्थित ठेवावे. नाश्ता केल्यानंतर वापरलेली भांडी साफ करुन ठेवावीत. नाहीतर एका जागी जमा करुन ठेवावीत. साजशृंगाराच्या ज्या वस्तू वापरतो त्या वापरल्यानंतर जागेवर ठेवाव्या. शाम्पुचे पाऊच, साबणाचे वेस्टन वेळीच डस्टबीनमध्ये टाकावे. किचनमधील खाद्यसामुग्री वापरल्यानंतर त्याचे डबे जागेवर ठेवावेत. ओट्यावर व सिंकमध्ये खरकटे पडले असेल तर साफ करावे. सुट्टीच्या दिवशी घरातील जाळ्या झाडणे, किचनच्या कपाटातील कागद बदलणे, फरशी पुसणे, अंगण स्वच्छ करणे इ. कामे करावीत. अशा पध्दतीने आपले घर स्वच्छ व सुंदर ठेवावे.




# पैसा झाला मोठा

- विठ्ठल महिपती कुसाळे
गोरेगाव (पू.) मुंबई

असे म्हटले जाते की, माणसाला सर्व सोंगे घेता येतात पण पैशाचे सोंग घेता येत नाही. आजच्या एकविसाव्या शतकाचा विचार केला तर पैशाला प्राप्त झालेले मोल हे परमेश्वरा इतकेच किंबहुना काहींना परमेश्वराहून अधिक प्राप्त झालेले आढळते. याचे कारण पैसा झाला मोठा. असे स्वरुप आज पैशाला प्राप्त झाले आहे. पुर्वीच्या काळी एकत्र कुटुंब पध्दत होती. त्यामुळे कुटुंबात एकमेकास आधार असे. अलिकडच्या काळात एकत्र कुटुंब पध्दतीचा ऱ्हास झाल्याने विभक्त कुटुंब पध्दत आली. त्याचबरोबर अनेक समस्या आणि अडचणीही उभ्या राहिल्या. यामुळे माणसावर अधिकाधिक जबबादाऱ्या लवकर येऊ लागल्या. आणि त्या त्याला पार पाडावा लागू लागल्या. जबाबदाऱ्या पार पाडत असताना माणसाच्या मनात लोभ निर्माण झाला. आणि गरजेपेक्षा अधिक पैसा, मालमत्ता याला तो महत्व देऊ लागला. पैशाला प्रमाणापेक्षा मोल प्राप्त झाल्याने नात्या-नात्यातली एकता, आपुलकी, स्नेह मागे पडू लागला. आणि स्वार्थ, स्वामित्व या गोष्टींना महत्व प्राप्त होऊ लागले. रक्ताची नाती, मानलेली नाती पैशाच्या आहारी जाऊ लागल्याने नात्याचे घट्ट बंध सैल होऊ लागले. त्यामुळे माणसापेक्षा पैसा मोठा होऊ लागला.

अन्न, वस्त्र, निवारा याच मानवाच्या प्राथमिक गरजा न राहता त्यात मोठ्या प्रमाणात भर पडू लागल्याने मानवाच्या जीवनात पैशाला अनन्यसाधारण महत्व प्राप्त होऊ लागले. पुर्वीच्या काळी मानवाच्या मर्यादित स्वरुपाच्या गरजा असत. आज मात्र त्या गरजा अमर्यादित स्वरुपाच्या बनल्याने पैशाला अनन्यसाधारण महत्व प्राप्त झाले. आणि असा हा पैसा प्राप्त करण्यासाठी प्रसंगी कुमार्गाचा अवलंब मानव करु लागला. त्यामुळे मानवाच्या जीवनात अशांततेचे वादळ निर्माण होऊ लागले. आणि सामाजिक समस्यांना मोठ्या प्रमाणात ऊत येऊ लागला. समाजात मोठ्या प्रमाणात गुन्हेगारीचे प्रमाण वाढू लागल्याने सामाजिक शांततेला बाधा निर्माण होऊ लागली. आणि सामजिक अशांतता हा एक यक्षप्रश्न माणसासमोर उभा राहिला. या साऱ्याचं मुळ पैसाच कारणीभूत ठरु लागला. कारण पैसा झाला मोठा.

आजच्या महागाईच्या काळात सर्वसामान्यालाच नव्हे तर मध्यमवर्गीयालाही जीवन जगताना जणू कसरतच करावी लागते. ही कसरत काहीना झेपते तर काहीना झेपत नाही. कसरतीपायी अनेकांची दमछाक होते आणि प्रसंगी अनेकांचा जीवन प्रवासही थांबतो. इतका पैसा मोठा झाला आहे. असे खेदाने म्हणावे लागते. काहीना या पैशाच्या मोठेपणाने इतके झपाटलेले असते की, त्याच्या ते आहारी जातात आणि आपल्यासाठी पैसा हे ते विसरतात आणि जणू पैशासाठी आपण या कटू सत्याला सामोरे जातात. आणि सर्वस्व गमावून बसतात. याचा अर्थ पैसा असणे वाईट नव्हे. तो असायलाच हवा. मात्र तो आपण कसा प्राप्त करतो यालाही प्राधान्य द्यायला हवे. सन्मार्गाऐवजी कुमार्गाचा अवलंब करुन माया जमा केली तर ती माया समाधान देईलच असे नाही. यासाठी प्रामाणिक आणि सन्मार्गाने प्राप्त केलेला पैसा जसा मनाला समाधान देऊन जातो. तसा कुमार्गाने मिळविलेला पैसा माणसाच्या मनाला वेदना दिल्याशिवाय राहत नाही. यासाठी पैसा संपादनात सन्मार्गाला प्राधान्य द्यायला हवे. बचत, काटकसर, योग्य नियोजन आणि योग्य गुंतवणूक यांनी देखील लक्ष्मी वृध्दीत भर पडून माणूस सधन होतो. सोबतीला माणसाचा प्रामाणिकपणा, कष्टाळू वृत्ती आणि आत्मविश्वास असेल तर माणूस सधन व्हायला वेळ लागत नाही. तेव्हा त्याच्या जीवनात खऱ्या अर्थाने पैसा मोठा झाल्याचे दिसून येते.

"थेंबे थेंबे तळे साचे" असे म्हटले जाते. आपल्या कुवतीनुसार खर्च करुन आपण बचतीची सवय लावून घेतली पाहिजे. काटकसरीने वागून आपल्या आर्थिक मिळकतीतूनही आपण बचत करु शकतो. ही बचत झटपट श्रीमंत होणारी नसावी. नाहीतर अनेक जण फसल्याची उदाहरणे आपल्या अवतीभोवती ऐकायला, अनुभवायला आढळतात. स्वत:च्या, दुसऱ्याच्या अनुभवातून या गोष्टी शिकल्या पाहिजेत आणि फसव्या योजनांपासून आपण दूर राहिले पाहिजे. कमी श्रमात, कमी वेळेत अधिक मोबदला अशा प्रलोभनांना बळी पडता कामा नये. विश्वासाची, अधिकृत, सरकारी योजनांमधून आपण केलेली गुंतवणूक कमी परतावा देणारी असली तरी ती भरवशाची असते म्हणून तिला प्राधान्य द्यायला हवे. "देरे हरी पलंगावरी" असेही म्हणून बेफिकीर राहून नशिबावर, दैवावर हवाला ठेवून आपली आर्थिक प्रगती होणार नाही. त्यासाठी आपले कर्तृत्व, कार्य मोलाचे ठरते. आळस झटकून आपण कार्य केले पाहिजे. तारुण्यात सदाचाराने वागून स्वावलंबी जीवनाचा मार्ग सुकर केला पाहिजे. व्यक्तीच्या जीवनात शालेय, महाविद्यालयीन शिक्षणानंतर येणारे तारुण्य जीवन प्रतिकुल परिस्थिती संपवण्यासाठी अविश्रांत परिश्रम केले पाहिजेत. आणि स्वयंविकास साधून राष्ट्रविकासाला हातभार लावला पाहिजे. स्वयंविकासातून राष्ट्रविकास साधला जातो. याचेही भान ठेवायला पाहिजे. तारुण्यात अधिक प्रयत्न, कष्ट, मेहनत घेऊन व्यसनांपासून दूर राहून, सदाचाराने वागून प्रयत्न केल्यास आपला जीवन मंदिराचा कळस उभा राहू शकतो. यावर विश्वास ठेवायला हवा. तेव्हा खऱ्या अर्थाने पैसा मोठा झाल्याचे प्रत्यंतर आपणास येईल.

पुर्वीच्या काळी कर्ज घेणे हे कमीपणाचे, लाजिरवाणे मानले जात असे. आज मात्र कर्ज घेऊन ऐषआरामी जीवन जगण्याकडे अनेकांचा कल असतो. कर्ज घेणे वाईट नसते. पण घेतलेल्या कर्जाची परतफेड वेळेत होईल की नाही हेही तितकेच महत्वाचे असते. अनेकांच्या जीवनात घेतलेल्या कर्जाची परतफेड वेळेत न झाल्याने अडचणी उभ्या राहतात. आणि कर्जाचा डोंगर उभा राहिल्याने भयंकर परिस्थितीला सामोरे जावे लागते. आपल्याला पचेल, रुचेल इतकेच अन्न घ्यावे हे जसे मोलाचे तसेच आपल्या मिळकतीनुसार, उत्पन्नानुसार कर्ज घेणे आणि त्याची परतफेड वेळेत करणे हे ही महत्वाचे ठरते. यासाठी कर्ज देणाऱ्या खाजगी, सार्वजनिक संस्था मोठ्या प्रमाणात असल्या तरी आपण कर्जाची परतफेड करु शकतो का? याचे भान ठेवून कर्ज घेतल्यास कर्ज अपायकारक न ठरता उपायकारक ठरेल यात शंकात नाही. आजच्या काळात पैसा ही मानवाची प्रमुख गरज असली तरी या गरजेला किती प्राधान्य द्यायचे हे शेवटी ज्याच्या-त्याच्यावर अवलंबून राहते. पैशाचे मोल आपणास मान्यच करुन तो प्राप्त करण्यासाठीचा आपला मार्ग कोणता यावर तो आपणास सुख की दु:ख देईल हे ठरत असल्याने सदाचाराचाच मार्ग योग्य असेल हे निश्चितच. शेवटी म्हणावेसे वाटते,

पैसा जरी झाला मोठा, तरी माणुसकी विसरु नका,  
सुख लाभते पैशानेचे असे मात्र म्हणू नका.  
गरिबातला गरीबही असतो सदासुखी  
श्रीमंतातला श्रीमंतही राहतो सदादु:खी.  
असा असतो पैसा दुधारी शस्त्रासम  
जपून त्याचा वापर कर, मानवा जपून त्यास वापर




**- सुमन कढणे**
कल्याण (प.)

एक वळण घेवून टॅक्सी मुंबई सेंट्रल स्टेशनमध्ये शिरली. टॅक्सी थांबताच मी घाई-घाईने टॅक्सीवाल्याला पैसे देऊन स्टेशनमध्ये शिरले. तसा गाडीला उशिर होता पण एकदाचे आपल्या सीटवर जावून बसलेले बरे म्हणून सरळ प्लॅटफॉर्म गाठले. तसा पश्चिम रेल्वेचा प्रवास करणे बरे असते. मध्य रेल्वेने प्रवास करणे फारच कटकटीचे म्हणून मी नेहमी पश्चिम रेल्वेनेच इंदुरचा प्रवास करते. प्लॅटफॉर्मवर एक्स्प्रेस उभीच होती. डबा शोधून दरवाज्याजवळच्या लिस्टमध्ये नाव शोधून खात्री करुन घेतली. सीटवर जावून बसले. शेजारी एक जोडपे बसले होते. दोघेही गप्पात रंगले होते. त्यांचे माझ्याकडे लक्षही नव्हते. मलाही प्रवासात गप्पा मारायची सवय आहे म्हणून म्हटलं बघूया समोर बाकावर कोण येतय बसायला? कारण सध्यातरी तो रिकामाच होता. सामान वरच्या बर्थवर ठेवून थोडसं पाणी प्याले व डोळे मिटून शांत बसले. एकटं असलं की मनाची दारं किलकिली होतात. मागच्या आठवणी पाऊल न वाजविता एक-एक बाहेर येऊ लागतात. अंधारत वस्ती केलेलं मन प्रकाशरेषा घेवून येतं गतकालाची चित्र रेखाटत बसतं.

इंदुरच्या वामनराव शिंदेच्या घरी लग्न करुन आले. तिच घरची कर्ती स्त्री म्हणून. कारण वामनरावांचे आई-वडिल नव्हते. दोन दीर व एक नणंद साऱ्यांची जबाबदारी आम्हा दोघांवर होती. त्यामुळे वामनरावांना तर अकाली प्रौढत्व आलेले. मी त्यांचे सारे करण्यात स्वत:चे अस्तित्व विसरुन गेले. त्यामुळे माझं भावविश्व झाकळुन गेलेले. कर्तव्याच्या बंधनातही आमचं कुटुंब आनंदी होत. वसंत आल्यावर पालवी फुटावी तसा आमच्या संसारात मंदार, तुषार या पुत्रांनी प्रवेश केला. मंदार व तुषार आल्यामुळे आम्ही मधुर भावबंधनात बांधले गेलो. जीवनाला व व्यवसायालाही स्थिरता येवून सारे सुरळीत झाले. व्यवसाय भराभराटीने चालू लागला. दीर, नणंद यांनाही मार्गी लावले. मी सौख्य उपभोगत होते. मला तर मातृत्वाने पुर्णत्व आले होते. सुखचंद्राची पौर्णिमा झाली होती.

मंदार, तुषार मोठे झाले, शिकले. दोघांनाही फेलोशिप मिळाली. मोठा मंदार पी.एच.डी. करुन सेंटर फॉर ॲडव्हान्स टेक्नॉलॉजी इंदुर येथे शास्त्रज्ञ झालेला. त्याच्या अनेक विदेश

वाऱ्या त्याला मिळालेले देश, विदेशातील मानमरातब हे पाहून तर माझ्या भाग्याला कक्षाच उरल्या नव्हत्या. त्याच्याच पावलावर पाऊल ठेवून तुषारही जीवशास्त्राच्या संशोधनासाठी जपानला रवाना झाला. त्याला एअरपोर्टवर सोडून मी घरी परतत होते. मी कृतकृत्या होते.

समोरच्या बाकावर बसण्यासाठी कुणीतरी येत होतं. नजर तिकडे वळली आणि माझा श्वासच थांबला. अवाक होऊन मी पाहतच राहिले. येणारा दिवाकर होता. होय तो दिवाकरच होता. हळूहळू तो माझ्या समोर आला. तेच त्याचं भारदस्त व्यक्तीमत्व, सात्विकतेचे तेज असलेल्या त्याच्या चेहऱ्याकडे मी पाणावल्या डोळ्यांनी अबोली होऊन पाहत होते. वाटले उठून त्याच्याकडे झेप घ्यावी. तो ही मला पाहून विचलित झाला. थोडं सावरुन लगेच मागे वळून म्हणाला, ए सरु तु बैस इकडे रिमाला खिडकीजवळ बसू दे. सरु म्हणजे त्याची पत्नी असावी. रिमा त्याची मुलगी असणार कारण दिवाकरचाच चेहरा घेवून जन्मलेली वाटत होती. त्याने मला ओळखले पण ओळख दिली नाही. मी पण स्वत :ला सावरले. दिवाकरने सामान वर ठेवले. रिमा खिडकीतून बाहेर पाहण्यात दंग झाली. थोड्या वेळाने सरु पण पुस्तक काढून वाचत बसली. दिवाकर मात्र डोळे बंद करुन मागे टेकून बसला होता. गाडीने बरोबर ७.३० वा प्लॅटफॉर्म सोडला. मी हळूच दिवाकरकडे पाहिलं. त्याचं मौन मला सांगत होत, बाजारी जगात जगताना तू दूर असतानाही तुझ्या स्मृतीची निरांजन माझ्या मन मंदिरात तेवत होती. त्याचे डोळे पाणावले पण पापण्यांनी अश्रुंना वाट दिली नाही. अश्रू तिथेच थांबले. मला एकदम आठवण झाली. आणि भयाने माझे डोळे भरुन आले. मन थरारलं. अरे बापरे! कुणाचा मृत्यू जवळ आला आहे माझा की दिवाकरचा. आमचं गाव छोटं तिथे हायस्कूल नव्हतं. म्हणून मी आठवी पासून मामाकडे शिकायला राहिले. मामाची दोन मुले व शेजारचा दिवाकर आम्ही सारे एकत्र अभ्यास करीत असत. मामाचा मुलगा चंदूदादा व दिवाकर अकरावीला होते. मी आठवीला आणि मामाची मुलगी चारुलता ७ वीत होती. आम्ही चौघेही मिळून खूप मस्ती करायचो. तसा दिवाकर जरा शांतच होता. आम्ही त्याची फिरकी घ्यायचो पण तो कधी चिडला नाही. मामी काही माझ्याशी नीट वागत नसे. कधी-कधी मी गुपचून रडायचे. दिवाकर माझी समजूत काढायचा. शिक्षण पुर्ण झाले पाहिजे म्हणून मला हे सारं सहन करावेच लागेल हे पटवून द्यायचा. त्याची आपुलकी मला हवीहवीशी वाटायची. मी परत अभ्यासाला लागायचे. दिवाकर नेहमीच मला मदत करायचा प्रत्येक गोष्टीची दखल घ्यायचा. तिथे तोच एक मला माझा आहे असे वाटायचे.

दिवाकरच्या मदतीने अभ्यास करुन मी १० वी चांगल्या गुणांनी पास झाले. आप्पा म्हणजे वडिल आईला म्हणाले बर का, सुप्रभाला १२ वी होवू द्यावी. नंतर बघूया या लग्नाचं. त्यावर आई म्हणाली, हो तिचा अभ्यासही चांगला आहे. आणि अजुन ती लहानही आहे. एकदा का प्रपंचात पडले की संपले. चुल नि मूल यात अडकायचेच आहे. आमची रवानगी परत दोन वर्षासाठी मामाकडे झाली. का कोण जाणे पण मला आनंद झाला. अकरावील मी एन.सी.सी घेतले. दिवाकरही एन. सी.सी. ला होता. चंदुदादाने एन.सी.सी. नाही घेतले. त्याला ते झेपले नसते. त्यावर्षी २६ जानेवारीला आमची परेड होती. प्रॅक्टीस साठी जाताना दिवाकर व मी रोज भेटत असत. हळूहळू एक अनामिक बंध आमच्यात निर्माण झाला होता. २६ जानेवारीला आमचा बक्षिस समारंभ झाला.दिवाकरला दोन बक्षिसे मिळाली मला एक कप मिळाला. एन.सी.सी. चे कडक इस्त्रीचे कपडे घातलेली मी कप घेऊन ऐटीत कॉलेजच्या गेटकडे गेले. दिवाकर गेटवर माझी वाट

पाहत उभा होता. मी धावतच कप दाखवायला त्याच्याकडे गेले. कप त्याच्या हातात देताना त्याची बोटं माझ्या बोटांना स्पर्शुन गेली. त्या स्पर्शातला फरक मला जाणवला. मी चटकन त्याच्याकडे पाहिले. त्याची नजर बरच काही सांगून गेली. नजरेवाटे कधी तो माझ्या ह्रदयात उतरला कळलेच नाही. ह्रदय धडधडत होते. नजरेची मिठी सुटत नव्हती. किती वेळ गेला कोण जाणे. भानावर आले. काही तरी वेगळं घडल होतं. अचानक दिवाकर मला वेगळा वाटला. मी लाजून घराकडे पावले टाकत निघाले. दिवाकर मागुन येतोय की नाही हे सुध्दा पाहिले नाही.

घरी कशी आले कळलेच नाही. मी पुर्ण दिवाकरमय झाले होते. एका गोड अनुभूतीच्या धुंदीत होते. डोळ्यासमोर दिवाकर असे. त्यामुळे कामात व अभ्यासात चुका होऊ लागल्या. एवढी मस्ती करणारी मी शांत-शांत बसू लागले. याची मला जाणीव झाली. मी ११ वाजता कॉलेजला जात असे. चंदुदादा व दिवाकर सकाळी कॉलेजला निघत. माझी पावले आपोआप गॅलरीकडे वळू लागत. गल्लीतून बाहेर पडताना दिवाकर एकदा वळून माझ्याकडे पाहायचा आणि मगच पुढे जायचा. एकदा चंदूदादा आजारी होता. मी कॉलेजला गेले तर दिवाकर गेटवर माझी वाट पाहत होता. मला कॉलेजला जाऊ न देता तो मला म्हणाला, सुप्रभा चल आपण कुठेतरी जाऊ मला तुझ्याशी बोलायचयं. मी मुकपणे त्याच्याबरोबर चालत राहिले. चालता-चालता आम्ही गावाबाहेरच्या अंबाबाईच्या देवळासमोर कधी येवून पोहचलो कळलेच नाही. दुपार होती त्यामुळे देवळात कुणीच नव्हते. दर्शन घेऊन आम्ही दक्षिण दरवाज्याच्या मंडपाखाली बसलो. दिवाकर समोर होता. आम्ही एकमेकांना बघत होतो. शब्दावाचून डोळे बरेच काही बोलत होते. कोणतेही वचन नाही, कबुलीही नाही तरीही सात जन्माचे नाते असावे असे जोडलो गेलो होतो. दिवाकरने देवळातून घेतलेला प्रसाद मला दिला. प्रसाद घेताना का कोण जाणे माझा हात थरथरला प्रसादाचा तुकडा खाली पडला. मी दचकून दिवाकरकडे पाहिले. तो हिरमुसला होऊन म्हणाला, सुप्रभा एक दिवस मलाही असच टाकू नकोस. कारण तुला सोडून जगणे मला शक्य होणार नाही. थोडावेळ शांततेत गेला. नंतर मी दिवाकरला म्हटलं चल घरी जाऊ या, मला खूप भिती वाटतेय. त्याने देवीच्या पायावरचे एक फुल उचलून घेतले होते. ते मला दिले. आम्ही घराच्या दिशेने निघालो.

सर्वजण रोज अभ्यास करत होतो. पण वागण्यात फरक पडला होता. दिवाकर अधिकच आपुलकीने वागत होता. तो अभ्यास करुन घरी जाताना माझ्या वहित एखादं सुगंधी फुल ठेवून जायचा. त्या फुलाच्या गंधाने गंधीत झालेली मी धुंदीतच जगत होते. मला मीच अनोळखी झाले होते. माझीच ओळख मी त्याच्या डोळ्यात शोधत होते. अभ्यासाला येताना त्याच्या आईने दिलेला खडीसाखरेचा तुकडा तो मला द्यायचा. साऱ्यांना चुकवून चोरुन खाताना माझी त्रेधा उडायची. एकदा खूप पाऊस पडत होता. कॉलेजला दिवाकर एकटाच आला होता. म्हणून आम्ही आंबाबाईच्या देवळात गेलो. पावसाने

चिंब भिजलो होतो. दर्शन घेऊन बाहेर मंडपाखाली उभे होतो. समोर नदी दुथडी भरुन वाहत होती. पावसाने झाडे, वेली भिजुन वाऱ्याने थरथरत होती. पाना-पानातून पाण्याच्या धारा बरसत होत्या. पावसाच्या धीरगंभीर आवाजाने आसमंत भरला होता. पृथ्वी आकाशाचे मिलन झाले होते. हा अजब सोहळा आम्ही डोळ्यात साठवित होतो. जीर्ण दगडी मंडपातून झिरपणारे पाणी आमच्या डोक्यावर अभिषेक करीत होते. आम्ही थंडीने कुडकुडत होतो. हळूच दिवाकर मला म्हणाला, बघ नदीचं पाणी वाढतय. हे असच वाढत जाव आणि आपण इथेच अडकून पडाव निघताच येवू नये. सातजन्म कारे मी हळूच म्हटल. दिवाकर प्रसन्नपणे हसला. आम्ही घराकडे निघालो. एकदा रंगपंचमी होती. सारे रंग खेळत होते. मी मात्र गॅलरीत उभी राहून पाहत होते. तेव्हा दिवाकर हळूच येवून कोणालाही न कळता माझ्या गाळाला गुलाल लावून गेला. आठवणीने अनेकदा तो गुलाल माझ्या गालावर प्रकटून गेला. बारावीच्या परिक्षा संपली. अप्पा मला न्यायला आले. मी जाणार म्हणजे दिवाकर व मी दूर होणार होतो. परंपरा, संस्कार यामुळे कुठल्याही अवस्थेत स्त्री स्वत : बद्दलचे निर्णय घ्यायला स्वतंत्र नसल्यामुळे आप्पांपुढे माझ्या प्रेमाची वाच्यता मी करु शकले नाही. दिवाकरही मर्यादा बाहेर जावू शकला नाही. कारण आम्हा दोघांनाही आमच्या घरच्यांनी स्विकारले नसते.

मी मामीला मैत्रिणीला भेटून येते सांगून अंबाबाईच्या देवळाकडे निघाले. दिवाकर माझ्या मागून नक्कीच येईल हे मला माहित होते. आम्ही अंबाबाईच्या देवळात गेलो दिवाकर व मी मुकपणे अंबाबाईचे दर्शन घेतले. माझ्या छोट्याशा भावविश्वाची सुरुवात व शेवट अंबाबाईसमोर व्हावा हा नियतीचा संकेत असावा. नदीच्या बाजुला टेकडीवर जाऊन बसलो. सूर्य मावळतीला झुकला होता. दिवाकर व मी एकमेकांना पाहत होतो. डोळ्यात साठवून घेत होतो. डोळ्यातील सरिता दुथडी भरुन वाहत होती. माझे अश्रु खाली गवताच्या पातीवर ओघळत होते. एक गवताच पातं मी उचललं. त्यावर माझा एक अश्रु थांबला होता. मावळत्या रवि किरणांनाच्या तेजाने चमकत होता. पण त्याला माहित नव्हत. रविकिरणाच्या मिलनाने त्याचं अस्तित्व संपणार होतं. माझ्या प्रेमासारखच या आश्रुलाही भूतभविष्य नव्हतं. फक्त होता वर्तमान सारं संपणार होतं. यापुढे मी जगणार होते फक्त डोळ्यात व हृदयात प्रतिबिंब जपत. दिवाकरचे गळ्यात रुतलेले कंपीत शब्द कानावर पडत होते. तो माझ्या केसातून हात फिरवत म्हणत होता. मला वाटतं आपण गेल्याजन्मी फार मोठं पाप केल असेल. म्हणून आपण एकत्र जगू शकत नाही. तू गेलीस तरीही मी तुला क्षणभरही विसरणार नाही. त्यामुळे आठवण्याचा प्रश्नच नाही. आपल्या प्रेमाचे अदृष्य बंध तोडून मागे वळून न पाहता जा. नविन जीवनाला सामोरी जा. माझ्या शुभेच्या तुझ्या पाठीशी सतत असतील. मी रोज देवाजवळ एकच मागणार आहे. की तुझा किंवा माझा मृत्यू होईल तेव्हा मात्र आपण एकमेकांजवळ असावे. दोघांच्या डोळ्यात लाली होती. मावळतीला लाल रंग आला होता. काही काळे ढग जमले होते. ढगांच्या लाल सोनेरी कडांमधून सूर्याची किरणे बाहेर पडत होती. सूर्य आपली किरणे काळ्या ढगांमधून सोडवून घेत मावळतीच्या प्रवासाला निघाला होता. दिवाकरनेही माझ्या केसातून फिरणारी आपली बोटे सोडवून घेतली. सूर्य अस्तगत झाला. दिवाकरही उठला विवष्ण मनाने मी दिवाकरच्या पायांना स्पर्श करुन नमस्कार केला आणि घराकडे निघाले. ज्या गतीने पाय शरीराला घराकडे नेत होते त्याच प्रतिगतीने माझे मन मागे दिवाकरकडे जात होते.

अचानक मोठा आवाज झाला. मी भानावर आले काय घडले ते कळेना. गाडीला मोठे धक्के बसते होते. मला आठवले दिवाकर माझ्याकडे झेपावला होता. नंतरचे काहीच आठवेना. मी शुध्दीवर आले तेव्हा हॉस्पीटलमध्ये होते. मंदार, हे माझ्याजवळ उभे होते. मी शुध्दीवर येताच सगळे आनंदले. गाडीला अपघात झाला होता. दिवाकर कुठे आहे त्याचे काय झाले कळेना. डोळ्यात अश्रु आले पण कुणाला विचारणार. मंदारचे शब्द शिश्यासारखे कानात गेले. आई आम्ही नशीबवान तू वाचलीस तू डब्याच्या ज्या पत्र्यात अडकली होतीस त्यात व तुझ्यामध्ये एक दुदैवी माणूस अडकला होता. अन्यथा तुला आम्ही दिसलो नसतो. तू जिवंत आहेस देवकृपा. पण तो माणूस मात्र गेला. संकट टळलं. मला सारं अनावर झाला. मी दिवाकरला गमावले होते. दिवाकर अस्तंगत झाला होता.




# सन्नाटा

- मयुर प्रकाश ढोलम
जोगेश्वरी, मुंबई

निरभ्र आकाश आणि वाळुत उमटणाऱ्या मजबुत व्यक्तीच्या पावलाचे ठसे आणि पिळदार देहाच्या सुंदर चेहऱ्याच्या व्यक्तीचे किनाऱ्यावर आगमन. किनाऱ्यावर उभ्या प्रत्येक गावातल्या व्यक्तीचे पावलाच्या ठश्यावर आणि पिळदार देहावर लक्ष आणि मग आकाशचे स्वागत. आकाशच्या स्वागतासाठी काही गावातली तरुण मंडळी आणि आकाशचा कर्मचारी वर्ग यांनी आकाशचे पुष्पहार घालून स्वागत केलं. आकाशनी सर्वांना आदरपूर्वक नमस्कार करुन तो किनाऱ्यालगतच्या थोड्या अंतरावर असलेल्या बंगल्यात त्याच्या निवासस्थानी पोहचला. जिथे जवळच आकाशच्या मोठ्या भावाने गावात मोठी जमिन हॉटेल व रिसॉटसाठी घेतली होती. व गावात त्याचे पहिलेच प्रोजेक्ट असल्या कारणाने आकाशला ही आपल्या शिक्षणाचा उपयोग भारतात तो ही गावा-गावात सुवता आणि पर्यटन व्यवसायाला चालना देण्यासाठी करायचा होता. म्हणून त्याने प्रथमच महाराष्ट्रातील बिटर या गावाच्या जमिनीवर प्रोजेक्टची सुरुवात करण्यास आला होता. त्याचे सर्व शिक्षण अमेरिकेत झाले होते. पण त्याला भारताची ओढ पुन्हा आपल्या देशात घेऊन आली होती. त्याच्या मोठ्या भावाचा हॉटेल रिसॉर्ट ह्याचा भारतात व परदेशात असा सगळीकडे पसरलेला मोठा व्यवसाय आहे. त्याच व्यवसायास हातभार लावण्यासाठी आकाश भारतात आला. आकाशनी दुसऱ्या दिवशी आपल्या कर्मचारी वर्गाला भावानी घेतलेली जमिन ज्यावर हॉटेल रिसॉर्ट उभारायचे होते. तेथे गावाचा फेरफटका मारण्यासाठी गाव जाणून घेण्यासाठी सगळ्यांना सकाळी आठ वाजता बोलावले. व तो आराम करण्यासाठी त्याच्या खोलीत निघून गेला.

आकाशचा दिनक्रम पहाटे पाचला सुरु होतो. तो पाचला उठतो आणि व्यायाम सुरु करतो. आकाशला कामधंद्याबरोबर व्यायाम आणि पोहण्याचीही भारी आवड असते. तो आठ वाजेपर्यंत तयार होऊन बंगल्याच्या खाली येतो. त्याचे पाच-सहा कर्मचारी व व्यवस्थापक सोबत असतात. तो त्याच्या व्यवस्थापकाबरोबर गाडीत बसतो. व गाडी सुरु होते.

व्यवस्थापकांनी गावाची माहिती सांगण्यास सुरुवात केली. गाडी थोडी पुढे जाते तोच गावातील काही विरोधक म्हणजे या प्रोजेक्टच्या विरोधातही काही गावकरी मंडळी आकाशची गाडी अडवतात. त्यांचा विरोध चालु असतो. आकाशही गाडी थांबवतो. व्यवस्थापक गाडीतून उतरतो. व त्यांना हात करुन शांत राहण्यासाठी सांगत असतो. तो त्यांना सांगतो तुमचे काही प्रश्न मागण्या, अडचणी असतील तर त्या आपण बोलुन बसून सोडाव्या असे विरोध आंदोलन करुन काय साध्य होणार.तेवढ्यात त्याला त्या गर्दीतून परशा-परशा अशी दोन व्यक्ती हाक मारतात. व त्यातील काही व्यक्तीत कुजबुज सुरु होते. व त्यांचा विरोध भांडण कमी होते. आकाशच्या कानावरही परशा परशा हाकेचा आवाज आलेला असतो. पण तो गावकऱ्याशी बोलण्यास सुरुवात करतो. त्यांना सांगतो आपण दुपारी बंगल्यावर या आपण तुमच्या सगळ्या प्रश्नांवर बसून मार्ग काढूया. लोक बाजुला होतात. आकाश गाडीत बसतो. व पुढे जातो. पण त्याला दोन चेहरे दिसतात ते त्याला जास्तच निरखून पाहत होते. व त्यातच परशाची साद त्याच्या कानात घुमते.

गावात तसे आता जुनी माणसे कमीचअसतात. भैया पाटलाच्या त्रासाला कंटाळून कितीतरी गावकऱ्यांनी गाव कधीच सोडले असते. त्यात परशाचे आई-वडिलही गाव सोडून गेलेले असतात. पण सलीम आणि लंगड्यानी परश्याला म्हणजे परश्यासारख्या दिसणाऱ्या आकाशला २० वर्षानी पहिले असते. व त्यांना क्षणात साऱ्या आठवणी डोळ्यासमोर अगदी आता घडल्यासारख्या उभ्या राहतात. व त्यांचे डोळे पाणावतात. ठरल्याप्रमाणे दुपारी गावातील काही मंडळी व त्यांच्या बरोबर सलीम व लंगड्या ही असतात. ही सर्व आकाशच्या बंगल्यावर येतात व गावात येणारा नवा प्रकल्प हॉटेल व रिसॉर्ट त्यामुळे गावातील लोकांच्या जाणाऱ्या जमिनी व त्यांना त्या जमिनीच्या बदल्यात मिळालेला कमी मोबदला व काही जणांवर जमिनी मिळविण्यासाठी केलेली जबरदस्ती या सगळ्या गोष्टी सांगतात. आकाश व त्याचे व्यवस्थापक सगळ्या गोष्टी ऐकून घेतात. आकाशनी गावाची पाहणी केली असते. त्यांनी गावातील लोकांची गरीबी व तेथील रोजगाराची उपलब्धताही पाहिली असते. तो गावाच्या पाहणीतून एक निष्कर्ष काढतो. व एक प्रस्ताव गावकऱ्यांच्या समोर मांडतो. त्यात तो बांधत असलेल्या हॉटेल व रिसॉटमध्ये लागणाऱ्या जास्तीत-जास्त कर्मचारी वर्ग गावचाच घेणार म्हणून सांगतो. तसेच ज्या गावकऱ्याच्या जमिनीला कमी मोबदला मिळाला आहे त्यांना त्याचा योग्य तो मोबदला पुन्हा तपासणी करुन देण्याचे आश्वासन देतो. व ज्या गावातील व्यक्तीची घरे मोडकळीस व जुनी आहेत त्यांना तो नवीन बांधून देण्याचे मत मांडतो. गावकऱ्यांचे या प्रकल्पामुळे कोणतेच नुकसान होणार नाही हे त्यांना पटवून देतो. गावकऱ्यांनाही ते एकमताने पटले. आकाशचा हा निर्णय व गावाबद्दलची आसक्ती पाहून सलीम व लंगड्यालाही बरे वाटते. गावकरी आकाशचा निरोप घेऊन आपापल्या घरी निघून जातात. आकाश ही सकाळपासून काम करुन थोडा थकलेला असतो. व संध्याकाळी ह्या प्रकल्पातील दुसरा भागीदार त्याची प्रेयसी व तिची आई दोन दिवसानी गावात येणार असते. तिच्या वडिलांना जे त्याच गावात राहतात त्यांच्या बरोबर त्याची सभा असते. त्यांना भेटायचे असते म्हणून तो थोडा आराम करण्यासाठी आपल्या घरात जातो. सायंकाळी तो गावातील एका बंगल्यात जिथे त्याची व पाटलाची सभा ठरली असते तेथे आपल्या काही

कर्मचाऱ्यांबरोबर जातो. पण पाटील काही कामानिमित्त बाहेर असल्याने त्यांना थोडा उशीर होणार असतो. पाटलानी त्याच बंगल्यात त्याच प्रकल्पाच्या सभेकरता इतर उद्योगपती तसेच काही राजकारण्यांना बोलावले असते. व एक गाण्याचा कार्यक्रम आयोजित केलेला असतो. पाटील उशीरा येणार फोन आल्याने गाण्याचा कार्यक्रम सुरु होतो. आकाशला त्यात जास्त रस नसतो. पण पाटलाला भेटायचे असते कारण तो एक उद्योगपती व पाटलाचा जावई होणार असतो. त्यामुळे त्याला थांबणे भाग पडते. इतर मंडळी गाण्याचा आनंद घेत असतात. आणि आकाश मोबाईलवर भावाशी बोलत असतो. गाण्याचा कार्यक्रम संपता-संपता पाटलाचा प्रवेश बंगल्यात होतो. आकाश मोबाईलवर बोलत पाठमोरा उभा असतो. आकाशचे कर्मचारी पाटलाला आकाशकडे बोट दाखवतात. पाटील आकाशच्या जवळ जातात. आकाशला आवाज देतात .आकाश वळतो पाटील हस्तादोलनासाठी हात पुढे करतात. आकाशही करतो. आणि पाटलाच्या तोंडुन परशा असा आवाज निघतो. पाटील थोडे थबकतात. पण वेळेचे भान ठेवून त्याच्या हस्तादोलन करतात. दोघांची भेट होते. आकाश सुसंस्कृतपणे त्यांना चरणस्पर्श करतो. मग पाटलात आणि आकाशमध्ये प्रकल्पाबद्दल थोडे संवाद होतात. पण पाटील थोडे काम आहे सांगून तुटक बोलत आकाशचा निरोप घेतात. आकाशही निघण्यासाठी गाडीकडे वळतो. गाडी बंगल्याचे दिशेने जात असते. पण त्याच्या कानात पाटलाच्या तोंडुन निघालेली परशा हाक आठवते व तीच हाक त्याला गावकऱ्याच्या आंदोलनाच्या दरम्यान ऐकू आली असते. तेवढ्यात गाडी बंगल्याच्या आवारात येते. आकाश खाली उतरतो. व बंगल्यात निघून जातो.

आकाशकडे त्याचा दुसरा भागीदार व त्याची प्रेयसी येण्यास एक दिवसाचा अवधी असतो. आकाश दुसऱ्या दिवशी पहाटे उठतो. नित्य नियमाप्रमाणे व्यायाम करतो व त्याच्या मनात पोहण्याचा विचार येतो. तो सकाळीच पोहण्यासाठी बाहेर पडतो. मनसोक्त पोहतो आणि पुन्हा बंगल्याच्या दिशेने येत असतो. पण वाटेत त्याच्यावर चार-पाच मजबुत ताकदवार माणसे हल्ला करतात. पण आकाश त्यांच्या हल्ल्याला प्रतिकार करतो. व त्यांना चांगलाच चोप देतो. ते सगळे पळून जातात. पण या हल्ल्यात आकाशच्या डोक्याला थोडी जखम होते. तेवढ्यात आकाश समोर सलीम व लंगड्या येतात. ते त्याच्या डोक्याला जखम झाल्याने त्याच्यासोबत त्याला बंगल्यावर सोडण्यात जातात. घरी येताच आकाश थबकतो. कारण त्याचा मोठा भाऊ आला असतो. आणि तो आकाशच्या डोक्याची जखम बघून आकाशची विचारपूस करतो. तेवढ्यात सलीम व लंगड्या आकाशच्या भावाला घडलेली सर्व हकिगत सांगतात. आकाशला प्रश्न पडतो या गावात आपल्यावर कोण हल्ला करेल. तेवढ्यात त्याचा भाऊ त्याला अर्चना आणि तिची आई उद्या येणार असल्याची बातमी देतो. सलीम व लंगड्याही त्यांच्या घराकडे निघतात. दुपार झालेली असते. आकाश व संकेत जेवणासाठी जातात. जेवता-जेवता संकेत आकाशला आईही येणार असल्याची बातमी सांगतो. संकेतची आई बीटर गावी येण्यासाठी निघते आज दोन वर्षानी तीच्या दोन्ही मुलांची भेट होणार असते. आणि तिच्या डोळ्यासमोर गतकाळातील आठवणी तरळू लागतात.

परशा आणि अर्चना दोघांनी नोकरी करत स्वत:चे कुटुंब सांभाळत असताना त्याने यमुनाताईचे उपकार न विसरता त्यांच्या मुलाला शिक्षणात मदत केली. त्याच्या नावावर शिक्षणासाठी पैसे जमा केलेले असतात. त्यातच त्याने आपले शिक्षण पूर्ण करुन स्वत:चा खाद्य पदार्थाच्या गाडीचे छोट्या हॉटेलात रुपांतर करुन म्हणता-म्हणता मोठा हॉटेल व्यवसाय उभा केला असतो. सुमनताईने आकाशला कधी परशा आणि अर्चनाची कमी पडू दिली नाही. परशा आणि अर्चनाच्या मृत्यूनंतर लहानगा आकाश रडत-रडत रक्ताच्या थारोळ्यात पडलेल्या पावलाचे ठसे घेऊन बाहेर आला. शेजारील आत्यानी त्याला आलेले पाहून त्याच्या घरात त्याच्या आई-वडिलाकडे

देण्यासाठी प्रवेश केला. आणि जोरदार किकांळीनी सारा आसमंत भरुन गेला. सर्व शेजारील लोक जमा झाले. सगळ्यांच्या मनात हळहळ व डोळ्यात पाणी तरळले. त्यातील एकाने पोलिसांना फोन लावला. व पुढील कारवाई सुरु केली. पण प्रश्न होता आकाशचा. तेवढ्यात शेजारील आत्याला त्याच्या सुमनताईच्या संबंधाबद्दल माहिती होती. त्यांनी सुमनताईना फोन लावला. व सारी हकिगत सांगितली. त्याही तशाच त्यांच्या मुलाला घेऊन धावत आल्या व त्यांनी आकाशची जबाबदारी स्वत:वर घेतली व त्या निघून गेल्या.

परशा आणि अर्चनाच्या खुनानंतर पोलिसांनी आपला तपास चालु केला. पण खुन इतक्या सफाईदारपणे करण्यात आला होता की एकही पुरावा नसल्याने पोलिसांनी शोध चालुच ठेवला. पण काहीच निष्पन्न झाले नाही. इथे बिटर गावात अर्चनाचा भाऊ भैया पाटलाचा विवाह एका मोठ्या उद्योगपतीच्या मुलीशी झाला. व काही दिवसातच तिला एक सुंदर कन्यारत्न झाले. पण भैया साहेबांच्या आई-वडिलांच्या मते ती हुबेहुब अर्चनासारखी दिसत होती. आणि पाटलीन बाईना अर्चनाची कमी सतत जाणवत होती. म्हणून त्यांनी तिचे नाव अर्चना ठेवण्याचा निर्णय घेतला.तो नामकरण सोहळा मोठ्या थाटामाटात पार पडला. पण गावात भैय्या पाटलाची वाढती दादागिरी आणि त्यातच राजकारणातला प्रवेश व आमदारकी आणि रोजची गावतली भांडण, तंट्टे व घरात लक्ष कमी ह्या सगळ्याला कंटाळून त्यांच्या पत्नीने आपल्या तीन वर्षाच्या मुलीला घेऊन अमेरिकेत वडिलांचा उद्योग व मुलीच्या भविष्याचा विचार करुन निघून गेली. तीही उद्या स्वत:च्या मुलीबरोबर पुन्हा गावात येणार आहे.

आकाशचे व संकेतचे जेवून होते. संकेत प्रवासात थोडा थकला असल्याने तो आराम करण्यास जातो. आकाश बंगल्याच्या गच्चीत उभा असतो. उद्या त्याची प्रेयसी येणार असते. त्याला कॉलेजचे दिवस आठवू लागतात. ती मज्जा मस्ती, खोड्या अर्चनानी त्याच्या जीवनात केलेला प्रवास व नंतर त्यांचे भेटणे सगळ्या आठवणी त्याच्या नजरेसमोर येतात. आकाश त्या आठवणीत हरवून गेलेला असतो. तेवढ्यात त्याच्या पाठीवर कोणाचा तरी हात येतो. तो थबकतो. संकेतचा आराम करुन झालेला असतो. संध्याकाळ झालेली असते. आकाशला एवढा वेळ आठवणीत कसा गेला कळलेच नाही. संकेत आकाशला गावात फेरफटका मारण्यास जाऊया असे म्हणतो. मग ते दोघे गावात फेरफटका मारण्यास निघतात. संकेत आकाशला सांगतो भैय्या पाटलाचा फोन आला होता. उद्या अर्चनाला व तिच्या आईला आणण्यासाठी रेल्वे स्थानकावर जायचे आहे. तर पाटील परस्पर तेथे येणार आहेत व आपल्या आईला ही आणायचे आहे तर आपणही रेल्वे स्थानकावर जाणार आहोत तर पाटलांना तेथे भेटुया असा निरोप दिला आहे.

पण इथे पाटलाच्या डोक्यात वेगळीच डाळ शिजत असते. ज्या गोष्टीला २० वर्षापुर्वी संपवले होते तिच गोष्ट आज त्याच्याच मुलीकडून आणि ती ही पुन्हा घडणार असते. त्याच्या आतच पाटील त्या गोष्टीतील मुख्य पात्राला संपवण्याचा कट आखतो. आणि रात्री आकाशच्या गाडीत रिमोट कंट्रोलचा बॉम्ब ठेवण्यात येतो. पाटलानी पुन्हा एकदा डाव साधला असतो.

पुन्हा एकदा ती काळी सकाळ उगवते. आकाश व संकेत आपल्या बंगल्यातून निघतात. त्यांना त्यांच्या आईला आणि अर्चना व तिच्या आईला आणण्यासाठी रेल्वे स्थानकात जायचे

असते. रेल्वे स्थानकाच्या दिशेनी त्यांचा प्रवास सुरु होतो. इथे पाटील आपले कार्यकर्ते व त्यांनी अर्चनाला घेतलेली नवीन कार व त्यांच्या गाड्यांचा ताफा घेऊन रेल्वे स्थानकाच्या दिशेने निघतात. दोघांची स्थानकावर भेट होते. तेवढ्यात गाडी स्थानकात येते. आकाश व संकेतची आई आणि अर्चना आणि तिची आई सगळे स्थानकाबाहेर येतात. सगळ्यात बोलणे होते. पाटील म्हणतात, आता तुम्ही सारेच प्रवासातून थकला असाल. घरी जाऊन सविस्तर बोलू आणि सगळे गाड्यांच्या दिशेने वळतात. आकाश व संकेत आपल्या आईला घेऊन गाडीत बसतात. पाटलांनी अर्चनाला आणलेल्या नव्या गाडीत तिला व तिच्या आईला बसण्यास सांगितले. पाटील त्यांच्या कार्यकर्त्यांबरोबर स्वत:च्या गाडीत बसतात. आणि सर्व गाड्या गावाच्या दिशेने निघतात. एका पाठोपाठ एक गाड्या जात असतात. गावातही भैय्या पाटलानी स्वागताची तयारी ठेवण्यास सांगितलेली असते. गावातील मंडळी व पाटलाच्या कार्यकर्त्यांनी स्वागताची जय्यत तयारी केली असते. त्यांना दुरुनच गाड्यांचा ताफा येताना दिसतो. सर्व गाड्या काही क्षणात गावात पोहचणार असतात. आणि आसमंत हलले. इतका भयंकर आवाज होतो. आगीचा आणि धुराचा लोळ आकाशाच्या दिशेने जाताना गावातील मंडळींना दिसतो. आणि सगळीकडे सन्नाटा होतो. गावातील लोकांना काय झाले आहे तेच कळत नाही. सगळे गाड्यांच्या दिशेने धाव घेतात. नियतीने पुन्हा एकदा घाला घातला असतो.

इथे रस्त्यावर सगळ्या गाड्या थांबतात. आकाश आणि संकेत गाडीच्या बाहेर येतात. त्यांच्या मागच्या गाडीतील अर्चना व तिची आईही गाडीच्या बाहेर येते. पण भैय्या पाटलाच्या गाडीत भयंकर स्फोट होऊन गाडीसकट त्यांच्या व कार्यकर्त्यांच चिंधड्या उडालेल्या असतात. ह्या अचानक झालेल्या स्फोटमुळे सगळीकडे निरव शांतता पसरते. रिमोटचे बटण पाटलानी दाबले. पण त्यात भैय्या पाटलाचाच करुन अंत झालेला असतो. गावातील मंडळी तो पर्यंत स्फोट झालेल्या ठिकाणी येतात. सारेच हळहळतात. पण सलीम व लंगड्याच या मनात एक आनंद, समाधान असते. त्यांनी भैया पाटलाचा डाव उधळलेलाच नसतो तर तो त्यांच्यावर फिरवलेला असतो. आणि परशा अर्चीला त्यांच्याकडून हीच श्रध्दांजली असते.





## पीडीएफ फाईलची इमेज बनवा

एखादी फाईल मेलवरुन पाठवण्यासाठी अथवा एखाद्याला देण्यासाठी आपण ती पीडीएफ करतो. यामागे प्रमुख कारण असते ते आपल्याकडील फॉण्ट्स आपण ज्याला देणार आहोत त्याच्याकडे नसणे. पण बरेचदा अशा प्रकारे पीडीएफ फाईल करुनही ती मेलवरुन पाठवल्यानंतर पाहणाऱ्याला त्यामध्ये फॉण्ट मिसिंग दाखवतात. त्यामुळे तुमचा मजकुर वाचता येत नाही. अशा वेळी काय करावं असा प्रश्न पडतो. अशा वेळी पीडीएफ फाईल ॲक्रोबॅट रीडरमध्ये ओपन करा आणि सेव्ह ॲज या पर्यायामध्ये जाऊन तेथे सेव्ह ॲज टाईप मध्ये जेपीइजी पर्याय निवडा आणि सेव्ह करा. यामुळे तुमच्या पीडीएफ फाईलची इमेज बनेल. ही इमेज कोठेही ओपन होईल. आणि फॉण्ट मिसिंग होणार नाही.




- रघुनाथ रामचंद्र मोहिते
अंधेरी, मुंबई.

श्रावण मासारंभाचा पहिला दिवस होता. आषाढ कृष्ण पक्षातील दर्श अमावस्येची रात्र संपलेली होती. सूर्य पुष्य नक्षत्रात प्रवेश करीत असल्यामुळे या नक्षत्रकाळात अनियमित पाऊस पडेल. काही ठिकाणी ओढ लावील वगैरे वगैरे दिनदार्शिकेत सूचीत केलेले भाकीत खोटं ठरलं. आणि दर्श अमावस्येला रात्रभर पावसानं धिगांना घातला होता. भविष्य खोटं ठरविण्यासाठीच मी काय. परंतु प्रचंड वादळ वारा आणि पाऊस यामुळे रस्त्यालगतच्या फुटपाथवरची झाडे उन्मलून कोसळली होती. रस्त्यावरच्या दिव्यांच्या तारा तुटल्यामुळे लाईट बंद झाल्या होत्या. सुमसाम रस्त्यावर मोटारीचे लाईट नि हार्न काळोखाची भयाणता वाढवित होते. खिडकीच्या काचेच्या स्लाईडिंगच्या फटीतून घरात येणाऱ्या सो-सो आवाजानं वातावरण भयभीत झालेलं होतं. २६ जुलैच्या प्रलयाची आठवण होत होती. समोरच्या इमारतीच्या गच्चीवरील आकाशातुन कडाडणारी वीज चकाकत तिचे रौद्र रुप दाखवित होती. वीज पुरवठा खंडीत झाल्यामुळे टि.व्ही. पंखे केव्हाच बंद केले होते. मेणबत्यांच्या प्रकाशात जेवणं आटपली होती. सर्वत्र काळोख मी म्हणत होता. घरातही मिट्ट काळोख आणि गारठा. अंगावर शाल घेऊन अंथरुणात केव्हा डोळे लागले ते समजले नाही. पहाटे सहा वाजता जाग आली. बंद काचेच्या खिडकीतून रस्त्याकडे पाहिले. अंधकुशा उजेडात पावसाची सतत धार चालूच होती. रिपरिप पडणाऱ्या पावसात रस्त्यावर एका रिक्षाची लाईट दिसली. आपोआपच नजर त्या रिक्षाकडे वळली. रिक्षा नादुरुस्त होती की काय कोण जाणे ? परंतु ती रिक्षा पावसात उभी होती. तिच्या लाईटच्या प्रकाशात पावसाच्या सरी दिसत होत्या. त्याच उजेडात फुटपाथवरचं झाड आणि त्या झाडाला टेकून ठेवलेल्या सायकलकडे माझे लक्ष वेधले. त्या अंधारात डोळे किलकिले करुन पाहिले. तब्बल चार महिन्यानंतर ती सायकल तेथे दिसली. भिंतीवरच्या घड्याळानं ठण-ठण गजर करुन सहाचे ठोके दिले. तसे मी पांघरुण आवरले. पहाट तर झालेली होती. परंतु ढगाळ वातावरणामुळे अंधेरा होता. मुखमार्जन करुन नेहमी प्रमाणे

छत्री घेऊन मॉर्निग वॉकला निघालो. रस्ता क्रॉस करुन समोरच्या फुटपाथवर पोहचलो. खिडकीतून पाहिलेल्या त्या सायकलच्या मागच्या चाकावर टोपली बांधण्यासाठी पायाच्या चौड्यावर बसलेल्या व्यक्तीकडे माझे लक्ष गेले.

नरेश अरे कुठे होतास आठवडाभर ? हा हा नमस्ते दादा. सुमारे ३०-३५ वयाचा नरेश डोक्यावर प्लास्टिकची पावसाळी हॅट,अंगात रेनकोट, फुल पॅन्ट परंतु ती खालुन गुडघ्यापर्यंत दुमडलेली. पायात प्लास्टिकच्या चपला. सायकलच्या मागच्या चाकावर टोपली बांधत होता. झाडाच्या पानाआडन निथळणाऱ्या पावसाच्या थेंबात तो भिजत होता. त्यानं माझ्याकडे पाहिलं आणि आर्त स्वरात बोलु लागला.दादा काय करु ? अहो तब्येतच ठीक नाही. अरे मग कशाला भिजतोस पावसात ?

नरेश सायकलच्या मागील चाकावर टोपली बांधताना थरथरत होता. डोळे निखाऱ्यासारखे लाल बुंद झालेले होते. अंतरमनाची आग त्याच्या रसरसीत डोळ्यात उतरली होती. काळवंडलेल्या निस्तेज चेहरा. गालफाडं आत गेल्यानं नाकाखालची मिशी आणि हनुवटीवरची वाढलेली खुरटी दाढी त्याच्या आजारपणाची साक्ष देत होती. तो भिजत होता म्हणून मी त्याच्या डोक्यावर छत्री सावरली. ते त्याला खूप भावलं. तो टोपली बांधता-बांधता उठला. त्याच्या हाताचा उबदार स्पर्श मला झाला नि माझ्या मनगटावरचे केस तरारले. पावसाने भिजलेले त्याचे शरीर तापानं फणफणत होतं. माझ्या हाताचा आपुलकीचा स्पर्श त्यानं जाणला आणि तो सांगू लागला. "दादा काय करु गेले चार दिवस माझी बायको, दोन मुली आणि मी तापानं बेजार झालोत. चार पैसे होते ते डॉक्टरला घालविले. दोन दिवस वडा पाव नि चहा वर दिवस काढतोय. पोटासाठी मेहनत करायला पाहिजे ना ? कोण देणार बायकोला आणि मुलींना ? आज हप्त्यानं घराबाहेर पडलोय. दादा माझ्या आठवणीत हाय तुमचे ७५ रुपये माझ्याकडे आहेत ते देईन दादा. फसविणार नाय. विश्वास ठेवा."

नरेशनं लाजेनं मान खाली घातली. तसं माझ मन ही खिन्न झाल. अरे मी मागितलेत का तुझ्याकडे पैसे ? सावकाश दे. नाही तरी भाजी घेतोय ना तुझ्याकडून ? दादा आज काहीच नाही. सकाळी ५ वा. दादरला गेलो होतो. काय भाव वाढलेत भाज्यांचे ? उधारीवर पण कोण देत नाय. आता टेंपो येईल. वांगी, दुधी, गवार, शेंगा, कारळी, सुरण, वालपापडी हायत. अळुची पान आणि केळीची पाने पण हाईत. पण महाग परवडत नाय दादा. गिऱ्हाईकाला काय सांगायच ? दादा तुमच्या सारख्या माणसाकडून पाचशे रुपये उसनवार केली आणि हा माल भरलाय. दिवस भरात दोनशे रुपये सुटतील. त्यात त्या टेंपोचं भांड वेगळं. नरेश त्याच्या धंद्याची गुंजी मला सांगू लागला. अरे तुझा टेंपो होता ना रे तो ? हो दादा जुना टेंपो होता. मेव्हण्याचा. तोच डायव्हर. रोजचा डिझेलचा खर्च, त्याचा पगार आणि टेंपोचा बँकेचा हप्ता परवडत न्हवता दादा. एक तर धंदा नाय .चार महिने नुकसानीत काढले. पन्नास हजार रुपयाच कर्ज झालं. विकून टाकला आणि बँकेच्या नि मेव्हण्याच्या व्यापातून मोकळा झालो. ही माझी जुनी सायकल हीच खरी माझी लक्ष्मी हाय दादा.

नरेशनं झाडाला टेकवलेली सायकल आता फुटपाथवर आणून ती तिच्या स्टॅंडवर उभी केली. भाजीचा टेंपो येण्याची तो प्रतिक्षा करण्यासाठी कठड्याच्या आधारानं टेकून उभा राहिला. इतक्यात जोराची पावसाची सर आली. एका छत्रीत

आम्ही दोघेही भिजतोय हे आमच्या लक्षात आले म्हणून आम्ही शेजारच्या बंद दुकानाच्या पायरीवर आसरा घेतला. पावसाच्या जोरदार सरी पडू लागल्यामुळे मी मॉर्निंग वॉकचा बेत रद्द केला आणि त्याच्या बरोबर थांबलो.

नरेश तु जुन्नरचा का रे? नाय दादा मी अष्टमीचा नरेश अंबादास तांबट. अष्टमी म्हणजे रोहा अष्टमी का रे? मी कुतूहलाने विचारले. हो दादा हे तुम्ही कसं नेमकं ओळखलंत? अरे मी पण रोह्याचा. नरेश मिष्किलपणे हसला. कुणीतरी अपरिचित अचानक भेटावा त्यानं अंतरमनाचा ठाव घ्यावा तसं नरेशला वाटलं आणि त्याचा कालवंडलेला चेहरा खुलला. "दादा मी जातीनं तांबट, तांबा पितळीची भांडी बनविणारा. तुम्ही म्हणाल या धंद्यात कसा आलास? दादा माझी हिसटरी खूप मोठी हाय." आकाशातील मळभ दूर झाल होतं. श्रावण सरींना सुरुवात झाली होती. ढगांना चंदेरी सोनेरी रंगाच्या किनारी दिसू लागल्या होत्या. रात्रीचा मुसळधार पावसानं स्वच्छ केलेला रस्ता कोवळ्या किरणांनी उल्हासित केलेली पहाट. आल्हादायक वातावरणात नरेश अंगातील ताप विसरुन मन मोकळ करु लागला.



"दादा अष्टमी सोडून तीस वर्षे झाली. माझी बहिण संगीता माझ्यापेक्षा पाच वर्षांनी मोठी. मी दहा वर्षाचा असताना वडिल वारले. जागेच्या हिस्यावरुन भाऊबंदकीत भांडणे होत होती. नाईलास्तव मला आणि बहिणीला घेऊन आई मुंबईला आली. माझी विधवा मावशी एकटीच विद्या विहारच्या झोपडपट्टीत राहत होती. त्या झोपडीत आम्ही आधार घेतला. मावशी घरकाम करी. मावशीन माझ्या आईला घरकाम शोधून दिले. बहिणीला एका पारशाकडे घरकामासाठी लावले. तो पारशी खारला राहत होता. त्याने एका ख्रिश्चन बाईशी लग्न केले होतं. त्यांना मुल बाळ नव्हतं. त्याचा गोरेगावच्या इंडस्ट्रिमध्ये पेन बनविण्याचा कारखान होता. त्या पारश्याला अर्धांगवायू झाला म्हणून माझ्या बहिणीने त्याची सेवा करायला म्हणून मला कामाला ठेवले. त्याला आंघोळ घालणे, कपडे घालणे, जेवण भरविणे थोडक्यात त्याची सर्व कमे करुन त्याला त्याच्या फॅक्टरीत पोहचवित असे. मी त्याची प्रामाणिकपणे मोठ्या भावासारखी सेवा करीत असे. पारशी देखील मला कपडेलत्ते देत असे. त्याने येण्याजाण्यासाठी एक सायकल मला दिली. ती हि सायकल. एकदा तो खूप आजारी पडला. त्याला खारच्या हॉस्पीटलमध्ये ठेवले होते. मी दिवस-रात्र त्याची सेवा करीत होतो. त्याची बायकोही जे काम करु शकली नसती ती कामे मी त्या पारशाकडे पाहून केली. पण आता मला जादा पैसे द्यावे लागतील म्हणून त्या पारशाच्या बायकोने माझ्यावर खोटा चोरीचा आळ घातला. आणि मला कामावरुन काढून टाकले. दादा केवळ माझ्या बहिणीची नोकरी जाऊ नये म्हणून मी मुकाट्यानं ती नोकरी सोडली. दादा ज्याला कोण नाही त्याला देव असतो म्हणतात ना तसा मला अनुभव आला.

नरेशचे डोळे अश्रुंनी भरुन आले. त्यांन आवंडा गिळला. एकदा माझ्याकडे पाहिल आणि पुढे सांगू लागला. दादा आमच्या शेजारी युपीचा एक भैय्या राहत होता. तो भाजी विकायचा. आमची गरिबी पाहून त्यानं मला त्याचे भाज्यांचे गाठोडे उचलायला म्हणून बरोबर घेऊन जात असे. दिवसाला पन्नास रुपयेही देत असे. त्याचा धंदा घाटकोपरच्या स्टेशनच्या बाजुला फुटपाथवर होता. मी दररोज त्याच्या बरोबर गेल्यामुळे मला त्याच्या धंद्याची आयडिया मिळाली. तो नसताना मी त्याची भाजी विकायचो. आणि प्रामाणिकपणे त्याला पैसे कमाऊन द्यायचो. माझे नशिब बलवत्तर. त्याचे गिऱ्हाईक माझ्याकडूनच भाजी घेऊ लागले. एकदा भैय्याने माझ्या

नकळत पोलिसाला हप्ता देऊन म्युनिसिपालटिवाल्याकडून माल घेऊन गेला. खरा तर तो माल त्याचाच होता. भांडण केल. दादा गरिबी आणि प्रामाणिकपणा याचा अनुभव मला बयाच्या बाराव्या वर्षीच मिळाला. या टेन्सनमुळे आईला काविळ झाली. आणि ती मेली. दादा स्वत:कष्ट केल्याशिवाय तरणोपाय नाही. हे मी जाणलं आणि तुमच्या सारख्या एका भल्या माणसाकडून शंभर रुपये उसनवारीवर घेतले पन्नास रुपयाची टोपली खरेदी केली. आणि पन्नास रुपयाची भाजी खरेदी करुन मी या सायकलवरुन दारोदार भाजी विकतोय. तो आजपर्यंत. दादा आता सायकल चालवून मला सांधे दुखीचा त्रास होतोय. किडनीपण खराब झालीय.

नरेशने बोलता-बोलता सायकलच्या टायरची हवा हाताने दाबून चेक केली. पुन्हा त्या सायकलवरच्या टोपलीतील बारदान काढले ते झटकले आणि पुन्हा नीट घातले. एव्हाना ७.३० वाजले होते. तो अधुन-मधून त्याच्या टेंपोची वाट पाहत होता. टेंपो आला. त्याचा माल त्याने उतरुन घेतला. भाज्या वेगवेगळ्या पिशव्यात भरुन त्या सर्व पिशव्या त्या सायकलवरच्या टोपलीत ठेवल्या. दादा काय देऊ तुम्हाला? दे काहीही आता महिनाभर तुझ्याशिवाय पर्याय नाही. "गवार घ्या दादा गावठी आणि कोवळी हाय." नरेशने पाव किलो वजनाचे दोन दगड एका पारड्यात ठेवले आणि दुसऱ्या पारड्यात गवारीचं वजन करुन ती एका प्लास्टिकच्या पिशवीत भरली. त्यात आणखी मुठभर गवार भरली. मी पन्नास रुपयाची नोट पुढे केली.

"राहू द्या राहू द्या, दादा सुट्टे नाय" अरे पण ही पहिली बोहणी आहे तुझी. मी जबरदस्तीनं त्याच्या शर्टाच्या खिशात पन्नास रुपयाची नोट ठेवली. त्यानं ती काढली टोपलीतल्या भाज्यांना लावली. सायकलच्या हॅन्डलला लावली. स्वत:च्या कपाळाला लावली. ओठांनी त्या नोटचे चुंबन घेतले. पुन्हा कपाळाला लावून ती शर्टाच्या खिशात ठेवली. माझ्याकडे उपकृत नजरेने पाहिले आणि येतो दादा असं म्हणून तो सायकलवर बसला आणि निघून गेला. मी क्षणभर स्तब्ध उभा राहून त्याच्या पाठमोरा देह पाहत होतो. एकदा हातातील पिशवीत गवारीकडे पाहिले. पराकाष्टेची मानहानी झालेला नरेश एक भाजीवाला होय. तो नरेश भाजीवाला अजुनही मला भेटतो. गवारीची भाजी खाताना तो दिवस मला आठवतो. ज्या-ज्या वेळी त्या झाडाकडे पाहतो तेव्हा त्याची ती सायकल आणि नरेश नसतानाही समोर असल्याचा भास होतो. त्याने सांगितलेली त्याची हिस्ट्री एखाद्या चित्रफितीसारखी माझ्या मनाच्या पडद्यावर फॅल्यसबॅक सारखा उजाळा देत राहतो. नरेश अंबादास तांबट एक निकारी भाजीवाला माझ्या मनात अजुनही घर करुन आहे. तो एक दुर्भागी मित्रा सारखा.






- शितल शिवराज मालुसरे
महाड, रायगड.

मला तुझ्यासोबत पन्हाळा पाहायचा आहे, मला तुझ्यासोबतच पन्हाळा पाहायचा आहे कळतय का? मला माहित आहे हे तुला साध्य होईल की नाही माहीत नाही. पण ही माझी इच्छा आहे. का कुणास ठाऊक हे शब्द, हे वाक्य हा गोड आवाज त्याच्या कानावर पुन्हा-पुन्हा पडत होता. मनातल्या मनात गुंजत होता. इतकेच नव्हे तर अंतरात्मा बोलत होता. त्याला कुठेतरी पन्हाळा खुणवत होता. पन्हाळ्याचा कोपरा न कोपरा त्याच्या परिचियाचा. पन्हाळ्याविषयी भरभरुन लिहावं तर त्यानेच. चमकदार भाषा आणि धारदार शब्द ऐकणाराही क्षणभर स्तब्ध. खुप सुंदर लिहायचा युगंधर. तो इतिहासकार होता. व्याख्याता इतकेच नव्हे तर ऐतिहासिक आणि सामाजिक नाटककार होता. त्याच्या शब्दांनी भल्याभल्यांना वेड लावले होते. नाटक पाहणारे आ वासून पाहतच राहायचे इतके तो सुंदर लिहायचा.

आई ऐक ना एक गोष्ट, खूप दिवस झाले मला एक आवाज ऐकू येतो. मला जाणवतो की मला तुझ्यासोबत पन्हाळा पाहायचा आहे असा एका मुलीचा गोड आवाज ऐकू येतोय. अरे भास होत असेल तुला, सारखं सारखं ऐतिहासिक वाचत, लिहित असतोस ना त्यामुळे होतात असे भास. "ए आई भास काय गं. खरच आवाज ऐकू येतोय." मी पन्हाळ्याला जाऊनच याची शहानिशा करणार आहे. युगंधर वेडा आहेस का? तू जा पन्हाळ्याला पण जरा सांभाळून जा. आणि स्वतःची काळजी घे आणि वास्तवात जग हो स्वप्नात वावरु नको की पन्हाळ्यावर एखादी स्वप्नपरी भेटेल म्हणून. "काय ग आई, ही कसली थट्टा करतेस गं." आई ऐक उद्या सकाळी आम्ही सारे मित्र मिळून जाणार आहोत पन्हाळ्याला . का काही काम नाही का? आई काम रोजच असतात. मला जायचयं पन्हाळ्याला. सांभाळून जा म्हणत आई विचार करत राहिली. खरच किती मोठा झाला ना युगंधर. लहानपणापासून त्याला शिवाजी महाराज आवडायचे. शाळेच्या नाटकात काम करता-करता तो स्वतःच लिहू लागला. आणि कॉलेजमध्ये त्यांने राजांवरती पहिली एकांकिका लिहिली. अणि सर्वच दृष्टीने सरस ठरत तो पुरुषोत्तम करंडकाचा मानकरी झाला. आणि मग त्याने मागे वळून पाहिलच नाही. त्याच्या बाबांसारखा हा ही गोड आणि मस्त बोलायचा इतका की समोरचा ऐकतच राहील.

खरतर इंद्रजित गेले आणि मी पूर्ण कोलमडूनच गेले. पण

युगंधरकडे बघून दिवस काढले. तोच माझा सर्वस्व. तो कलेकलेने वाढला आणि मी त्याच्यात स्वत:ला गुंतवत गेले. त्याचं संगोपन करण्यात स्वत:ला धन्यता मानली. खरतर त्यासाठी आणि त्याच्यासाठीच जगतेय मी. माझं असे वेगळं विश्वच नाही. खरच बघता-बघता युगंधर किती मोठा झाला. वर्ष सरली कसा संपला तो २० वर्षाचा काळ युगंधर तेव्हा २ वर्षाचा होता. इंद्रजित ऐका ना आज आपण जायचं चौपाटीवर. मला भेळ खायची आहे. पाण्यात मनसोक्त भिजायच आहे. वसुंधरा प्लीज आज नको ना, आज लवकर येता येणार नाही गं. मिटिंग आहे. हे तुमचं नेहमीचचं झालं आहे. डार्लिंग प्लिज आपण उद्या नक्की जायचं. प्लीज.

खरं म्हणजे इंद्रजितचा बिझनेसचा व्याप इतका मोठा होता की त्याला वेळेचे नियोजन जमतचं नव्हतं. पण वसुंधरा खूप समजूतदार होती आणि तिच्या समजुतदारापणामुळेच तो यशस्वी बिझनेसमन म्हणून थाटात वावरत होता. मुंबई सारख्या ठिकाणी तो बिल्डिंग कॉन्ट्रक्टर म्हणून यशो शिखरावर पोहचला होता. ऐरावत हे त्याच्या कंपनिचे नाव होतं. ऐरावतने त्याला एका उंचावर नेऊन पोहचवलं होतं. त्यामगे त्याची हुशारी, कष्ट करण्याची तयारी आणि मनमिळावू स्वभाव आणि या सर्वावर कहर म्हणजे त्याची बोलण्याची शैली समोरचा भारावूनच गेला पाहिजे. असा रुबाबदार इंद्रजीत आणि कॉलेजात लेक्चरस म्हणून वावरणारी वसुंधरा त्याच्यामध्ये अगदी दुधात साखर मिसळावी तशी विरघळून गेली. त्यांचा संसार सुखाचा आनंदाचा होता. पण एकच खंत होती की तिला अजुन आंबट चिंबट खावसं वाटत नव्हत. लग्नाला पाच वर्षे झाली आणि दोघांनाही काळजी स्वस्थ बसू देईना.

इंद्रजीत काय घडतयं माझ्या जीवनात, तुम्ही इतक्या सुखाच्या पायघड्या अंथरल्यात पण त्यावरुन चालताना मला कुठेतरी काटा रुततोय ना डिअर, कधी उजवणार माझी कुस. ऐकताय ना, मला बाळ हवय अगदी तुझ्यासारखं. वसू अग अजुन आपल वय झाल आहे का? होईल गं, कसली काळजी करतेस दैवाने माझे भाग्य रेखाटले आहे तर त्याने साऱ्या भाग्यरेषा व्यवस्थितच भरल्या आहेत हे लक्षात ठेव. काळजी करु नकोस कळतयं काय या विचारात काही रात्र घालवायची? इंद्रजीत,

वसू तु माझ्या जीवनात स्वप्नातील परी बनून आलीस पण वास्तवात माझी सखी बनलीस. जीवाभावाची अगदी मला तुला इतका वेळ देता येत नाही तरीही तु तक्रार करत नाहीस? आणि यातच सार आलं राणी. तू सार सुख मला भरभरुन दिल आहेस कळतय का वेडा बाई. म्हणत त्याने तिला अलगदा जवळ ओढलं. पाच वार्षची सात वर्ष झाली तसा इंद्रजितही अस्वस्थ झाला. खरतर सात वर्षाचा काळ तसा खूप मोठा होता. त्यानं वसुधराची समजूत काढली तरी आता मनातून थोडा नाराजच झाला होता. एकदा चेकिंग करुन घेणे गरजेचे आहे असे त्याला वाटू लागले. पण ते वसुला कसे सांगायचे या विचारात असताना वसुंधराने चौपाटीवर जाण्याचा हट्ट केला. आणि त्याने ठरवले की आपण तिला परिस्थितीच गांभिर्य समजावून सांगू, सागराच्या साथीने मनातील वादळ तिला बोलुन दाखवू मग तिच्या विचाराच्या काय लाटा उठतात त्या उठू देत. हा निश्चय करुन ते चौपाटीवर गेले.

इंद्रजित भेळ खायचीच पहिली आणि तीही थोडी खट्टी मिट्टी. वसुंधरा होय इंद्रजित मला खट्टी मिट्टी भेळ खावीसी वाटतेय, मला चिंचा खाव्याशा वाटतात. आणि समुद्राच्या पाण्यात खूप भिजावसं वाटतय. का काय माहीत नाही थोड

अस्वस्थही वाटतय आणि अशक्तपणा वाटतोय आणि चक्करही आल्यासारखी वाटतेय. वसुंधरा हो इंद्रजित आपण जाऊ उद्या डॉक्टरकडे, कळत का तुम्हाला मी का? काय म्हणतेय ते?

आणि सगळ वातावरण बदलून गेल. मनातल वादळ कुठेतरी लोप पावल, आनंदाला उधाण आलं इतक्या वर्षानी का होईना ज्या क्षणाची ते बाट पाहत होते तो क्षण त्यांच्या जीवनात आला आणि तो खूप आनंदाने जणू वेडाच झाला. वसुंधराला त्यानी नऊ महिने व्यवस्थित जपले आणि युगंधरला पाहताच तर वेडाच झाला होता. त्यावेळी त्याच्या चेहऱ्यावरचा आनंद अवर्णनीयच. आणि त्याचा पहिला वाढदिवस खूप मोठ्या प्रमाणात साजरा करण्यात आला. त्याच्यावर रुसलेले सगळे नातेवाईक जवळ आले आणि सगळच कस अगदी मस्त चाललं होतं आणि अचानक रात्री एक वाजता फोन खणखणला. हॅलो, वसुंधरा बोलतेय. हॅलो मॅडम मी इन्स्पेक्टर पाटील बोलतोय. इंद्रजित देसाई तुमचे मिस्टर का? हो साहेब का काय झाल? काही नाही तुम्ही शांतपणे मुलुंड पोलिस स्टेशनला येता का? आम्ही गाडी पाठवलीय त्यांच्यासोबत या प्लीज काय आहे शांतपणे या.

ती पोलिस स्टेशनला गेली आणि पोलिसांच्या व्हॅनमधून हॉस्पीटला आली. तिने जे दृष्य समोर पाहिले ते पाहून ती बेशुध्दच पडली. इंद्रजितच्या गाडीला अपघात झाला होता. आणि त्यात तो ऑन दि स्पॉट गेला होता. ती शुध्दीवर आली तेव्हा तिचे भाऊ, दीर वगैरे सर्वजण हॉस्पीटला होते. सर्व सोपस्कारपुर्ण करुन दोन वर्षाच्या युगंधरने त्याला अग्नी दिला. आणि अश्रुंच्या महापुरात सगळ्याचे हृदये हेलावून गेली. खरं तर ती पुर्ण कोलमडून गेली पण युगंधरसाठी सावरणं गरजेचं होतं. मनातून आठवणी जाता जात नव्हत्या. पण त्याला पर्याय नव्हता. सगळ्या आठवणी मनाच्या कोंदणात बंदिस्त ठेवून तीने पुन्हा नव्याने जगण्यास प्रारंभ केला. त्याचा बिझनेस तिची सर्व्हीस सगळच करायचं ठरवलं. तेवढेचं झेलले आणि पेलले देखील. छोट्या युगंधराला वाढवण्यात, त्याचे लाड पुरवण्यात तिचा वेळ जाऊ लागला. दिवसामागुन दिवस आणि वर्षामागुन वर्ष सरु लागली. युगंधर जसजसा मोठा होवू लागला. तशा जबाबदाऱ्या वाढू लागल्या. आणि जबाबदाऱ्या निभावताना मात्र ती कर्तव्यात कुठेही कमी पडली नाही. युगंधरचं व्यवस्थित शिक्षण त्याच्यावर चांगले संस्कार मुळातच तो हुशार होता त्यामुळे त्याच्यातील मानसिकता लवकरच प्रगल्भ झाली. तोही अगदी व्यवस्थित शिकला. स्पर्धा परीक्षा पास होत होत तो क्लास १ चा ऑफीसर झाला. आणि खरच तिच्या मेहनतीचे चीज झाले. आता युगंधर इतका मोठा झाला तरी तिच्या आज्ञेत राहायचा. म्हणून तर पन्हाळ्याला जाण्याआधी तो आईची परवानगी घेत होता.

दुसऱ्या दिवशी युगंधर आणि त्याचे मित्र पन्हाळ्याला पोहचले. स्वराज्यनिष्ट काय असते आणि शिवछत्रपतींच्या मावळ्यांनीच जीवाची बाजी लावावी, स्वराज्यासाठी धडावर शीर नसतानाही दोन्ही हातात तलवार बाजी करणारे बाजी प्रभु देशपांडे आणि पन्हाळा हे नातचं दृढ विश्वासाचा. मावळ्याच्या रक्ताच्या रांगोळीने स्वराजातील गड समलेत. आणि मावळ्याच्या रक्ताच्या सिंचनानेच पराक्रमाचे बीज पुन्हा पुन्हा स्वराज्यात रुजले याची प्रचिती येते. पन्हाळगडावरचे वातावरण कसे प्रसन्न होते. सकाळचे प्रसन्न वातावरण, गवत पात्यांवर दवबिंदूचे मोती चमकत होते. हिवाळ्याचे सुंदर दिवस

अशा प्रसन्न वातावरणात युगंधर आणि त्याचे मित्र पन्हाळ्यावर धम्माल करत होते. ते थोडेसे पुढे सरकत गेले आणि एका आवाजाने ते सारेच थबकले. वाचवा... अशा आवाजाच्या दिशेने ते सारेच धावले. आणि पाहतात तो काय उतारावर मुलींचा घोळका होता.

अनुश्री जीवाच्या आकांताने ओरडत होती. ती खाली खाली घसरत होती. साऱ्या मुली भेदरलेल्या होत्या काय करावे ते कळतच नव्हते. आणि इतक्यात युगंधर धावत गेला आणि त्याने तिला जवळजवळ पकडलीच. युवराज तिच्या तोंडुन नकळत शब्द बाहेर पडले आणि त्याचे मित्र स्तंभितच झाले. युगंधरने तिला वरती आणली तसा सगळ्यांनी श्वास घेतला. पण अजुनही त्या सगळ्या जणी एका मानसिक भीतीच्या छायेखाली वावरत होत्या. तिने तुला युवराज अशी हाक मारली तुला थोडं वेगळं जाणवलं नाही का? युवराज त्याचे मित्र त्याला विचारत होते. त्यानी मित्रांना शांत केले. त्या मुलींना दम दिला आणि परत माघारी जायला सांगितले. तशी अनुश्री पुन्हा म्हणाली युवराज मला तुझ्यासोबत पन्हाळा पाहायच आहे. सारे स्तंभितच "युवराज" हो युवराज आणि



युगंधरला पुन्हा-पुन्हा ते वाक्य त्याच्या मनात घुमत राहिले. त्याला तो आवाज ऐकू येत होता तो याच मुलीचा. त्याची खात्री झाली. "माझ्याबरोबर" "हो तुझ्याबरोबर" पण मी युगंधर आहे युवराज नाही. नाही तू युवराज आहेस, युगंधर नाही आणि मला तुझ्या सोबतच पन्हाळा पाहायचा आहे. तु मला तसं वचन दिल होतस की, मी तुला पन्हाळा दाखवीन. काही तरीच काय? काही तरीच नाही, हे वास्तव आहे. युवराज आणि युगंधर चक्रावून गेला. कस शक्य आहे. तो कितीतरी वेळा पन्हाळ्याला यायचा. पण कोणत्याही मुलीला असं वचन दिलेलें त्याला आठवतचं नव्हतं. तो चक्रावून गेला. आपण पन्हाळा पाहायचा पण आता नको. नंतर कधीतरी मला तुझा पत्ता व नंबर दे म्हणून तिच्याकडून पत्ता व नाव, नंबर घेतला आणि त्या मुलींचा घोळका निघून गेला. त्यालाही पन्हाळ्यावर फिरावसं वाटेना. थोडाश्या नाराजीनेच ते पन्हाळ्यावर राहिले पण त्याचे मन मात्र कशातच लागत नव्हते.

युगंधर का रे गप्प, काय झाल? आई बोल, डोक दु:खतय का? काय झाल बाळा? आई अग पन्हाळ्यावर मला ती मुलगी भेटली होती. मला तुझ्यासोबत पन्हाळा पाहायचा म्हणणारी आणि ती मला युवराज म्हणाली. काय? हो आई ती मला युवराज म्हणाली, मला काही सुचतच नव्हतं. पण त्या मुलीला मीच वाचवलं. तिचा पत्ता, नाव सार आणलय मी. सारखा तिचा आवाज माझ्या कानात गुणगुण करतोय. आणि आणि तिचा चेहरा माझ्या नजरेसमोरुन हालत नाही. सांग काय करायच. "तुला काय वाटत." आई आवाज तर अगदी ओळखीचा वाटतो. तिच्या डोळ्यात पाहिलं ना की एक वेगळीच चमक जाणवतेय आई कोण असेल ग ती मुलगी. ? ती कोणीही असो, तुला आवडलीय ना. आई हो मला आवडलीय पण पण ती मला युवराज का म्हणाली असेच ना? कळेल वेळ आली की सगळं कळेल. नाही आई आता कळलचं पाहिजे. " युगा कळेल तुला सगळं. मग आपण तिला मागणी घालायची का?" चालेले आई, मुलगी तर मला आवडलेय, अनुश्री नाव आहे तिचं. ओ, हो अनुश्री का? आणि ठरल्याप्रमाणे ते अनुश्रीकडे गेले. तिला लग्नाची मागणी घातली आणि रितसर बोलणी केली. सगळं कसं पटापट जुळून आलं. अनुश्रीचे बाबा आय. ए. एस. ऑफिसर आहेत. अशा सुशिक्षित, सुसंस्कृत घरात वाढलेली अनुश्री सरदेसाईंची सुन झाली. लग्नाचा थाट तर काय वर्णावा न भुतो न भविष्यती

असा विवाहसोहळा पार पडला. एकुलत्या एक कन्येचा हात युगंधराच्या हातात देताना बाबा म्हणाले, "युगंधर राव, आमच्या काळजाचा तुकडा तुमच्या हातात सोपावलाय." तुम्ही तिला व्यवस्थितपणे सांभाळा. अनु थोडीसी हट्टी आहे. प्लीज माझ्या सोनुलीला समजुन घ्या. "बाबा तुमच्या काळजाचा तुकडा असला तरी ते आमचं काळीज आहे. आणि त्याला धक्का लागणार नाही ही काळजी आम्ही घेणारच. तुम्ही निश्चित राहा." म्हणत त्यांची गाडी पुण्याच्या दिशेने निघाली.

लग्नानंतरचे सगळे विधी पार पडले. सत्यनारायण झाला, सर्वांनी दोघांना भरभरुन आशिर्वाद दिले. आशिर्वादाच्या बोलांनी नवदाम्पत्य सुखावून गेले. दिवस सरला आणि त्या अलिशान महालात ती त्याची आतुरतेने वाट पाहत होती. दरवाज्याचा आवाज झाला तशी ती जरा जास्तच सावरुन बसली. उंच गोरपान युगंधर तिच्यासमोर उभा होता. ती नखशिखान्त शहारली. तो तिच्या बाजुला बसला अगदी दीड फुट अंतर ठेवून अगदी युवराज सारखं. हा युवराजही कधी भेटायचा तेव्हा असा दूर बसायचा आणि भरभरुन तिच्या मनातल बोलायचा तिचा शरीराला स्पर्शही न करता तिच्या मनगाभाऱ्याला स्पर्शून जायचा. पण तिला आता राहवेनाच. अजुनही इतकं अंतर गरजेच आहे काय? किती वर्ष वाट पाहतेय मी तुमची. आख्खा जन्म फक्त तुझ्या शब्दांवरच जगलेय. आता नको ना दुरावा. माझ बोलणं थोड तुला खटकत असेल पण हे खर आहे युवराज. युवराज नाही युगंधर. नाही नाही युवराजच. तो युवराज समाज चौकटीची सगळी बंधन सांभाळून माझ्यावर जिवापाड प्रेम करणारा. मी तुझ्या प्रेमात सहज गुंतत गेले पण तु मात्र विचारपुर्वक प्रेम केलस माझ्यावर. तरीही ते जीवापाड. "असं कस गं." आणि असं असेल तर मला ऐकायचय ते ऐकवशील. का तुला काहीच आठवत नाही? तेव्हाही असाच होतात. अगदी विसराळू आणि झोपाळू. मला आठवतय सगळं. मोगऱ्याच्या फुलांपासून बहरत गेलेली मैत्री. मोगऱ्याचा निर्मळपणा सतत जपत राहिली. मीच मैत्रीच नात निभावत होते. पण एक दिवस अगदी भावुक होवून तु मला आय लव्ह यु म्हणालास. मी तुझ्यावर मनापासून प्रेम करतोय असही म्हणालास. आणि मी थोडी अस्वस्थ झाले. कारण तु तुझी प्रतिष्ठा, तुझ लेखन, तुझा संसार हे सार सांभाळत माझ्यावर निरागस प्रेम करत राहिलास. अगदी कृष्णासारखा. किती तरी वेळा आपण भेटलोत. मी इतकी सुंदर असूनही मला स्पर्श करण्याचा मोह तुला कधीच झाला नाही. कारण तू तत्वावर चालणार तत्वनिष्ठ होतास. आणि माझ्या प्रेमातही वासनेचा लवकोश नव्हता कारण माझं जीवन राजसाठीच समर्पित होत. आता राज कोण?

सांगतेच ना, राज माझा नवरा खुप चांगला मला जपणारा सोज्वळ असा माझ्या प्रत्येक यशात त्याचा मोलाचा वाटा होता. पण एकच वाईट गोष्ट मित्रांच्या संगतीत रमला की तो सगळ जग विसरुन जायचा. एक नंबरचा रागीट होता तरीही मी त्याला झेललं त्याचा संसार फुलवला. त्याचा? हो त्याचाच कारण संसारातले सगळे निर्णय त्याचेच. जीवनातले सगळे निर्णयही त्याचेच. अगदी रोजची जेवनातली भाजीही त्याच्याच मर्जीनेच व्हायची इतका त्याचा दरारा होता. आणि मी ही ते आनंदाने स्विकारले कारण त्याने मला संकटांशी सामना करत धैर्याने जगायला शिकवल. भलेही तो स्वत:च्याच कोषात गुरफटून राहीला पण मुलांचा तो लाडका बाबा होता. हो खुप लाड करायचा मुलांचे आणि माझेही. पण माझ सौभाग्य फार खोट होतं. मुल अर्धवट मोठी ना धड लहान ना मोठी अशा अवस्थेत एक दिवस तो सन्मानाने हे जग सोडून गेला. त्यानी

भरपुर माणसं कमावली होती हे त्या दिवशीच्या माणसांच्या जत्रेवरुन येत होतं. प्रत्येकजण हळहळत होता माझ्या तर डोळ्यांना थाराच नव्हता. जीवनात कधीही न रडणारी मी त्यादिवशी आणि त्या दिवसापासून पंधरा दिवस सतत रडली. जणू लहानपणापासूनच सगळं रडण बाहेर पडलं. आसवांत भिजलेल्या त्याच्या आठवणी ह्रदयात साठवत मी मुलांसाठी कणखर बनले खरी. पण सर्व्हीस व घरकामात दिवस जायचा आणि रात्र आ वासून उभी राहायची. रात्र न रात्र मी डोळे उघडे ठेवून मनातील विचाराचं वादळ थांबवण्याचा प्रयत्न करायची. पण झोप माझ्या जीवनातून निघूनच गेली. सगळ काही करताना कर्तव्य निभावताना मी स्वत:ला सावरल. लोकांच्या दृष्टीने मी लवकर सावरले. पण आतल्या आत माझ मन धुमसत होते. भावनांना धुमारे फुटत होते. दिवसभर मुलांसोबत रडता येत नव्हते. आणि रात्री मात्र आसवाना थारा देत नव्हते. कुठेतरी मोकळ होणे गरजेचे होते. मनातल्या साऱ्याच भावना कागदावर उतरवत गेले आणि जीवन एक संघर्ष नावाचा कवितासंग्रह वाचकांना चटका लावून गेला.



स्त्रीची व्यथा, कथा समर्थपणा याच पुरेपुर वर्णन त्यात होतं. माझ्या कवितांवर वाचकांनी भरभरुन प्रेम केले आणि त्यातील एक वाचक तु होतास.

मी कसा काय? एक दिवशी ऑफिसमध्ये मला तुझा फोन आला. आणि त्यावेळी समीक्षकासारखा तु माझ्या कवितंतील माझ्याभावनांवर बोलत राहिलास. अगदी बिनधास्तपणे तु तुझी मत मांडत राहीलास. तुझा फोन आला मीही विसरुन गेले आणि दहा दिवसांनी तुझा नंबर सेव करताना मी तुला सहज एक मेसेज पाठवला. मोगऱ्याचा आणि ते माझ्या आयुष्यातल एक सुंदर वळण. आठवतय का काहीतरी. काहीतरी म्हणण्यापेक्षा तू या बेडवर हा जो कवितासंग्रह ठेवला आहेस ना ते पाहुन आठवतच मला सार. त्यानंतर आपण फोनवर फक्त पाच मिनिटांसाठीच बोलायचो. आणि मी नेहमी तत्वज्ञान सांगायचो आठवतं मला. सुरुवातीची दोन वर्ष मी तुला तत्वज्ञान सांगायचो. जीवनाचे आणि तुम्ही मला तत्वेत्ताच म्हणायचीस. तु कधी खूप भावुक बोलायची. मेसेज पाठवायची पण माझ बंधन असायचं एक किंवा दोनच मेसेज आणि पाच मिनिटच बोलायचं तेही दोन-तीन दिवसातून एकदा. मी हे सारं कटाक्षाने पाळत होतो. पण कुठेतरी मी तुझ्यामध्ये गुंतत होतो हे ही खर. तुला माझा नव्हे माझ्या शब्दांचा, धीराचे चार शब्द हवे होते. आणि ते चार शब्द ऐकून तु सुखावून जायची आणि बोलता-बोलता एकदा तू म्हणालीस की मला जगण्यासाठी हे तुझे शब्द हवेतच. नाही जगू शकत मी तुझ्याशिवाय आणि तुझ ते निरागस प्रेम मी स्विकारल आठवतय मला जीवनात तु कधीच अट्टाहास केला नाहीस. अगदी माझ्या चार शब्दांसाठी तू झुरत राहिलास. माझी सारी बंधन पाळून.

हो सगळ्या मर्यादा सांभाळून सगळी बंधन पाळून मी तुझ्यावर राधेसारख निर्व्याज, निराकार, निरागस प्रेम, खर तर राजने माझ्याशी प्रतारणा केली होती. त्याच मन त्याच्या प्रेयसीत गुंतलेल होत. कर्तव्य म्हणून त्याने माझ्यासोबत संसार केला. पण माझा मन गाभारा मात्र त्याच्या प्रेमाविना रिताच राहिला. माझ्या मनासारख कधी त्यानं मला संसार करुच दिला नाही. ना हळदीकुंकू ना मार्गशिषातले गुरुवार, मनात कोणतही स्वप्न, आशा आकांक्षा आवड-निवड न बाळगता मी त्याचा संसार फुलवला. आणि माझ्या जीवनात मात्र अंगार फुलला. मी त्याच्यात प्रेम कमी आणि क्रुरता जास्त पाहिली. मी सगळे

अनुभव सहन केले. सगळ्या प्रकारचे छळ सहन केले. मानसिक, शारिरीक तरीही तो गेल्यावर मी ढसाढसा रडले. कारण काही क्षण प्रेमाचे होतेच ना राज गेला सारच संपले आणि एका तत्ववेत्याच्या रुपाने तु माझ्या जीवनात आलास. जीवनाबद्दलची सकारात्मकता समजावून सांगितली. हळवेपणाने माझ्याशी बोलून माझ्या मनाला इतकी भूरळ पाडलीस की अलगद तुझ्यात गुंतत गेले. तुझ्या सुख दु :खातील सखी बनून.

हो तू प्रत्येक क्षणी माझ्यासोबत राहीलीस माझ्या बायकोशी काही कारणावरुन वाद व्हायचे. माझ्या नाट्यक्षेत्रात काही घडामोडी घडायच्या तेव्हा माझ मन मी फक्त तुझ्याकडेच मोकळ करायचो. इतकच नाही तर एक घटना माझ्या जीवनातील मी तुला सांगितली. पण एक मात्र मी तुझ्यावर तेवढेच प्रेम केलं जेवढं बायकोवर केल. तुम्हा दोघींवर मी तितकच प्रेम केल. तिला मी भरभरुन सार सुख दिलं आणि तुला चार शब्दांशिवाय काहीच देवू शकलो नाही. तरीही तू माझ्यावर विश्वास ठेवून माझी प्रिय सखी बनून जीवनभर मला साथ देत राहिलीस आठवतय मला. पस्तीस वर्षाच्या मैत्रित तू कधीच माझ्याकडे हट्ट केला नाहीस. अट्टाहास केला नाहीस म्हणूनच मला मैत्री जपता आली. कळतय का? जगावेगळी आपली प्रेम कहाणी होती ना? कुणालाही अभिमान वाटावा अशीच. हो मला तुझ्यासोबत तेव्हा पन्हाळा पाहायचा होता. हो आणि तु एकदाच मोगऱ्याची फुले मागितली होतीस पण तीही मी तुला जाणून बुजून देण्याची टाळली. त्यानंतर तू ती कधीच मागितली नाहीस. पण थोडाशा निराशेने तू मला एकदा मेसेज पाठवला की माझ्या प्रेतावर चार मोगऱ्याची फुले वाहिल्याशिवाय मला मुक्ती मिळणार नाही. हा तुझा मेसेज वाचून माझ्या आसवाना आवरल नाही. भावनांना सावरल नाही. तरीही मी तुला कधीही मोगऱ्याची फुलेच काय? काहीच दिलं नाही. शब्दासाठीच जगत राहिलीस आठवतय ग मला सगळं तु पुरा जन्म माझी वाट पाहिलीस होय ना.

कारण तो जन्म तुझा होता. तु तुझ्या पत्नीला देवा ब्राम्हणाच्या साक्षीने वचन दिलं होतस. त्यामुळे तेव्हा तू फक्त तिचाच होतास अगदी तिचाच. आणि आता.. "तशी ती चक्क लाजली आणि म्हणाली फक्त माझाच." तिचे ते अनुपम सौंदर्य तिच्या लाजण्याने जास्तच विलसत होते. आता हक्क आहे ना, मला डिअर तुला माझ्यात सामावून घेण्याचा आणि तुला पन्हाळा दाखवण्यासाठी. युवराज मी ही तडफडतोय ग तुझ्यासाठी तु ही अशी देखणी छान ड्रेस किंवा जीन्समध्ये माझ्यासमोर असायचीस पण साधा बोटाचाही स्पर्श तुला केला नाही. ती परिस्थिती वेगळी होती. हो आणि आता तो भूतकाळ. अहो भूतकाळातील त्या रम्य आठवणी विसरुन त्याहीपेक्षा जीवनात रंग भरेन. तुझा जीवलग सखा बनून. वचन देतोय मी तुला की तुझ्या डोळ्यांच्या कडाही ओलावणार नाहीत. ही माझी जबाबदारी. कळल म्हणत त्याने तिला जवळ ओढली अगदी ह्दयाशी घट्ट धरली. तिच्या श्वासात त्याचे श्वास मिसळले ते एकमेकात सामावून गेले. कधीही अलग न होण्यासाठी.

सकाळी चहा देताना आईनेही फक्त त्याच्याकडे एक कटाक्ष टाकला. त्याच्या चेहऱ्यावरचा आनंद बघून तिही समाधान पावली तिने हासत हासत विचारले. "अनुश्री अजुन ही उठली नाही. रात्रभर तिला झोपु दिले नसशील" ए आई काय ग तू पण. माझा लेक असलास तरी मित्र आहेस हो माझा, कळल आई ऐकना, बोला ती मला युवराज का म्हणाली

हे ही तिने सांगितले हो. भलेही पुर्नजन्म वगैरे काही नसत असं म्हटल तरी कुठेतरी काहीतरी जाणवतच ग आई. "आई मी खरच खुप खूष आहे." हेच हवय मला तुम्ही दोघं सुखानी संसार करा. यातच मला आनंद आहे. मला पाहायचाय तुमचा सुखी संसार. "आणि मला पन्हाळा" म्हणत अनुश्री तिथे अचानक आली. तसे तिघेही मनसोक्त हसले. "मम्मा मला ह्याच्या सोबत पन्हाळा पाहायचा आहे आजच." मम्मा अग मी आई म्हणतो आणि तु मम्मा काय म्हणतेस. मी मम्माच म्हणणार कारण माझी मम्मा कालपर्यंत ती माझी मामा होती आता ही माझी मामा आहे कळलं. होना मामा. वसुंधराने तिला जवळ घेतली आणि आईच्या मायेने तिचे पटापट मुके घेतले.

हो मी तुझी मम्माच आहे. मला मुलगी नव्हती देवाने माझी ती इच्छा पुर्ण केली. हे घर तुझ आहे. इथली माणसं तुझी आहेत. आणि सर्वात महत्वाच म्हणजे तु युगंधरला जपशील यात शंकाच नाही, पण आज ज्या निरागसपणे तू मला मामा म्हणालीस ना अनुश्री या क्षणी तुझ्या कौतुकाला माझ्याकडे शब्द नाहीत. आणि हो जा पटकन आवर जा आणि माहेरी वावरायचीस तशीच वावर हो. हे घर तुझच आहे. तुझ्याच आगमनासाठी सहवासासाठी तुझ्या हातातील बांगड्याच्या किणकिणीसाठी, पायातील पैजणांच्या धुमधुमतेसाठी हे घर आतुरले होते. ही वस्तु सदैव तुझ भलच चिंतले. नेहमीच सकारात्मक विचार कर. आणि युगंधर तुही आता प्रत्येक गोष्ट आईला सांगितली नाही तरी चालेल हो आणि जा पटकन आवरा जा. जायचय ना. हो मामा पन्हाळ्याला जायचय. ये अनु पण मी कधी असं बोललोय. तू नाहीस बोललास मी ठरवलय ना मला पन्हाळा पाहायचाय न तो ही तुझ्यासोबत.

⬟



## मेनू

### कोकोनट चॉकलेटच्या वड्या

**साहित्य :** २ छोटे मारी बिस्कीटचे पुडे, २ चमचे चॉकलेट पावडर, २ वाट्या बदाम पुड, १ वाटी काजु पुड, २ वाट्या सुक्या नारळाचा चव, दीड वाटी पिठी साखर, १ टीन कंन्डेन्स मिल्क अर्धी वाटी दूध.

**कृती :** मारी बिस्कीट मिक्सरवर बारीक करुन घ्या. एका प्लेटमध्ये ओतून त्यामध्ये दोन चमचे चॉकलेट पावडर एक वाटी बदामाची पूड पाऊन टीन कंन्डेन्स मिल्क घालून ते पीठ मळा. त्यात थोडे दूध घाला. आणि साधारण त्या पिठाचे तीन गोळे करा. हा गोळा चॉकलेटी रंगाचा होतो.

सारणासाठी : दोन वाट्या नारळाचा चव, एक वाटी बदाम पूड, एक वाटी काजु पूड, (काजु किंवा बदामची पावडर असेल तरी चालेल. किंवा दोन्हीपैकी एकाची पूड घेऊन एक वाटी मिल्क पावडर घालून ही वडी बनविता येते.) पाव टीन कंन्डेन्स मिल्क, दीड वाटी पिठीसाखर घालून तीन गोळे करुन घ्यावे. त्यात थोडे दूधही घालावे. या सारणाचेही तीन गोळे करुन घ्यावेत. चॉकलेटी कलरच्या गोळ्याला तूप लावून तो मध्य जाडीपर्यंत लाटावा. दुसऱ्या बाजुला सारणाचा गोळा त्या गोळ्या पेक्षा कमी जाडीचा लाटावा. लाटताना तूप लावावे. मध्यम आकार झाल्यावर तो उचलून चॉकलेटी पोळीच्या वर ठेवून हाताने पसरविला तरी चालतो. आणि त्याचे हलके दावत रोल करावेत. रोल फ्रीजमध्ये २ तास ठेवून द्यावेत. आणि मग त्याच्या वड्या पाडाव्यात.

## संगणकाची हिस्ट्री कुठे असते ?

संगणकावरील इंटरनेट एक्स्प्लोअर ओपन करुन तुम्ही ज्या संकेतस्थळांना भेटी देता म्हणजे ओपन करता त्याची नोंद होत असते. ही नोंद संगणकावरच होते. त्यामुळे तुमच्या माघारी एखाद्याने इंटरनेटवरील काही साईट्स पाहिल्या तर त्याबाबत माहिती घेऊ शकता. यासाठी इंटरनेट एक्स्प्लोअर ओपन करुन वरील व्ह्यूमध्ये एक्स्पोर्टस् बार या पर्यायामधील हिस्ट्रीवर क्लिक केले असता संबंधित माहिती तुम्हाला मिळेल. यासाठी कंट्रोल + शिफ्ट + एच ही शॉर्ट कीही आहे. याचा फायदा आपल्यासाठी होतो. काल ओपन केलेली एखादी साईट पुन्हा आज पाहण्यासाठी हिस्ट्रीमध्ये जाऊन त्या साईटच्या लिंकवर क्लिक करुन हा शोध घेता येतो.



## दीपावलीच्या हार्दिक शुभेच्छा!




## प्रिमियम भरण्याचे अधिकृत केंद्र

## SALES & SERVICE CENTRE

आपण LIC चा हप्ता कोणताही अधिक चार्ज न भरता आमच्याकडे कॅश अथवा चेकच्या स्वरुपात भरु शकता. आपल्या कोणत्याही LIC पॉलिसी संदर्भात मोफत मार्गदर्शन मिळेल.

**आपण कॉलेज विद्यार्थी, गृहिणी, नोकरदार, निवृत्त (रिटायर्ड), होतकरु, समाज कार्याची आवड असणारे, जिद्द असणारे अशांपैकी असाल तर...**

**आपणासाठी सुवर्ण संधी आहे**

भारतातील अग्रगण्य सरकारमान्य कंपनीतर्फे विमा सल्लागार म्हणून काम करु शकता अथवा आमच्यातर्फे Marketing Executive म्हणून Fixed Payment वर काम करु शकता.

★ पहिल्या पाच वर्षानंतर दरवर्षी पैसे मिळणारी योजना
★ मुलांच्या शिक्षणासाठी अभिनव योजना
(इ. १ ली ते पदव्युत्तर शिक्षणापर्यंत दरवर्षी पैसे देणारी योजना)
★ कमी हप्ता योजना-आम आदमी बिमा योजना (रु. २७५/- पासुन पुढे)
★ मध्यमवर्गीय बचत योजना (फक्त ८ वर्ष हप्ता भरण्याची सुविधा व २१ वर्ष पॉलीसी चालु राहून मुदतीनंतर आपल्या हप्त्याच्या तिप्पट रक्कम मिळणारी योजना)
★ फक्त पाच वर्षे बचत करा व २० वर्ष फायदा घ्या. मुदतीनंतर रु. २,५२,०००/- घ्या. (कमीत-कमी रु. १०००/- द. म.)
★ आपल्या आजारपणाच्या खर्चापेक्षा जास्त रक्कम मिळवून देणारी नविन योजना-कॅशलेस योजना प्रिमीयम हॉलीडे प्लॅन (१५ वर्षात ४ वर्षे हप्ते न भरता फायदा देणारी योजना)
★ आजारपणाच्या खर्चापेक्षा जास्त रक्कम मिळवून देणारी अभिनव योजना
★ वार्षिक रु. ५०००/- भरुन रु. ५० लाख अपघाती विमा रक्कम मिळवा. व दर आठवड्याला रु. १५ हजार (Disability Benefit) मिळवा.

**प्रथम पन्नास उमेदवारांना प्रशिक्षण मोफत दिले जाईल.**

**श्रीकांत रा. सातोदकर**
(मुख्य विमा सल्लागार)
**SRS ENTERPRISES**
रेणूका भक्ती बिल्डींग, तळमजला, विठ्ठल मंदिराच्या मागे, वाणीआळी, कुळगांव-बदलापूर (पू.).
**दुरध्वनी २६९७७३४ मो. ९८२२८७३७६२**
E-mail : srsenterpeisessmaillbox@rediffmail.com /shri0805@rediffmail.com



# मोकळा श्वास

- सिंधू वसंत पाडळकर
कुळगांव-बदलापूर.

सुलभाताईने दवाखान्यात डॉक्टरपुढे आपला रक्ताचा रिपोर्ट दाखवला. डॉक्टरने सुलभाताईचे बी.पी. चेक केले. डॉक्टरांनी रक्ताचा रिपोर्ट पाहून रक्त कमी असल्याचे सांगितले. सध्या मी रक्त वाढीसाठी औषध लिहून देतो. बी.पी. च्या गोळ्या लिहून देतो. त्या गोळ्या नियमित घेत जा. रक्त वाढले नाहीतर कोणत्याही गोष्टीचा अति विचार करीत बसू नका. डॉक्टरनी दिलेला सल्ला ऐकून शेजारी बसलेल्या रमेशपंतांनी सुलभाताईकडे पाहिले. ते म्हणाले, मी तिला हेच सांगतो. सगळं ठीक होईल पण ती ऐकेल तर ना?

सुलभाताई न बोलता उठल्या. डॉक्टरांना थॅंक्स म्हणत त्या दवाखान्याबाहेर पडल्या. सुलभाताई आपली काळजी, आपले दु:ख कुणाला सांगू शकत नव्हत्या. रक्त मला द्यावे लागणार डॉक्टर म्हणाले. रक्त मला नको माझा मुलगा ओंकारला द्या. ऐखाद्या शांत, समजुतदार माणसाचे ओंकारचा स्वभाव बदलायला हवा. रक्ताचे प्रकार असतात. एका गटाचे रक्त दुसऱ्या माणसाला देतात ते रक्त चालेल का पाहावे लागेल. रक्तगट जुळत असल्यास रक्त माणसाला देता येते. सुलभाताईच्या मनात आले. माणसाच्या स्वभावाचे अनेक प्रकार आहेत. शांत माणसाचे रक्त तापट माणसाला देता आले तर. अति हुशार माणसाचे रक्त मतिमंद माणसाला देता आले तर किती चांगले होईल. पण हे शक्य नाही. रक्तावर हुशारी अवलंबून नाही. हुशारी मेंदूवर अवलंबून आहे. असाच तापट मेंदू ओंकारचा आहे. अति हुशारी त्याचा तापट स्वभाव बनायला कारण झाली आहे.

सुलभाताई घरात सर्वात मोठ्या त्या तीन बहिणी एक भाऊ. त्यांनी कॉलेजात प्रवेश घेतला. त्या पदवीधर झाल्या. वडिलांनी लग्नाचे विचारले. मुलगा मुंबईला सरकारी नोकरी करीत होता. कल्याणला चाळीत खोली होती. आई-वडिल, भाऊ गावाला राहत होते. बहिणीचे लग्न झाले होते. लग्न झाल्यावर

सुलभाताईनी नोकरीसाठी प्रयत्न सुरु केले. पण त्यांना दिवस गेले. नोकरिचा विचार त्यांनी मनातून काढून टाकला. सुलभाताईना मुलगा झाला. त्यांनी त्याच नांव ओंकार ठेवलं. ओंकारच्या पाठीवर मुलगी झाली. तिचे नाव अमृता ठेवले. ओंकार दोन वर्षाचा झाला होता. तो चालत होता. बोलत होता. पण ओंकार अमृताला आईला घेऊ देत नव्हता. पाय आपटायचा. आकांडतांडव करायचा. आई फक्त माझी आहे म्हणत असे.

ओंकार शाळेत जाऊ लागला.आणि लक्षात आले ओंकार खुप हुशार आहे. त्याचा वर्गात पहिला नंबर येई. सुलभाताई त्याचे कौतुक करीत. त्याचा तापटपणा त्या विसरुन जात. त्याला पाहिजे ते त्या घेऊन देत. दहावीला तो शाळेत पहिला आला. बारावीला कॉलेजात पहिला आला. बी.ई.ला त्याला गोल्डमेडल मिळाले. पुढे शिक्षणासाठी त्याला संधी मिळेना. तो विथरला. नोकरी मिळे पण तो कुठे नोकरीत टिकत नसे. रुपा अमृताची मैत्रिण त्याच्या शाळेत होती. ती ही १२ वी सायन्स झाली नी इजिनिअर झाली व अंधेरीला नोकरीला लागली. कल्याणलाच ती आई-वडिलांबरोबर राहत होती. तिला धाकट्या दोन बहिणी होत्या. लहानपणापासून ती ओंकारला ओळखत होती. दोघेही कल्याणहून अंधेरीला कामावर बरोबर जात. त्यांची मैत्री वाढत गेली.

एक दिवस रुपाचे आई-वडिल घरी आले. सुलभाताईना हे अपेक्षित नव्हते. तशी रुपाची व अमृताची एका शाळेत असल्यामुळे ओळख होती. रुपा ओंकार बरोबर लग्न करायचे म्हणते रुपाची आई म्हणाली. हो का ? " ओंकार मला काही म्हणाला नाही. त्या दोघांनी एकमेकांना पसंत केले असेल. व लग्न करणार असतील तर माझी व यांची हरकत असणार नाही. दोघांचे लग्नाचे वय झाले आहेच. दोघेही मिळवते आहेत. सुलभाताई रुपाच्या आईला म्हणाल्या. रमेशपंत चकीत होऊन सुलभाताईना पाहत होते. कालच सुलभाताई ओंकारचे लग्न आपण करायला नको. नोकरीची धरसोड आणि त्याचा तापट स्वभाव, दुसऱ्याची मुलगी आपल्या घरात आल्यावर आपल्याला दोष देईल म्हणाल्या होत्या.

रुपाचे आई-वडिल गेल्यानंतर सुलभाताई रमेशपंताना म्हणाल्या ओंकारचे लग्न झाल्यावर अंगावर जबाबदारी पडल्यावर तो सुधारेल. रमेशपंतांना सुध्दा ते पटले. अमृता एम. ए. होऊन तिचे लग्न होऊन वर्ष झाले होते. ओमकारचे लग्न झाल्यावर त्या कर्तव्यमुक्त झाल्या असत्या. सुलभातईनी अमृताला फोन केला. अमृता म्हणाली आई तु मध्ये पडू नकोस. ते दोघे लग्न करतात तर करु दे. रुपा लग्न झाल्यानंतर घरात आल्यावर तुझ्याशी वैर धरील. तु पसंत केलेल्या मुलीशी ओंकारचे लग्न झाले तर ती मुलगी तुलाच दोष देईल. सुलभाताईना अमृताचे विचार पटले. ओंकार व रुपाचे लग्न थाटामाटात झाले. पण काही दिवसातच दोघात बिनसले. त्यांच्यात भांडणे होवू लागली. भांड्याला भांडे लागणारच. संसारात वादविवाद होतातच, भांडणाची कारणे क्षुल्लक असताना ओंकारचा चिडका स्वभाव हे भांडण्याचे मुळ आहे. हे सुलभाताईना कळून चुकले. त्याचा अंहभाव संसार सुखाने होवू देणार नाही. हे ही कळले. सुलभाताईने ओंकारला व रुपाला भांडणाबद्दल काही विचारले नाही. त्या तटस्थ होत्या.

काही दिवस गेल्यानंतर रुपा सुलभाताईना म्हणाली आम्हाला अंधेरीला कामाला जायला इथुन लांब पडते. आम्ही ठाण्याला घर घ्यायचे म्हणतो. माझी काही हरकत नाही. तुम्ही भांड्याने घर बघणार का ? सुलभाताईनी विचारले. नाही आम्ही स्वत :चे घर घ्यायचा विचार करतो. मी माझ्या पगारावर कर्ज काढणार आहे. रुपाने उत्तर दिले. मग चांगलेच आहे की, सुलभाताई

म्हणाल्या, रुपाची आई रस्त्यात भेटायची पण सुलभाताईंना टाळायची. ओळखपण दाखवायला तयार नसायची. सुलभाताईंना वाईट वाटायचे. रमेशपंत रिटायर्ड झाले .ते आता घरी असत त्यांना फंड मिळाला होता. पेन्शनपण चालु झाली होती. रमेशपंताना रुपा ठाण्याला घर घेत आहे. असे सुलभाताईंनी सांगितले.

एक दिवस रुपा कामावर जायला निघाली. रमेशपंतानी तिला थांबविले व विचारले मी तुला किती रुपये देऊ. मला पगारावर ४० लाख रुपये कर्ज मंजुर होईल. इन्कमटॅक्स वाचेल तेव्हा सध्या तुम्ही १० लाख रुपये देऊ शकाल का? रुपा म्हणाली. रमेशपंतानी तिच्या हातात १० लाख रुपयांचा चेक दिला. थँक्यु बाबा. रुपा म्हणताना तिचे डोळे भरुन आले. रमेशपंताना ओंकारकडून कधीही आशी पोचपावती मिळाली नव्हती. रुपाने रमेशपंताना ठाण्याला घर घेतल्याचे सांगितले. सुलभाताईंनी न बोलता लग्नात त्यांना आलेल्या आहेराच्या वस्तु समोर ठेवल्या. नंतर सुलभाताई म्हणाल्या घरातील काही भांडी, डबे तुला पाहिजे ते हक्काने नेवू शकतेस. रुपाने सर्व वस्तु व काही स्वयंपाकाची भांडी घरातून निवडून घेतली. तिने नविन घराचे गणेशपुजन केले. तिचे आई-वडिल, बहिणी यांना बोलविले पण सुलभातईना बोलावले नाही.

रुपा व अमृता मैत्रिणी होत्या अमृताला गणेशपुजनाला रुपाने आग्रहाचे निमंत्रण दिले. रुपाकडून ठाण्याला जाऊन आल्यानंतर ती आईला भेटायला आली. सुलबाताईंना गणेशपुजनाला रुपाने का बोलावले नाही याचे कारण अमृताकडून सुलभाताईंना समजले. आईने मुलाला नीट वळण लावले नाही, त्याच्यावर संस्कार केले नाहीत. तो इथे राहायला आल्यानंतर मी त्याला सुधारेल. तुझ्या आईने मला ओंकारच्या स्वभावाबद्दल कल्पना दिली असती तर मी ओंकारशी लग्न केले नसते. आता माझ्या दोन बहिणी लग्नाच्या आहेत. मी माहेरी जाऊन राहू शकत नाही. मात्र मला मुलगा झाला तर मी त्याला लहानपणापासून वर्तुणुकीचे धडे देईन. अमृता जाता-जाता थांबली आणि म्हणाली आई मनाला लावून घेऊ नकोस. पण रुपा म्हणाली ओंकारला मी स्पष्ट सांगितले आहे. तु कल्याणला आईला भेटायला जायचे नाही आणि फोनपण करायचा नाही.

अमृता निघून गेली. सुलभाताईंना चक्कर आली. पण त्यांनी स्वत:ला सावरले. विषारी कडू घोट त्या गिळत आल्या होत्या. त्या मानसिक रोगी झाल्या होत्या. ओंकार हट्टी व जिद्दी होता. त्याच्यावर संस्कार करण्याचे प्रयत्न त्यांनी खुप केले. पण त्याचा अहंपणा, मीपणा त्यांना खटकत होता. ओंकार स्वत:मधील दोष कमी करण्याचा प्रयत्न करीत नव्हता. तो मित्रांबद्दल बोलताना तुच्छतेने बोलत असे. कुणापुढेही न झुकणारी ताठ माणसे पाहायला त्याला आवडतात. पण दुसऱ्याला कमी लेखणारा ओंकार कुणालाही आवडत नव्हता. प्रवासात आपण एकटे नसतो. बरोबर सहप्रवासी असतात. ओळखी होतात. आयुष्याच्या प्रवासात ओंकारने मित्र जमवले नव्हते. आता रुपा त्याच्या स्वभावाला वळण लावणार होती. त्याची मैत्रिण बनणार होती. सुलभाताई दु:खाचे जहर पचविणार होत्या. ओंकारपासून दूर होऊन त्या सुखाने श्वास घेणार होत्या. आठवणीच्या भूतकाळाचे भूत मानेवरुन उतरुन टाकणार होत्या.

ओंकारच्या आयुष्यात घडलेल्या घटनेचा सुखदु:खाचा चढउताराची ओळख त्या पुसून सुखाची चादर लपेटून शांत झोपणार होत्या. आता त्यांना डॉक्टरची जरुरी लागणार नव्हती. सुलभाताईंचे बी.पी. नॉर्मल येणार होते. रक्त वाढणार होते. रुपा त्यांना भेटणार नव्हती. त्यांना फोन करणार नव्हती. तरीही मनातल्या मनात त्यांनी तिचे आभार मानले. ओंकार त्यांना भेटणार नव्हता, फोनही करणार नव्हता. तो सुखी व्हावा एवढीच त्यांची इच्छा होती. ओंकार सुखी झाला तर त्या मोकळा श्वास घेणार होत्या.

---

## मेनू

## बटाट्याचा चिवडा

***साहित्य*** : बटाट्याचा जाड करुन तो उन्हाळ्यात वाळवून ठेवावा. किंवा बाजारात कच्चा मिळतो तो आणावा. दोन वाट्या बटाट्याचा कीस, अर्धी वाटी शेंगदाणे, तिखट, मीठ, तेल आणि साबुदाण्याचे पोहे अर्धी वाटी.

***कृती*** : बटाट्याचा कीस तेलात तळून घ्यावा. शेंगदाणे व साबुदाणा पोहे देखील तळून घ्यावे. सर्व पेपरवर घालावे. म्हणजे चिवडा तेलकट होत नाही. नंतर त्यावर २ चमचे लाल तिखट चवीनुसार मीठ, २ चमचे जिरेपूड व २ चमचे पिठीसाखर घालून व्यवस्थीत हलवावे. उपासाला कुरकुरीत चिवडा होतो.



# शेरास सव्वाशेर

- रश्मी कुलकर्णी
डोंबिवली, जि. ठाणे.

रामदास नावाचा एक व्यापारी होता. त्याचा मित्र धंद्यासाठी परदेशी गेला होता. तो रामदासला भेटला. बोलता-बोलता रामदासने विचारले "किसनलाल" तू बरझाकला गेला होतास तिथे तुझा धंदा कसा झाला? माझा धंदा चांगला झाला. त्या धंद्यात मला खुप फायदा झाला. पण मी तिकडे चंदन घेऊन गेलो असतो तर मला अधिक पैसे मिळाले असते. कारण तिकडे चंदन दुर्मिळ आहे. पण मित्र म्हणून मी तुला एक सल्ला देईन की पैशाच्या लोभाने तू त्या शहरात जाऊ नकोस. रामदासने किसनलालला असा सल्ला देण्याचे कारण विचारले. त्यावर किसनलालने काहीच उत्तर दिले नाही. थोडा वेळ थांबुन तो निघुन गेला.

किसनलालने दिलेला सल्ला रामदासला मुळीच आवडला नाही. त्याने बरझाक शहरी जाऊन चंदनाचा व्यापार करण्याचे मनाशी पक्कं ठरवले. तो लगेच त्या शहरी जाण्याच्या तयारीला लागला. एक दिवस चांगला मुहूर्त पाहून त्याने प्रस्थान केले. चांगले सुवासिक चंदन उंटावर लादून तो प्रवासाला निघाला. काही दिवस प्रवास केल्यानंतर तो एका मोठ्या मैदानाजवळ आला. मैदानापलीकडील वाळवंट ओलांडून गेल्यावर तो बरझाक शहरात पोहचणार होता. रामदास मैदानातून जात होता. तेवढ्यात तेथे मेंढ्या चारणारी एक म्हातारी बाई त्याच्याजवळ आली. तिने त्याला विचारले, तुम्ही हा माल विकण्यासाठी बरझाक शहरी जात आहात का? "हो हो माल विकण्यासाठीच मी तिकडे जात आहे" पण तुम्ही मला असे का विचारता? कारण तू बरझाक शहरी व्यापारासाठी जाऊ नये असे मला वाटते. त्या शहराचा लौकिक फारसा चांगला नाही. स्पष्टच बोलायचे तर ते शहर लवाड, लफंग्यांनी आणि चोरांनी भरलेले आहे. तेथे आलेल्या परकीय माणसाला लुबाडायचे हाच तिथल्या लोकांचा मुख्य धंदा आहे. तेव्हा तु पुढे जाऊ नकोस मागे फिर. आपल्या गावी परत जा.

"आजी" तुम्ही मला त्या लोकांबद्दल कल्पना देऊन सावध केलेत. याबद्दल मी तुमचा आभारी आहे. पण मी सुध्दा पक्का आहे. मला त्या टगांची मुळीच भीती वाटत नाही. उलट मीच

त्यांना चांगला धंदा शिकवीन. त्यांना असा इंगा दाखवीन की जगात शेराला सव्वाशेर कधीतरी भेटतोच हे त्यांना चांगलेच समजेल. "बाबा रे" मी तुला सावध केले. आता पुढे कसे वागायचे ते तुझे तु ठरव. आजीबाईला नमस्कार करुन रामदास पुढे निघाला. मजल दरमजल करीत तो बरझाक शहरात येऊन पोहचला. तेथे तो एका पथिकाश्रमात उतरला. दुसऱ्या दिवशी सकाळी चंदन लादलेला उंट घेऊन तो बाजारातून चालला असता व्यापाऱ्यासारखा दिसणारा एक माणूस त्याच्याजवळ येऊन म्हणाला, "राम राम पाव्हणं" काय घेऊन आलाय बाजाराला? उंची चंदन आणलंय. इथं चंदनाला खूप चांगला भाव येतो ना! छे हो तुम्हाला कुणीतरी चुकीची माहिती दिलेली दिसते. इथे चंदन खूपच स्वस्त झालंय. चंदनाला गिऱ्हाईकच मिळत नाही. तो माणूस म्हणाला. रामदास म्हणाला, तुमच्या या बोलण्यावर माझा मुळीच विश्वास नाही. तुम्ही चंदनाला चांगला भाव देणार असाल तरच पुढे बोला नाहीतर उगाच बोलायला मला वेळ नाही. या शहरात चंदन सोन्याशी तोळतात असे सांगतात. मला योग्य किंमत मिळाली तरच मी व्यवहार करीन. असे रागावू नका. आता तुम्हीच काय ती रास्त किंमत सांगा. मी उद्या तुमचे पैसे चुकते करतो आणि माल ताब्यात घेतो. मी तुम्हाला पाहिजे ती किंमत देईन. मग तर झाले तो माणूस म्हणाला.

रामदासला हा सौदा रास्त वाटला. त्याने उंट हाकणाऱ्याला उंट माघारी पथिकाश्रमात वळवून घेण्यास सांगितले. तो आता एकटाच बाजारातून चालला होता. जाता-जाता गर्दीमध्ये त्याचा एका माणसाला धक्का लागला. "क्षमा करा! चुकून धक्का लागला" मी माझ्या विचारात होतो. असे म्हणून तो पुढे निघाला. पण तेवढ्यात त्या माणसाने रामदासचा खांदा आपल्या बळकट पंजाने पकडून त्याला थांबवले. रामदास थांबला त्याने त्या माणसाकडे लक्ष देऊन पाहिले. त्या माणसाचा एक डोळा पुर्वीच गेला होता. पण आता त्या माणसाने आरडा ओरडा, कांगावा सुरु केला होता. त्याचा डोळा जाण्यास रामदासच जबाबदार आहे असे तो तावातावाने सांगत होता. त्याच्या ओरडण्याने तेथे बरेच लोक गोळा झाले. रामदास गांगरुन गेला होता. तो काही बोलत नव्हता. त्या एकडोळ्याचे सांगणे लोकांना पटले होते. रामदास दोषी असल्याचा त्यांचा समज झाला. रामदासने लोकांना काही सांगण्याचा प्रयत्न केला पण त्याचा काही उपयोग झाला नाही. जमाव आता चांगलाच चिडला होता. रामदासला धक्काबुक्की सुरु झाली. आता हे प्रकरण हातघाईवर येणार आणि ते आपल्या अंगावर चांगलेच शेकणार हे लक्षात येताच रामदासने आपली नसलेली चूक मान्य केली. तो एकडोळ्या आपल्या डोळ्याच्या बदल्यात त्याचा एक डोळा मागू लागला. अथवा ते मान्य नसल्यास तो मागेल ती नुकसान भरपाई देण्याचे कबुल केले तरच रामदासची सुटका होणरा होती. आता दुसरा मार्गच नव्हता. त्यामुळे त्या एकडोळ्याचे म्हणणे मान्य करुन रामदासने आपली सुटका करुन घेतली.

आता रामदास स्वत:वर खूप चिडला होता. तो पथिकाश्रमाकडे निघाला तो एका दगडावर जोराने टेचकाळला. त्याच्या पायातील जोड फाटला. रस्ता तापला होता. अनवाणी चालणे शक्यच नव्हते. जोडा दुरुस्त करुन घेणे भागच होते. त्याने चांभार शोधून काढला. तो चांभारापुढे जाऊन उभा राहिला. पण चांभाराने त्याच्याकडे पाहिले देखील नाही. रामदासने त्याचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतले. तो चांभाराला म्हणाला, चांभारदादा माझा हा जोडा जरा लवकर दुरुस्त करुन द्या ना! हातातील काम जराही बाजुला न करता चांभार म्हणाला मी आता कामात आहे काही दिवस पुरेल एवढे काम मी आताच घेऊन टेवले आहे. दुसरे काम करायला मला जरासुध्दा वेळ नाही. तुम्ही जोडा हातात घेऊन खुशाल चालत जा. बाबा रे असे करु नको, तू मला जोडा दुरुस्त करुन दे तुझी काय मजुरी होईल ती मला सांग. हे पहा दादा, मला जरासुध्दा वेळ नाही. तुम्ही म्हणता म्हणून मी तुमचे काम करुन

देईन. अगदी तुमचे समाधान होईल असे. पण मग तुम्हाला माझे समाधान होईल याची काळजी घ्यावी लागेल. मान्य तुझे समाधान होईल हे मी अवश्य पाहीन रामदासने सांगितले. चांभाराने रामदासचे काम चांगले करुन दिले. रामदासने मजुरी घेण्यासाठी चांभाराला दुसऱ्या दिवशी पथिकाश्रमात येण्यास सांगितले.

आतापर्यंत झालेल्या त्रासाने रामदास पार थकुन गेला होता. वाटेने जाताना एका बाजुला निवांत जागा पाहून रामदास तेथे खाली मान घालून बसून राहिला. त्याच्यापासून काही अंतरावर एक म्हातारा बसला होता. रामदासजवळ येऊन त्याने विचारले, बाबा रे या शहरात तु नवखा दिसतोस. तु असा खाली मान घालून का बसला आहेस? इथल्या भामट्यांनी तुला हात दाखवलेला दिसतो. तु तुझी हकिकत मला नीटपणे सांगशील तर कदाचित मी तुला मदत करु शकेन. म्हाताऱ्याने आपुलकीने केलेल्या चौकशीने रामदासला बरे वाटले. त्याने तो त्या टकांकडून कसा फसवला गेला ते सारे भडाभडा सांगून टाकले. त्याचे ते सर्व बोलणे त्या आजोबांनी शांतपणे ऐकून घेतले. मग ते म्हणाले, म्हणजे दलाल, एकडोळ्या आणि चांभार अशा तिघांनी तुला पुरते टकवले आहे. तु त्या माणसांच्या केलेल्या वर्णनावरुन ते



टक कोण हे माझ्या लक्षात आले आहे. आता तू घाबरु नको. धीर धर त्या टकांवर अजूनही तू मात करु शकशील. आज संध्याकाळी ह्या शहराच्या पुर्व दिशेकडील वेशीतून तू बाहेर पड. तेथे एक वडाचे मोटं झाड आहे त्या झाडाखाली एक आंधळा बसलेला तुला दिसेल. लोक त्याला एक भिकारी समजतात पण तो ह्या टकांचा गुरु आहे. आज संध्याकाळी काळोख पडू लागला की हे सर्वजण त्याच्याकडे जातील. त्यांचा पराक्रम त्याला सांगतील. त्यावर तो आंधळा काय बोलतो ते नीट ध्यान देऊन ऐक. तुला ह्या टकांच्या जाळ्यातून बाहेर पडण्याचा मार्ग निश्चित सापडेल. दिलेल्या सल्ल्याबद्दल आजोबांचे आभार मानून रामदास पथिकाश्रमात गेला. आजोबा आपल्या मार्गाने निघून गेले. संध्याकाळी रामदास पुर्वेकडी वेशीतून बाहेर पडला. तेथून जवळच असलेल्या वडाच्या झाडाखाली तो आंधळा बसला होता. रामदास तेथे जवळच एक आडोसा पाहून लपून बसला.

थोड्यावेळाने रामदासला फसवणारे तिघेही टक त्या आंधळ्या भोवती कोंडाळे करुन बसले. त्यांनी त्या एक चंदनाच्या व्यापाऱ्याला फसवून कसे पेचात पकडले आहे ते सविस्तर सांगितले. रामदासला त्यांचे बोलणे ऐकू येत होते. आता तो आंधळा काय म्हणतो ते ऐकण्यासाठी तो सावधपणे बसला. पहिला टक म्हणाला मी त्या व्यापाऱ्याला त्याचे चंदन विकण्यासाठी इतर कुणाला भेटूच दिले नाही. त्यापुर्वीच मी त्याच्याशी सौदा करुन टाकला. त्याला इथल्या चंदनाचा भाव माहीतच नाही. त्यामुळे तो उद्या भेटला की माझ्याजवळ फार तर तीन पिशव्या सोन्याच्या मोहरा मागेल. मी त्या आनंदाने देईन. तरीदेखील मला कितीतरी फायदा होईल. तु मुर्ख आहेस उद्या तू त्याला भेटायला गेलास आणि त्याने तुला सांगितले की त्याला चंदनाचा मोबदला म्हणून तीन पिशव्या सोने नको तर त्याचा चंदनाच्या भारंभार चंद्रकिरण हवे आहेत. तर तू काय करशील? कशाच्याही भारंभार चंद्रकिरण देणे कधीच कोणाला शक्य होणार नाही. तु आता इथे थांबु नकोस चालू लाग. आंधळ्याने असे सांगितल्यावर नकली व्यापारी खाली मान घालून चालू लागला.

आता एकडोळ्या पुढे सरसावला. मी त्या व्यापाऱ्याला बेमालून गंडवले आहे. पुर्वीच कधीतरी गेलेल्या माझ्या डोळ्याबद्दल मी त्याला जबाबदार ठरवले. त्या डोळ्याच्या मोबदल्यात मी त्याच्याकडून त्याचा एक डोळा किंवा मागेन तेवढी संपत्ती देण्याचे कबुल करुन घेतले आहे. तो डोळा देणार नाही. तेव्हा त्याची संपत्ती मलाच मिळणार. दुसऱ्या दोघांनी त्याचे कौतुक केले. त्यामुळे आंधळा आणखीनच चिडला तो म्हणाला, तू अगदीच बिनडोक आहेस. जर तो व्यापारी म्हणाला तु तुझा डोळा काढ मी माझा

डोळा काढतो. आपण दोन्ही डोळ्याचे वजन करु. दोन्ही डोळ्यांचे वजन सारखे झाले तर प्रश्नच नाही तू माझा डोळा घेऊन टाक. पण माझ्या डोळ्याचे वजन कमी भरले तर मी त्या बदल्यात पाचशे मोहरांचे बक्षीस देईन. तो त्याच्या एका डोळ्याने पाहू शकेल. त्याचा व्यवहार करु शकेल. पण तुझे मात्र दोन्ही डोळे गेल्याने आंधळा झालेला तू काय करशील? सर्वजण हसू लागले. एकडोळ्या तिथुन उठला आणि चालू लागला. आता चांभार पुढे आला. तो माणूस म्हणाला शेख साहेब तुम्ही असे रागावू नका. मी त्या व्यापाऱ्याचा जोडा दुरुस्त करुन दिला. त्याबद्दल मी समाधानी आहे. असे शब्द माझ्या तोंडून निघेपर्यंत त्या व्यापाऱ्याने मला त्याची संपत्ती देण्याचे मान्य केले आहे. त्याची सर्व संपत्ती माझ्या ताब्यात आल्यावरच माझे समाधान झाले असे मी म्हणेन. पण तो म्हणाला की, ह्या देशाच्या बादशहावर सर्वांचे प्रेम आहे. त्याच्या राज्यात सर्वजण सुखी, समाधानी आहेत. तु समाधानी आहेस ना! तर तुला होय म्हणावेच लागेल. तु नाही म्हणालास तर तो बादशहाचा अपमान होईल. तुला फासावर चढवण्यात येईल. खेटर मारल्यागत तोंड करुन चांभार तेथून निघून गेला. त्यानंतर ते सर्व ठक निघून गेल्याचे पाहून व्यापारी तेथून निघून पथिकाश्रमात येऊन स्वस्थ झोपला.

दुसऱ्या दिवशी सकाळीच एकडोळ्या आला. तो रामदासला म्हणाला, रामदास तु तुझा डोळा काढून देतो आहेस ना! होय मी माझा डोळा काढून द्यायला तयार आहे. पण त्यापुर्वी तु तुझा डोळा काढ. मी माझा डोळा काढतो. आपण दोन्ही डोळ्यांचे वजन करु. दोन्ही डोळ्यांचे वजन सारखे भरले तर प्रश्नच नाही. तु माझा डोळा घेऊन जा. पण जर एकडोळ्या त्याचे पुढचे बोलणे ऐकायला तिथे थांबलाच नाही. तो तिथून सटकला. नंतर आला चांभार. तो म्हणाला तु माझे समाधान करणार आहेस ना! मग तुझा सर्व पैसा अडका माझ्या स्वाधीन कर, तरच माझे समाधान होईल. चल आटप लवकर. हो पण जरा थांबा ह्या देशाचा बादशहा न्यायी आहे. त्याच्या राज्यात सर्वजण सुखी-समाधानी आहेत. तुही समाधानी आहेस असे मला वाटते. रामदास म्हणाला. हो खरं आहे. मी पुर्ण समाधानी आहे म्हणत चांभाराने काढता पाय घेतला. नंतर आला चंदनाचा व्यपारी. त्याने रामदासपुढे सोन्याच्या मोहरांनी भरलेल्या तीन पिशव्या ठेवल्या आणि तो म्हणाला, हे घे सोने तुझ्या चंदनाची किंमत. आता चंदन माझ्या स्वाधीन कर. पण ह्या सोन्याच्या बदल्यात चंदन देण्याविषयी आपला करार झालाच नव्हता. मी फक्त एवढेच म्हणालो होतो की, चंदन फार मौल्यवान आहे. मी ते विक्रीसाठी घेऊन आलो आहे. आणि येथे चंदन सोन्याशी तोलतात यावर तु म्हणाला होता, की मला पाहिजे ती किंमत तु द्यायला तयार आहेस. मला चंदनाच्या बदल्यात भारंभार चंद्रकिरण हवे आहेत. तेवढे चंद्रकिरणच तू आणून दे आणि चंदन घेऊन जा. लबाड व्यापाऱ्याला पुढे काही बोलताच आले नाही. तो मुकाट्याने निघून गेला.

ठकांच्या तावडीतून सुटलेल्या रामदासने आपले चंदन चांगल्या भावाने विकले. नंतर तो आपल्या घरी परत आला. पण त्यानंतर मात्र पुन्हा कधीही तो बरझाक शहरी गेला नाही.




- सुवर्णा दातार
कुळगांव-बदलापूर

सुनेत्राचा मला काल निरोप मिळाला की मावशी तुला यायलाच हवं. उद्या सुगंधाचा दाखवण्याचा कार्यक्रम आहे. आणि आईला बरं नाही. त्यामुळे ती येऊ शकणार नाही. निदान मोठी म्हणून आणि माझी मावशी म्हणून तु तरी यायलाच हवं. येशील ना? अग जरा चार मोठ्या लोकांच्या नजरेखालुन मुलगा गेला म्हणजे त्याच्या बोलण्या-चालण्यावरुन आपल्यालाही काही अंदाज बांधता येईल. तु नाही म्हणू नकोस. तुझ्याशिवाय इतकं प्रेमाचं आम्हाला कोण आहे. तिच एवढ आग्रहाचं आमंत्रण मिळाल्यामुळे मी नाही म्हणू शकले नाही. पण मला या लग्न जुळवणीबाबत जरा नावडच होती. नावड म्हणजे त्याबाबतीत मला जरा कमी इंट्रेस होता. कारण आजकालच्या मुला-मुलींची लग्न म्हणजे अळवावरचं पाणी असतं. एकेका मुला-मुलीची आपण तऱ्हा ऐकतो ना. पण सुनेत्राच्या प्रेमाखातर मी जायचं ठरवलं. भराभर ठेवणीतली काठपदरी साडी नेसले. अंबाड्यावर एक चाफ्याचं फूल रोवलं. थोडा सेंट मारला. स्वत:ला आरशात न्याहालुन साडीला मॅचिंग पर्स घेऊन सुनेत्राकडे जायला निघाले. तर दारात आमचे यजमान दत्त म्हणून उभे राहिले.

अरे वा काय छान दिसतेस, कुठे निघालीस? अहो सुनेत्राच्या सुगंधाचा आज बघण्याचा कार्यक्रम आहे. तिनं अगदी अग्रहानं बोलावल आहे. बघ बाबा, तू जातेस खरी पण अग आजकालच्या मुलांच्या भानगडीत आपण न पडलेलं बर नाही का? अहो असं काय करताय? ते काय लागलीच लग्न ठरणार आहे का? आणि तिचे आई-वडिल आहेत की समर्थ मुलगा पारखुन घ्यायला. आपण आपलं तिनं एवढ्या

मायेन बोलावलय म्हणून जायचं. हो की नाही? जा बाई जा, आता तु जायचं ठरवलच आहेस तर मी थोडाच मोडता घालणार आहे. पण तुझ्या स्वभावाप्रमाणं एकदम काही मत प्रदर्शित करु नकोस. कळलं का? अहो हो मी काहीच बोलणार नाही. झाल समाधान. असं म्हणून मी सुनेत्राकडे गेले.

हॉल खूप छान सजवला होता. मॅचिंग पडदे, मॅचिंग फ्लॉवरपॉट, गालिचा आणि रुम फ्रेशनरचा मंद सुगंध दरवळत होता. घर एकदम नव्या नवरीसाखं सजल होतं. मला पाहताच सुनेत्रा धावतच आली. ये मावशी तु आलीस ना आता माझा जीव भांड्यात पडला. अग केव्हापासून तयारी करतेय तेव्हा हे आता आटपलं. टेंशनच आलय ग मुलीचं लग्न करायचं म्हणजे एकेक गोष्ट आठवून आठवून सगळं करावं लागतं. मी तिला थोडा धीर दिला. आणि म्हटलं अग सुगंधा काय पटकन पसंत पडेल त्यांना. रुप आहे, शिक्षण आहे, चांगली नोकरी आहे. मग कशाला एवढी चिंता करतेस? हो ग तू म्हणतेस ते सार काही अगदी तंतोतंत बरोबर आहे. पण अग आजच्या तरुण पिढीचं काही सांगता येत नाही. अग सतराशेसाठ कांदेपोह्यांचा कार्यक्रम करतील आणि लग्न म्हणशील तर दुसरीशीच करतील. त्याची मला काळजी वाटते. माझी एकुलती एक मुलगी. तिचं आयुष्य सुखातच जायला हवं एवढीच अपेक्षा आहे माझी.

होईल गं सारं काही व्यवस्थित होईल. तु आता तुझं आवरायला घे बाकी नाष्ट्याचं मी बघते. काय ठरवलयस? अग नेहमीचे आपले पोहे न करता मी इडली सांबारचा बेत ठरवलाय. आणि खोबऱ्याची वडी चांगल आहे ना? अगं चांगल काय उत्तमच आहे. मी इडल्या करुन ठेवल्या आहेत. तु सांबार बनव. बरं. म्हणून मी भेंडी, भोपळा वगैरे सांबाराला लागत ते सामान फ्रिजमधून काढलं. आणि सांबासाठी लागणारे साहित्य घेऊन फोडणी देऊन सांबार तयार केलं. तोपर्यंत सुनेत्रा तयार होऊन आली. छानच दिसत होती ती. अगं तु आलीस पण सुगंधाचा काय पत्ता? अग ती तिच्या रुममध्ये तयार होतेय. बाईसाहेब नाराजीनेच ह्या सगळ्या प्रकाराला हो म्हणाल्यात. बघून येते मी कुठवर तयारी झालीय ते. बाईसाहेबांचा मूड ठिक आहे नं. जा लवकर, पाहुणे मंडळी येतीलच आता. मी असं म्हणते तोच डोअर बेल वाजली. मी जावून दार उघडलं पाव्हणे मंडळीच होती.

या ना या घर सापडायला काही त्रास झाला नाही ना? नाही नाही, सुनेत्राताईनी अगदी बरोबर पत्ता सांगितला होता. त्याप्रमाणे गाडी वळवत वळवत आलो. बसा मी पाणी आणते. तेवढ्यात मी सुनेत्राला बोलावलं. तिनही त्यांचं स्वागत केलं. मुलगा, आई-वडिल आणि बहिण असे चौघेजण आले होते. प्रथम दर्शनीच मला मुलगा चांगला वाटला. सौम्य आणि शांत प्रवृत्तीचा वाटला. त्याचे आई-वडिलही चांगले वाटले. इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्या. एकमेकांची जुजबी माहिती काढली. आणि मी सुगंधाला आणायला तिच्या रुममध्ये गेले. सुगंधानं ही छान तयारी केली होती. ती खुप सुंदर दिसत होती. सुगंधा चल पाव्हणे आलेत. मावशी मला खुप धडधडल्यासारखे होतय गं. खूप घाबरायला होतय. अगं होत असं. पण तु घाबरु नकोस. तु खूप छान दिसतेस आणि अगं नोकरी करणाऱ्या मुली ना तुम्ही उगीच घाबरतेस तु. अग मावशी ऑफीसची गोष्ट वेगळी असते. तिथे आपल्या कामाचा आपल्यावर भरोसा असतो. आणि तिथे मी माझ्या मनाप्रमाणे वावरत असते. मनावर कुठलं दडपण नसतं. आता हे विचार मनातून काढून टाक आणि अगदी फ्रेश मुडमध्ये बाहेर येवून बस. आम्ही आहोत न तुझ्यासोबत.

अग हो ग मावशी. तुला म्हणून सांगून ठेवते. त्या मुलाला बघताक्षणीच तो मला क्लिक व्हायला हवा. काय म्हणालीस? क्लिक आणि आता हे काय नविन. क्लिक म्हणजे काय ग? अगं असं काय करतेस? क्लिक म्हणजे त्या मुलाला बघितल्यावर माझ्या ह्रदयाची तार झंकारली पाहिजे. माझ्या ह्रदयाची धडकन वाढली पाहिजे. माझ्या मनानं कौल दिला पाहिजे. अगं बाई म्हणजे हे असं पण असतं का? काय सुगंधा आला का क्लिक मुलगा पाहता क्षणीच? मावशी तु पण म्हणत ती खुप सुंदर लाजली. आणि आम्ही काय समजायचे ते समजलो. सुनेत्रा खुप खुशीत होती. नेमके तिचे मिस्टर ऑफीस टुरला गेले होते. पण तेवढ्यासाठी बघण्याचा कार्यक्रम लांबणीवर पाडू नका असा तिच्या मिस्टरांचा मेजेस आला होतो. त्यामुळे सगळी जबाबदारी सुनेत्रानेच पार पाडली.

आठ दिवसात मुलाकडून होकाराचा निरोप आला. आणि आम्ही कंबर कसून लग्नाच्या तयारीला लागलो. मान-पानाची, देण्या-घेण्याची, वधु-वराचा पोशाख ज्याचा त्यानीच करायचा म्हणून सुगंधाच्या भरजरी साड्या, शालु वगैरेची खरेदी धामधुमीत झाली. रुखवताची सगळी भांडी-कुंडी सारं काही खरेदी केलं. आणि लग्न अगदी थाटामाटात पार पडलं. दोन्हीकडची मंडळी अगदी खुष होती. एकुलती एक मुलगी शिवाय कमावती म्हणून सुनेत्रानेही कशाला कमी पडू दिलं नाही. मुलीची पाठवणी झाली. म्हणता-म्हणता एक वर्ष कसं भुरकन उडून गेल ते कळलच नाही. मंगळागौर, वर्षसण, संक्रातीचा सण सगळं अगदी थाटात पार पडलं. सुनेत्रासुध्दा जावयावर खूप खुष होती. आणि एके दिवशी दुपारीच फोन खणखणला. मी जरा वामकुक्षीच्या विचारात होते. बघते तर सुनेत्राचा फोन होता. मावशी तु तावडतोब इथे निघुन ये. मला तुझ्याशी खूप महत्वाचं बोलायच आहे. अगं सुनेत्रा काय झालयं. तुझा स्वर एवढा रडवेला का आहे? काही थोड फार सांगशील का? नाही मावशी फोनवर सांगण्यासारखं नाही तु आल्यावरच बोलु आपण. मी भराभर थर्मासमध्ये त्यांचा चहा करुन ठेवला आणि डायनिंग टेबलावर चिठ्ठी लिहून ठेवली. चप्पला घातल्या आणि निघाले. पण मनात नान तऱ्हेच्या शंका कुशंका येत होत्या. मन खूप हुरहुरत होतं. सुनेत्राकडे गेले तर ती माझ्या गळ्यात पडून रडायलाच लागली. तिला थोडं शांत केलं पाणी प्यायला दिलं आणि तिला म्हटलं "अगं रडू नकोस बाई अशी" काय झाल ते सविस्तर सांग. तिनं सुगंधाच्या रुमकडे कटाक्ष टाकला आणि म्हणाली, अगं ती घरातून निघून आलीय बॅग वगैरे घेऊन. काय सांगतेस? अग पण का? माझा तर विश्वासच बसत नाही. तु तिला विचारलस का सगळं? हो मावशी ती नुसती गुडघ्यात मान घालुन रडत बसलीय. काहीच सांगायला तयार नाही. चल आपण दोघी तिला जरा शांत करु आणि मग तिला थोडं विश्वासात घेऊन बोलु या. असं म्हणून आम्ही दोघी तिच्या रुममध्ये गेलो. तर सुगंधाचे डोळे रडून-रडून लाल झाले होते. मी तिच्या पाठीवरुन हात फिरवला, तिचे डोळे पुसले. तिला कुशीत घेवून विचारलं बाळ सुगंधा आम्हाला सांगशील का काय झालं ते? तर ती खूप तावातावानं बोलायला लागली. मावशी काय सांगू? माझं नशीबच फुटलं गं. खूप-खूप स्वप्न घेऊन मी त्या घरी गेले होते. पण आता त्या घरात मला पाऊल पण टाकावसं वाटत नाही.

सुगंधा शांत हो, अशी एकदम डोक्यात राग नसतो घालायचा बेटा. कशावरुन तुझं डोकं एवढं तापलय? की तू घर सोडून निघून आलीस? मावशी तुला नाही कळायचं ते. अगं सांगून तर बघ. सगळ समजुन घेईन मी. मावशी शुध्द फसवणूक केलीय त्या लोकांनी आपली. अग काय बोलतेस? कसली फसवणूक? अगं वर्ष झालं न तुझ्या लग्नाला? आणि तुझ्या म्हणण्याप्रमाणे तो मुलगा तुला क्लिक पण झाला होता. तूच लग्नाला तयार झालीस नं? म्हणून आम्ही पुढे पाऊल टाकलं. अगं हो मला क्लिक झाली वगैरे ठीक आहे. पण या आतल्या गोष्टी सहवासातूनच कळतात ना गं? सुगंधा जरा सविस्तर सांगशील का? आतल्या गोष्टी म्हणजे काय? तुमच्या दोघांच भांडण झाल का कशावरुन? का त्याच बाहेर काही प्रकरण आहे? ते तुला आता समजलय? मावशी बाहेर प्रकरण असतं तर ते मी शोधून मोडून काढलं असतं. पण या अगदी आमच्या प्रायव्हेट लाईफ मधल्या गोष्टी आहेत गं. तुला कशा सांगू मी? सांग बोटा, सांग अगदी नि:संकोचपणे सांग. मी सारं समजून घेईन. आईला आत जायला सांग मला लाज वाटतेय! सुनेत्रा मी जरा खाजगी बोलतेय तिच्याशी तर तु आत जा. आपली मुलगी निदान मावशीशी तरी मोकळेपणाने बोलतेय म्हणून सुनेत्रा आत जायला निघाली. पण मला संकेत करुन म्हणाली मला नंतर सांग हं. मी पण मानेनच होकार दिला. बोला बाळा अगदी मनातलं, अगदी खाजगीतलं मला सांग. मी कुठेही त्याची वाच्यता करणार नाही.

मावशी मला सांगायला खूप लाज वाटतेय गं. कसं मन मोकळं करु? तेच कळत नाही. सुगंधा तुझा माझ्यावर विश्वास आहे ना? बोल मग. मावशी पहिल्या रात्रीच मला हे सारं जाणवलं. पण मी त्याकडे दुर्लक्ष केलं. असं वाटलं लग्नाच्या घाई गडबडीमुळे थोडं त्याच्यावर प्रेशर आलं असेल पण अग आम्ही हनीमुनला गेलो. बेंगलोरला तर तिथही तोच प्रकार. मी खूप अपसेट झाले गं. मी एवढी रोमॅंटिंक मूडमध्ये होते. आणि हा आपला शांत-शांत कुठली चेष्टा नाही, मस्करी नाही. आणि ऐन बहराच्या क्षणी निवांत. मी इतकी चरफडले नं खूप संतापले. तर तो माझी विनवणी करायला लागला. ही गोष्ट तू कुणालाच सांगू नकोस म्हणून गयावया करायला लागला. मावशी माझी काय अवस्ता झाली असेल त्यावेळी. मी माझ्यावरच चरफडले, मलाच मनातल्या मनात शिव्या घातल्या. आणि तो निमुटपणे एखाद्या अपराध्यासारखा माझ्याजवळ बसला होता. मावशी मी हे वर्षभर तोंड दाबुन बुक्यांचा मार सहन केला गं. पण आता हे माझ्य सहनशक्तीच्या पलीकडे जायला लागलयं. माझं चित्त कशात लागेना, दिवसभर सासु-सासऱ्यांच्या समोर खुप सुखात असल्याचं नाटक करायची आणि रात्री मला कापर भरायचं असं वाटायच रात्र कदाी होवून नये. मी आणि समिर दोघं विरुध्द दिशेला तोंड करुन झोपायचो. सांग नं कसा संसार करु मी त्याच्याशी? अगं विवाहाचं जे सुख माझ्या नवऱ्याकडून जर मला मिळणार नसेल तर कसं जगायचं मी? एखाद्या परीव्यक्तेसारखं जिणं कसं जगू मी? आणि त्यात माझा पाय घसरला तर जग आहेच माझ्या नावानं शंख करायला. का सहन करु मी. माझी यात काही चूक नसताना सांग मावशी? आता तूच मी घरी निघून आले यात माझी काही चूक झाली का? असं म्हणून तिनं मला मिठी मारली आणि ती हमसुनहमसुन रडायला लागली. मी तर हे सारं ऐकून अवाक झाले. बिचारीनं एक वर्ष कसं काढलं असेल. मी तिला थोपवत राहिले. तिला पोटभर रडू दिलं वाटलं लेकरु मनसोक्त रडून मोकळं तरी होईल. इतकी सुंदर, देखणी पोरगी आणि देवानं तिच्या पदरात असं दान टाकलं की ते पेलवत पण नव्हतं आणि टाकवत पण नव्हतं. जगाला वरुन सारं अलबेल वाटत असतं पण जो सोसतो त्याचा अंतराग्नी धडधडत असतो. त्याच्या ज्वाला असह्य झाल्या की उद्रेक होतो. आणि भुकंप घडून येतो. ती जरा शांत झाल्यावर मी म्हटलं अग डॉक्टरी इलाज करुन ह्यावर काहीतरी मार्ग काढता येईल नाही का?

मावशी तुझ असं वाटतयं का आम्ही काहीच प्रयत्न केले नाहीत. वर्षभरात हजार डॉक्टरांच्या ट्रिटमेंट घेऊन झाल्या.

पण काहीच फरक पडला नाही गं. आता सांग मी कसी जगू तिथ कुढत. तिच ते बोलणं ऐकून मी पण गप्प झाले. क्षणभर काय उपाय करावा काही सुचेना. किती मुकी दुखणी असतात ही. सहन होत नाही आणि चार चौघात सांगता पण येत नाही. मग आता काय ठरवलय तू? मी रितसर डिव्होर्स घ्यायचं ठरवलय. आई-बाबांना धक्का बसेल. पण हे सारं ऐकल्यावर ते ही तयार होतील. सुनेत्राला विचारात घेऊन मी सारं सविस्तर सांगितलं. तीही सुरुवातीला खुप कोलमडली. पण नंतर आपल्या मुलीच्या आयुष्याचा प्रश्न आहे. म्हणून डिव्होससाठी तयार झाली. सुगंधाचा रितसर डिव्होस झाला. वर्षभरात तिचं दुसऱ्या मुलाशी लग्नही झालं. आणि आता ती सुखात संसार करतेय. पण एके दिवशी मला आश्चर्याचा धक्काच बसला. तर मी एका गाण्याच्या कार्यक्रमाला गेले होते. तिनं समिर आणि त्याच्याबरोबर एका अनोळखी मुलीला पाहयलं. तिच्या खांद्यावर बाळ होतं.आणि गळ्यात मंगलसुत्रही होतं. ती समिरला काहीतरी सांगत होती. मी एकदम चपापलेच. मनात म्हटलं याच्याबरोबर ही मुलगी कोण आहे? आणि तिच्याजवळ बाळपण आहे. हे कसं शक्य आहे? यांनी हिलाही फसवली की काय? माझा जीव काही स्वस्थ बसू देईना. मध्यंतरात समिर काहीतरी आणायला हॉलमधून बाहेर पडला. आणि मी ती संधी साधली. त्या अनोळखी मुलीशी ओळख काढली आणि सर्व माहिती विचारली. ती सुरुवातीला जरा गोंधळलीच आणि मग मी समिरला ओळखते असं म्हटल्यावर तिनं सारं काही सांगितलं. तिचं आणि समिरचं लग्न झाल. आणि त्यांनी ते बाळ दत्तक घेतलं होतं. कारण तिलाही बाळ होणार नव्हतं. म्हणून त्यांनी असा मार्ग काढला होता. म्हणजे तिला नवरा मुलगा क्लिक न होता तिनं क्लिक करुन दाखवलं होतं.

म्हणून आजकालच्या तरुण-तरुणींनो क्लिक होणे वगैरेच्या भानगडीत न पडता मेडीकली आपण एकमेकांना फिट आहोत की नाही हे पडताळून पाहुनच संसार सागरात उडी मारावी हे बेहत्तर नाही का? ⬟



# मेनु

## बेसनाचे लाडू

**साहित्य :** चण्याची डाळ थोडी गरम करुन दळून आणावी. जरा जाडसरच दळावी. असा जाडसर रवा ३ वाट्या, गव्हाचा रवा ३ वाट्या, साखर ५ वाट्या, साजुक तुप २ वाट्या, दूध १ वाटी, केशर, नारळाचा चव दीड वाटी, बाजारातला रवा दीड वाटी.

**कृती :** चण्याच्या डाळीच्या रव्याला थोडं तूप व दूध लावावं. हे मिश्रण तीन तास झाकुन टेवा. कढईत तूप घालून रवा भाजुन घ्यावा. घरगुती रवाही भाजुन घ्यावा. नारळाचा चव थोड्या तुपावर भाजुन घ्या. नंतर तुप घालून डाळीचा रवा भाजुन घ्यावा. सर्व भाजलेले पदार्थ एकत्र करुन मंद गॅसवर साखरेचा पाक करत ठेवावा. दोनतारी पाक करुन झाल्यावर त्यात केशर घालावं. गॅस बंद करुन त्यात सर्व पदार्थ मिसळून हे मिश्रण ढवळून चार तास मुरल्यावर त्याचे लाडू बनवावे.




- **अजय गोडसे**
निगडी, पुणे.

आज माझा वाढदिवस आणि त्यात रविवार असल्याने निवांत होतो. सकाळी लवकर उठण्याची काही गरजच नव्हती. पण आईच्या आवाजाने जाग आली. थोडं आश्चर्य वाटलं इतक्या सकाळी आई कशी काय आली असेल? जड झालेल्या डोळ्यांनी मोबाईलमध्ये बघितलं ७.३० वाजले होते. माझ्या हालचालीने शेजारीच झोपलेला दीड वर्षाचा अदि उठला. मनात नसतानाही त्याला घेऊन मी हॉलमध्ये आलो. आणि त्याला आईकडे दिला. आणि आई शेजारीच सोफ्यावर आडवा झालो. माझ्या केसात हात फिरवत आई म्हणाली लवकर आवर तुझ्यासाठी थालीपिठाच पीठ आणलाय. गरम-गरम बनून देते. उठ आवर म्हणत तिने मला ढकलच. मनात नसतानाही उठलो आणि आवरायला निघालो. इतक्यात मोबाईल वाजला तो घेणार इतक्यात विभाने मला अडवलं आणि माझा हात धरुन जवळ ओढत मला हॅपी बर्थडे म्हणाली. तुला प्रथम शुभेच्या देण्याचा मान माझा आहे. आता कुणाचे कॉल उचलायचेत ते उचल अस म्हणत ती  किचनमध्ये

पळाली. आईला हे पाहून खुप हसू आलं. मी सुध्दा आवरायला निघून गेलो. देवपुजा करुन किचनमध्ये गेलो तिथे आई थालीपिठ करत होती. तिच्या पाया पडून मी हॉल मध्ये येऊन टी.व्ही. समोर बसलो. थोड्याच वेळात आई गरम-गरम थालीपीठ, लोणी आणि चवळीची उसळ घेऊन आली. थालीपीठ हा माझ्या आवडीचा पदार्थ आणि ते हि आईच्या हातचं म्हणजे प्रश्नच नाही. तिनेक थालीपीठ खाऊन चहा घेतला हे सर्व चालू असताना माझा मोबाईल मात्र सारखा चालु होता. शुभेच्छाचे फोन एसएमएस सारखे चालु होते. इतक्यात आई म्हणाली, आज कुठे बाहेर जायचा बेत आहे का तुझा ? मी नाही म्हणालो. आणि सहजच विचारलं का ग तू काही बेत आखलायस का ? तर ती नाही म्हणाली. जर तुझं काही काम नसेल तर आज आश्रमात जाशील का ? ते ऐकून मी थोडा गोंधळलो. खरतर गेल्या कित्येक वर्षात मी आश्रमात गेलो नव्हतो. मी कॉलेजला असताना नेहमी माझ्या वाढदिवसाला त्या आश्रमात जायचो. यथाशक्ती जमेल तितकं मी तिथे द्यायचो. अनाथ आश्रम होता तो तिथली ती लहान मुलं त्यांना काही वेगळं असं खायला किंवा खेळणी घेऊन गेलं की ती बिचारी खुप खुश व्हायची. पण गेल्या दहा बारा वर्षात मला काही जमलेच नव्हते. इतक्यात विभा म्हणाली जायचं असेल तर लवकर जाऊन ये. आणि आज काय करायचं ते आत्ताच सांग. आयत्या वेळेला माझी गडबड नको. मागच्या वर्षी दुपारी साडेबारा वाजता सांगितलस कि, मित्र येतायत म्हणून मलाही तयारी करायला वेळ लागतो म्हणत ती आत गेली. तुला काय बनवायचे आहे ते तू आणि आई ठरव. मी आश्रमात जाऊन येतो असं म्हणत आवरायला गेलो.

तसं माझ्या घरापासून आश्रम म्हणजे जेमतेम अर्ध्या तासाचा रस्ता. रस्त्यात थांबुन मी सफरचंद, केळी, चिकू, अंजीर आणि एक तांदळाचे पोते घेतले आणि आश्रमाकडे निघालो. इतक्या वर्षानी जात असल्याने थोडा आनंद होता तर इतक्या वर्षात न जाऊ शकल्याची खंतही होती. आश्रमाच्या गेटवर कारचा हार्न देताच गेट उघडलं गेल. पार्किगमध्ये गाडी पार्क केली. आश्रमात काम करणाऱ्या माणसांनी फळाची टोपली आणि तांदळाचे पोते ऑफिसमध्ये नेऊन ठेवले. गाडी लॉक करुन मी ऑफिसकडे निघालो आणि दचकलोच. माझा माझ्या डोळ्यावर विश्वासच बसत नव्हता. समोर सुधा उभी होती. आज इतक्या वर्षानी मी तिला पाहत होतो. तस तीचं राहणीमान अगदीच साधं वाटलं. माझं काळीज थोडं धडधडायला लागला होत. घशाला कोरड पडायला लागली. तिच्याशी काय बोलायच हा प्रश्न मला पडला. काही क्षणात मला माझा पूर्ण भूतकाळ आठवला. इतक्यात ती माझ्या जवळ आली आणि हात मिळवत म्हणाली, "प्रकट दिनाच्या हार्दिक शुभेच्छा" अस्पष्टपणे मी थॅंक्स म्हणालो. सोबत आणलेली पाण्याची बाटली तिने मला देत म्हणाली हे पाणी घे. मी पण पाणी पिलो जरा बरं वाटलं. मी मनात स्वत:लाच कोसु लागलो की मी आज का इथे आलो ? इतक्यात तिने विचारलं. कसा आहेस तू, विभा आणि आदि. मी बुचकाळ्यात पडलो हिला कस सर्व माहित ? थोडं अवसान घेत मी ठीक आहे म्हटलं. तू कशी आहेस मी अडखळतच विचारलं. चेहरा लपवत ती म्हणाली तू जसा मला सोडून गेला होतास ना तशीच आहे. एखाद्या विषारी सापाने डंख मारावा तसे तिचे शब्द माझ्या काळजात रुतले. तिने मला डोळे बंद करुन हाताची ओजळ करायला सांगितली. मी घाबरतच तसे केले. माझे हात थरथरु लागले श्वास जड होऊ लागला. इतक्यात माझ्या ओंजळीत तिने काही टाकल्याचे मला जाणवले. मी डोळे उघडून पाहिलं तर त्यात मोगऱ्याची फुले होती. तुला आवडतात म्हणून आणली असं म्हणून तिने मान खाली घातली. तिच्या काळ्याभोर डोळ्यातून अश्रु ओंघळत होते. मी निशब्द झालो एखाद्या अपराध्यासारखा तिच्याकडे पाहत नुसता उभा राहिलो. तिचे रडणे मला असह्य वेदना देत होते. विषय बदलण्यासाठी मी तिला विचारले तु इथे कशी काय ? ती म्हणाली तू किती सहज विसरतोस रे सगळं काही. तू नाही आलास इतक्या वर्षात इथे पण मी तुझ्या प्रत्येक वाढदिवसाला इथे येते. तूच मला घेऊन यायचास इथे आणि मलाच विचारतोस मी इथे कशी ? तिच्या प्रत्येक उत्तराने मला असह्य वेदना होत होत्या. तिची माफी मागण्याची हिम्मत सुध्दा होत नव्हती. तरीही धाडस करत मी म्हणालो आय ॲम सॉरी मला माफ कर. डोळे पुसत ती म्हणाली तू नको वाईट वाटून घेऊस. तुला कधी समजलंच नाही रे की, प्रेम काय असत ते. चुक माझी आहे की मीच तुझ्या प्रेमात आकंठ बुडलेली आहे. किती सहजपणे तू तेव्हा मला म्हणाला होतास, तु मला खूप आवडते. आणि तुझ्या त्या एका वाक्यावर मी माझं पुर्ण आयुष्य तुला वाहील होतं. मला तेव्हाही तुझ्या डोळ्यात माझ्यासाठी कधीच प्रेम दिसलं नव्हतं. खरतर तू माझ्यावर प्रेम करतोस असही

कधी म्हणाला नव्हतास. मीच वेडी त्याला प्रेम समजून बसले. कॉलेज संपल्यानंतर तु कामाला लागलास तु बिझी होत गेलास. तुझ्याकडे मला देण्यासाठी वेळच उरला नव्हता. नंतर तू माझे फोन घेणेही बंद केलस. मला समजत होत की तुझी धावपळ चालायची. तुझं उशीरापर्यंत ऑफिसला थांबणं, कामानिमित्त बाहेरगावी जाण-येणं याने तु पुरता थकून जायचा. पण तुला माझी आठवण कधीच आली नाही. आणि मी मात्र तुझी वाट पाहत असायचे. खूप स्थळ यायची पण दुसऱ्या कुणासोबत लग्न करण्याची ईच्छाच झाली नाही. नंतर वडिल गेले. तेव्हा वाटलं तु भेटायला येशील. पण तेव्हा सुध्दा तू आला नाहीस. मग मीच ठरवलं आता एकटेच जगायचे तुझ्याशिवाय. पण तुला विसरु शकले नाही. तुझ्या आठवणींना तुझ्या निखळ मैत्रिला मी प्रेम समजून बसले. तुला मोठे होताना पाहून खुप आनंद होत होता. पण कधी तुझ्या आयुष्यात येण्याचा प्रयत्न केला नाही. वाटल तुला कधीतरी माझ प्रेम उमजेल आणि तुच येशील पण तू आला नाहीस. असो तुला एकदा डोळे भरुन बघायचं होत. म्हणूनच मी दरवर्षी यायचे. तुला आजच्या दिवशीच मला भेटायचं होत एकदाच आणि तेही शेवटचं. आज मला तुला दुखवायचं नाही. म्हणत तिने माझ्या गालावरुन हात फिरवला, तिच्या डोळ्यातून येणारे अश्रु मला तिळतिळ जाळत होते. तिच्या स्पर्शाने जणू माझ्या अंगातले सगळे अवसानच गेले होते. माझा हात हातात घेत ती म्हणाली, मला माहित आहे तू खूप हळवा आहेस. जास्त मनाला लावून घेऊ नकोस. परत कदाचित आपली भेट होणार नाही. आणि प्रायश्चित करण्यासाठी सुध्दा कधी मला शोधण्याचा प्रयत्न करु नकोस. हा जन्म मी तुलाच वाहिलाय. आजन्म मी फक्त तुझीच राहीन पण तुझ्या आयुष्यात न राहता म्हणत तिने माझा हात सोडला आणि डोळे पुसून निघून गेली. तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे वाहत्या डोळ्यांनी मी पाहत राहिलो. ती दिसेनाशी होईपर्यंत माझ डोकं जड झालं. मोगऱ्याचा सुगंध सुध्दा मला उग्र वाटू लागला होता. पण फुल टाकावीशी वाटत नव्हती. आता ती फुलेच तिची आठवण म्हणून माझ्याकडे राहणार होती.

दरम्यान बऱ्याच जणांचे कॉल येऊन गेले होते. मोबाईल गाडीत राहील्यामुळे कळलच नाही. विभाचेसुध्दा तीन कॉल आले होते. मन खूप नाराज होत. मी मोबाईल बंद केला आणि आश्रमातल्या लोकांना भेटून घरी निघालो. अपराधीपणाची जाणिवेने मला स्वत:चा तिरस्कार वाटू लागला. इमारतीच्या पार्किंगमध्ये कार पार्क केली. मोबाईल सुरु केला. तोंडावर पाणी मारुन मी थोडा मूड बदलण्याचा प्रयत्न करु लागलो. तोच मोबाईलवर मेसेज येऊ लागले. त्यात विभाचेच जास्त होते. उत्तर न पाठवताच मी दाराजवळ जाऊन बेल वाजवली. दुपारचे दोन वाजले होते. विभाने दार उघडताच प्रश्नांचा भडीमार सुरु केला. मी उत्तर न देताच घरात आलो. तू इतका बेजबाबदार कसा वागु शकतोस, मोबाईल सुध्दा बंद केला होतास. इथे आई जेवायच्या थांबल्यात याचं सुध्दा भान नाही तुला. मी शांतपणे आईकड पाहिले. ती माझ्याकडेच बघत होती. तिची नजर चुकवत मी बेडरुम मध्ये गेलो. काही केल्या मला रडणं आवरत नव्हतं. माझ्या डोळ्यातून वाहणारे पाणी थांबायला तयार नव्हते. इतक्यात दारबंद केल्याचा आवाज झाला. डोळे पुसत मी वळून पाहिलं. तर आई उभी होती. हुंदके दाबत रडत असतानाही आई शांतपणे शेजारी बसून होती. थोड्या वेळाने हुंदका ओसल्यावर डोक्यावर हात फिरवत आई म्हणाली कळत नकळत तुझ्या हातून काय घडलय ते तुला कळावं म्हणूनच मी तुला आज तेथे पाठवलं होतं. हे घडणं तुझ्या आयुष्यात गरजेच होतं. इतक्यात विभा दार उघडून आत आली. मला रडताना पाहून ती हि घाबरली. जवळ येत तिने हात धरत काय झाले विचारले. मी निरुत्तर होतो. अगदी तसाच जसा सुधा समोर होतो. अस्पष्टपणे फक्त मी एवढेच बोललो "नकळत" आणि तो शब्द ऐकून आईने तिच्याच डोळ्याला अश्रु लपवण्यासाठी पदर लावला. आणि रडतच म्हणाली हे ओझं घेऊनच तुला आयुष्यभर जगावे लागेल. माझ्या वाहत्या डोळ्यात विभा उत्तर शोधण्याचा प्रयत्न करत होती. आणि मला माझ्या पानावलेल्या डोळ्यात निस्वार्थी प्रेम करणारी सुधा आणि नकळत माझ्यामुळे उध्वस्त झालेले तिचं आयुष्य दिसत होतं.



---

## हसा

वर्गात आल्यावर शिक्षकांनी मुलांना सामान्यज्ञानाचे प्रश्न विचारण्यास सुरुवात केली.

शिक्षक : एक महान शास्त्रज्ञाचं नाव सांगा.

मुलगा : आलिया भट्ट

शिक्षक हातात काठी घेऊन हे शिकलात तुम्ही?

दुसरा मुलगा : सर तो तोतला आहे. तो आर्यभट्ट म्हणत आहे.




- वैशाली विनायक चांदेकर
बदलापूर(पू.)

आपण ताडोबा जंगला सफारीचे नाव ऐकलेच असेल. हे फॉरेस्ट विदर्भातील चंद्रपुर जिल्ह्यात आहे. चंद्रपूरहून ताडोबा साधारणपणे ४५ किलोमिटर आहे. हा ताडोबा जंगलाचा अनुभव ३५ वर्षापुर्वीचा आहे. ही एक अनोखी सहल किंवा चित्तथरारक असा अनुभव देणारी ठरली. माझ्या भाच्याच्या मुंजीसाठी आर्वीस जिल्हा वर्धा, विदर्भ येथे गेलो होतो. मुंज झाली अनेक नातेवाईकांच्या भेटी गाठी झाल्या. तेथून चंद्रपुरास जाणे सहज शक्य आहे. असे कळल्याने आलेल्या नातेवाईकांना चंद्रपूर, ताडोबा येथे येण्याबद्दल विचारले असता कोणीही औसुख्य दाखविले नाही. त्यांचा विरोध पत्करुन आम्ही तेथे अधिक काळ रहावे या त्यांच्या इच्छेला तडा देऊन मी व माझे पती विनायक चांदेकर व मुलगा आभिजीत ६ वर्षाचा व छोटा आशिष दोन वर्षाचा असे चौघे एस. टीने निघालो. चंद्रपुरला पोहचण्यास संध्याकाळ झाली. त्यामुळे तेथे रात्रीचा मुक्काम करुन दुसऱ्या दिवशी सकाळपासून चंद्रपूर येथील वन अधिकाऱ्यांकडून परवानगी घेऊन तसेच तेथील सुट रिझर्व्ह केला. त्यांनी सांगितल्याप्रमाणे त्वरीत ताडोबास निघालो.

मेन गेटपासून सूट व छोटेखानी हॉटेल ९ किलोमीटर आहे. तेथे पोहचाल्यावर मिळालेल्या सुटमध्ये सामान ठेवले व फ्रेस होऊन कॅन्टींगमध्ये नास्ता घेऊन रात्रीच्या जेवणाची ऑर्डर दिली. कारण त्या आधी ते ताडोबा फॉरेन्ट व त्यातील जंगली प्राणी दाखविण्याकरीता वन विभागाने दोन बसेस ठेवल्या होत्या. त्यातून आलेल्या प्रवाशांना परिसर दाखवून आणतात. हा रात्रीचा कार्यक्रम जेवणापुर्वीचा होता. तेथे आलेल्या बऱ्याच प्रवाशांची ओळख झाली. आम्ही सगळेच मुक्तप्राणी जीवन उत्सुक झालो होतो. व त्याबद्दल निरनिराळ्या पध्दतीने चर्चा होत होती.

एकदाचे आम्ही मिनी बसने निघालो. वनविभागाचा गाईड

हातात पॉवरफूल सर्चलाईट घेऊन टपावर बसतो. बस चालू झाल्यानंतर लाईटचा फोकस रात्रीची वेळ असल्याने जंगलात फिरवतो. व त्या प्रमाणे सर्व प्रवासी त्या फोकसच्या दिशेने बघतात. त्याला जर एखादा प्राणी व कळप दिसला तर तो तसे टपावर हलकी थाप मारुन ड्रायव्हरला ईशारा करतो. त्याप्रमाणे ड्रायव्हर बस जागच्या जागी थांबवतो. गाईडने टाकलेल्या प्रखर प्रकाशाच्या दिशेने जो प्राणी बघावयास मिळेल तो बघायचा. या १५ किलोमीटरच्या बस भ्रमतीत आम्हाला कित्येक हरणाचे कळप, सांबराचे कळप, रानगाई, रानम्हशी दिसल्या. असे प्राणी दिसल्यानंतर आम्ही सगळेच खूप आनंदी व खूष होतो. तरी सुध्दा हा आनंद कलकलाटाने व्यक्त करण्यास मनाई होती.

पुढे आम्हाला जवळच्याच अंतरावर बसलेला वाघ दिसला. तो दिसल्यानंतर सगळ्याच प्रवाश्यांच्या चेहऱ्यावर ताडोबा ट्रीप सफल झाल्याचा आनंद चेहऱ्यावर दिसत होता. ताडोबा जंगल प्रचंड मोठे आहे. अनेक प्रकारचे प्राणी मुक्तपणे तेथे राहत आहेत. व अशा समुद्राप्रमाणे पसरलेल्या जंगलात वाघ दिसणे ही सर्वानाच भाग्याची घटना वाटली. हजारो स्वदेशी व विदेशी प्रवासी ताडोबास भेट देतात. कारण तेथे ओसंडून वाहणारा निसर्ग मनास मंत्रमुग्ध करणारा आहे. विविध तऱ्हेची उंचच उंच प्रचंड मोठी झाडे त्यावर नांदणारे पशु-पक्षी, जंगलातील क्रुर प्राणी व ह्या जंगलाच्या जवळच असलेले आमचे निवास स्थान हे आम्हाला थ्रीलिंग वाटले.

रात्री बसने सुटवर परतांना अंथाग असणाऱ्या तलावाच्या काठी भली मोठी मगर विश्रांती घेत बसलेली पाहिली. चारीपाय पसरुन ती पहुडली होती. बसची चाहुल लागतात चारीपायावर उभे राहून तलावात निघून गेली. सर्वच जण कॅन्टींगमध्ये जेवणास आल्यावर पाहिलेल्या हिंस्त्र प्राण्याची चर्चा सुरु झाली. वैशिष्ट्य असे की आमचे असलेले निवासस्थान व आम्ही फिरुन आलेले जंगल यामध्ये कोणतेही कुंपन, जाळी किंवा अडथळा नव्हता. दोन्ही ठिकाणी सर्वजण मुक्त होतो. कॅन्टींगवाल्याला विचारल्यावर तो म्हणाला येथे प्रवाशांचा वावर असल्याने क्वचितच वाघ इकडे येतो. जेवणानंतर आमच्या सुटच्या व्हरांड्यात खुर्च्या टाकून गप्पा मारत बसलो. समोर गवताची हिरवळ व त्यापुढे मगरीचे निवासस्थान असलेला तलाव. अनोखे दृष्य डोळ्यात साठवत होतो.

दुसऱ्या दिवशी सकाळी उठल्यावर चहा, नाश्ता उरकून येथे प्रसिध्द असलेले मगरीचे प्रजोत्पादन केंद्र बघण्यास गेलो. हा प्रकल्प फारच मोठा आहे. तलावातील मगरी बाजुच्या वाळूत अंडी टाकतात. व वन विभागातील माणसे ती अंडी घेऊन आवश्यक त्या वातावरणात कृत्रिमरित्या उबवतात. मगरीच्या पिलांपासून तो ती मगर ५ वर्षाची होईपर्यंत तिची जोपासना करतात. हे विस्मयकार केंद्र बघून रात्री बसने फिरताना जी मचाणे आम्हास दिसली होती ही मचाणे जमिनीपासून साधारणपणे २५ फुट उंच होती. बसण्यास प्रशस्त. त्याच्या खालुन किंवा जवळून पाण्याचा प्रवाह प्राण्यांना पाणी पिण्यास फिरवला होता. ही मचाणे खास शिकारीसाठी बनविली असतात. आमच्या मनात आले की, आपणही अशा एखाद्या जवळच्या मचाणावर बसून निसर्ग शोभा बघावी. एक ते दीड किलोमीटर अंतरावर पंचधारा नावाचे मचाण होते तेथे आम्ही चौघे जाऊन बसलो. मचाणाजवळ जातांना असलेला हरणांचा कळप उधळला गेला. वर जाऊन बसल्यावर १०-१५ मिनिटे झाले असतील तोच दुरवरुन एक धिप्पाड वाघ आमच्याच दिशेने येताना दिसला. हा वाघ जेथे थांबला. तेथे आमच्या असे लक्षात आले की तो येण्यापुर्वी आधीच एक वाघ तेथे पानवठ्याजवळ बसला होता. तेथे दोघांची मारामारी झाली. दोघांनीही मोठ-मोठ्याने डरकाळ्या फोडल्या. ही घटना, दृष्य आमच्या मचाणापासून साधारणपणे ५० फुटाच्या आतच होती. आम्ही हे दोन्ही वाघ अत्यंत सावधपणे बघत होतो. हे वाघ तेथून गेल्या शिवाय आम्हाला मचाण उतरुन तेथून जाणे

---

बोधकथा

## विश्वास

एका घरात उंदारांचा खुप सुळसुळाट झाला होता. त्यांचा बंदोबस्त करण्यासाठी घरमालकाने एक मांजर आणले. मांजराने आल्यापासून उंदरांना मारायला सुरुवात केली. त्यामुळे बरेचसे उंदीर कमी झाले. पण काही हुशार उंदीर छतावर लपून बसले. मांजराला तिथपर्यंत पोहचता येत नव्हते. मग माजराने असा विचार केला की, मी जर मरुन पडण्याचे सोंग केले तर वरचे उंदीर बिनधास्तपणे खाली येतील. मग मांजर एके ठिकाणी निश्चल पडून राहिले. दोन दिवस झाले तरी उंदीर खाली येईनात शेवटी एक उदिर दुसऱ्या उंदाराला म्हणाला मांजर मेलेले दिसतेय आपण खाली जायचे का? दुसरा उंदीर म्हणाला त्याच्यावर विश्वास ठेवायचा नाही ते मेल्यावरच काय पण काहीही झाले तरी कधी त्याच्याजवळ जायचे नाही.

तात्पर्य : शत्रुवर कधीच विश्वास दाखवू नये.

शक्य नव्हते.

वैरी न चिंत्ती पण मन चिंत्ती त्यापैकी एक वाघ जरी मचाणाच्या खाली पाणी पिण्यास आला किंवा विश्रांतीस आला तर आम्ही  चांगलेच अडकलो असतो. हातात काहीतरी शस्त्र असावे म्हणून मचाणाजवळ पडलेला एक बांबु घेतला होता. अशा परिस्थितीत किती वेळ गेला ते कळलेच नाही. परंतु आम्ही दोघे चांगलेच हबकलो होतो. कारण छोटा आशिष झोपेतून उठल्यावर त्याला दुध व मोठा जरी जागा असला तरी त्याचीही नाष्ट्याची वेळ झाली होती. शेवटी खाली उतरण्याचा विचार पक्का केला. त्यावेळेस वाघ मात्र तेथेच बसले होते. आम्ही चपला हातात घेतल्या. कारण वाळलेल्या पाला-पाचोळ्याचा आवाज होऊ नये. संपूर्ण शरीराचे, डोळ्याचे, मनाचे लक्ष वाघाकडेच होते. शरीरातील संपूर्ण यंत्रणा थरारुन उठली होती. हा क्षण अत्यंत कसोटीचा, निर्धाराचा होता. परंतु माझे पती अत्यंत धारिष्ट्याचे असल्याने त्यांनी उतरण्याचा निर्णय घेतला. हेच धारिष्ट पुढे त्यांना नर्मदा परिक्रमा करण्यास उपयोगी पडले.

मचाणापासून कॅन्टींग, निवास स्थानाकडे जाणारा रस्ता १०-१५ मिनिटांचा होता. ह्यांनी आशिषला कडेवर घेतले. मोठा अभिजितला मी हाताशी धरले व मुख्य रस्त्यावरुन आमच्या सुटकडे निघालो. वाटेत परम आश्चर्य असे की एक अस्वल बांबुच्या छोट्या बेटात पहुडले होते. तेही त्यांनी मला दाखविले. क्षण ही न घालवता कुठल्याही प्राण्याच्या धोक्याचा विचार न करता भरभर तो रस्ता कापला व कॅन्टींगमध्ये येऊन दीर्घ श्वास घेतला. तेथे जमलेल्या सहप्रवाशांना आम्ही या पंचधारा मचाणाची संपूर्ण हकीगत सांगितली. ती ऐकून अनेक प्रवाशांच्या अंगावर काटा उभा राहिला. ही बातमी पसरुन बरेच प्रवासी व तेथील वनअधिकारी आम्हास भेटण्यास आले. सर्वाच्या मते आम्ही फार मोठे जोखीम पत्करुन आलो असे होते. कदाचित अपघात घडला असता तर लोकांना आमची हाडेच सापडली असती. बऱ्याच जणांमध्ये चर्चा झाल्याने वनविभागाचे अधिकारी तेथे आले व आमच्याकडून सर्व ऐकून घेतले आणि ही गोष्ट खरी खोटी बघण्यास ते सर्व पंचधारा मचाणाकडे निघाले. व त्यांनी तेथे वाघांना बऱ्याच अंतरावरुन पाहिले. आमच्या बरोबर घडलेल्या घटणेची खातरजमा करुन घेतली व परत आले. वाघांना पाहून ते स्वत:च हबकले होते.

यानंतर त्या अधिकाऱ्यांनी आम्हास प्रथम पासून जी घटना घडली त्याविषयी आमच्या शब्दात वनविभागाने ठेवलेल्या नोंदवहीत लिहिण्यास सांगितले. एवढे झाल्यावर आम्ही बदलापूरास परत आलो. वनविभागाच्या रजिस्टर मध्ये घटणेची नोंदवलेली तारीख ४ जून १९८३ आहे. तेथे गेल्यास हौशी प्रवाशांनी स्वत:च खातरजमा करावी व आनंद घ्यावा.

## हसा

★रामराव एका हॉटेलात जेवण करण्यासाठी गेले. तेथे एक पाटी लावली होती. कितीही खा, पोटभर जेवा. बिल तुमच्या वडिलांकडून घेण्यात येईल. पाटी वाचून रामरावांना खूप आनंद झाला. कारण त्यांच्या खिशात एक पैसा देखील नव्हता. त्यांनी पोटभर जेवण केले व ते जाऊ लागले. इतक्यात हॉटेल मालकांनी आवाज दिला ओ रामराव कोठे चालला. आधी बिल देऊन जा.

रामराव : अहो मालक तेथे पाटी लावली आहे. बिल माझ्या वडिलांकडून घ्या!

मालक : ते ठीक आहे हो, पण आत्ताच तुमचा मुलगा त्याच्या मित्रांबरोबर आला होता. त्याचे बिल द्या.

★दोन उंदीर जंगलातून जात होते. तोच समोरुन एक सिंह आला.

सिंहाला पाहून एक उंदिर म्हणाला, चल याची चांगलीच धुलाई करु या.

दुसरा उंदीर म्हणाला, राहू दे तो एकटाच आहे आणि आपण दोघे आहोत उगाच मरायचा.

## सुंदर विचार

कुणी विचारलं
आयुष्यात काय गेलं
आणि काय मिळालं,
सरळ सांगा की जे,
गेलं ते कधीच माझं नव्हतं,
जे मिळालं ते देवानं माझ्यासाठीच
ठेवलं होत. माझं आणि देवाचं
एक सुंदर नातं आहे. जिथे मी
जास्त मागत नाही
व देव मला कधीच कमी पडू देत नाही.



# दिवाळी

दिवाळी म्हणजे आनंदाची नवलाई
साहित्य भांडार भलाई, दिवाळी अंकांना उधाण येई
दिवाळी म्हणजे अंधारातून प्रकाशाकडे
अज्ञानातून ज्ञानाकडे झेप नव चैतन्याकडे
दिवाळी म्हणजे वातावरण मंगल
लक्ष्मी घालवते अमंगळ फराळाची चंगळ
दिवाळी म्हणजे उटणे, झेंडुची तोरणे
गजरे, माळा अत्तर लावणे
सोन्या-चांदीचे अलंकार,
नवे कपडे घालत शोभायमान होणे
दिवाळी म्हणजे हलकल्लोळ, जल्लोष
सुंदर रेशमी झळाकी, फटाक्यांची आतिषबाजी
दिवाळी म्हणजे पैशांची लयलुट
रुजु लागते नात्यात कृतीत आण्याचे गुज
दिवाळी म्हणजे येणारा सुखद पाडवा
तन-मनाला गोडवा
भावनिक ओलावा, मनास विसावा
दिवाळी म्हणजे दिवाळी
बहिण भावास ओवाळी
दिव्या कंदिलांची रोषणाई
सारं काही उजळून देई

**-रमेशकुमार मेंगळे**
ठाणे.

# पिवळे हात

नजरेला नजर भिडली म्हणजे
प्रेम जमलं असं म्हणायचं नसतं
उगाच लाईन देऊन कधी
जोड्याचा मार खायचं नसतं.
काही दिवस जावे लागतात.
भेटीगाठी व्हाव्या लागतात.
मग भेटीत गोडवा निर्माण होता.
प्रेमाचा गुलकंद चाखायला मिळतो.
प्रेमपत्राचे लाल-पिवळे गुलाब
भेटायला यावे-जावे लागतात
मग यातून दोघांचे हात
आयुष्यभरासाठी पिवळे होतात.

**- चंद्रकांत आप्पाजी कोकीतकर**
कुदनूर, जि. कोल्हापुर.

# चिंब

चांदण्यात हिंडण्याची मज सवय नाही
भाळी माझ्या नित्य रावणे उन्हात आहे।
वागोत कुणी कसेही, धर्म त्यांचा त्यांपाशी
शनी पिडा देतो, बोलणेच व्यर्थ आहे।
का पुसता रे ज्योतिषा उद्या कसा आहे ?
तुमच्या उद्या तुम्हा हाती आजच आहे।
हिंडताहेत आज बघा जे जे अंतराळी
आज नि उद्या ही त्यांच्याच ताब्यात आहे।
जीवनाची वदंता सारेच करती खोटी
घडता चांगलं, म्हणती हे होणेच आहे।
वरुन जरी मी दिसतोय असा फाटका
कसे सांगु, सुखाने मी किती चिंब आहे।

**- काशिनाथ भारंबे**
भुसावळ, जळगाव.

# देव शोधितो कुठे रे

देव शोधितो कुठे रे
देवळात देव नाही रे
कर्मात देव आहे रे
धर्मात रे देव नाही
संतात देव आहे रे
पंथात रे देव नाही
कर्मात देव आहे रे
जातीत रे देव नाही
माणसात देव आहे रे
धर्म-व्यापारात रे देव नाही
सत्कर्मात देव आहे रे
कुकर्मात रे देव नाही
हृदयात देव आहे रे
मठात रे देव नाही
कर्मात देव आहे रे
कर्मकांडात रे देव नाही
पाषाणात देव आहे रे
स्तुती-सुमनात रे देव नाही
कर्मात देव आहे रे
स्वर्गात रे देव नाही
निसर्गात देव आहे रे
कैलासात रे देव नाही
कर्मात देव आहे रे
वैकुंठात रे देव नाही.

**- उमेश गंगाधर पारसकर**
बदलापूर

# बाप कळताना

बाप कळताना आईचं
काळीज घ्यावे लागते
कठोर कातळाच्या खालुनच
निर्मल जल पाझरत असते.
रात्रंदिन कष्ट उपसून
कधीकाळी उपाशी राहून
जगाल कळू दिले नाही
कधी आपले रितेपण
परि केले तयांचे सुसंस्करण
आज त्यांचे सुख पाहून
मन येते आनंदे भरुन
काळासंगे दिशाही बदलल्या जगण्याच्या
सांप्रतच्या कमर्शियल प्रवाहात
नद्याही आटल्या प्रेमाच्या
इकडे अय्याशीच्या रंगात रंगून
माता-पित्याचे होते विस्मरण
परंतु असा येतो नाजुक क्षण
तेव्हा तयाप्रती नीज लोपते मीपण

**- ल. वि. कांबळे**
विक्रोळी, मुंबई ८३

## पानगळ

पिवळी पडत गेली पाने
सुकुन गेल्यात काड्या
पाचोळ्याची जमलेली रास
उघड्या पडल्या झाड्या।
लज्जा रक्षण वाऱ्यापासून
ऊन पाऊस सारी वस्त्रे
मनी लागे हुरहुर।।
कळ्या कधी उमलल्या नाही
माना झुकवता वेली
रंग गंध दिसला नाही
उर्जाच मरुन गेली।
दूरवरचे मोजीत तारे
स्वप्नात धावलो मूक
प्रत्यक्षातले सोशित वारे
आळवित सारी भूक।
वृक्षासम जिवन जगलो
मातीत रुजलो नाही
किनाऱ्यावर थिजलो जरी
पाऊल भिजले नाही।
सरत गेले सारे दिवस
प्रेमात पडलो नाही
पानगळीत तुटली नाती
नात्यात रमलो नाही

**- मनोहर प. पाटील**
प्रभादेवी, मुंबई.



## निरंकुश

फिरु लागली शहरामध्ये आता मोकाट जनावरे
मालक बिनघोर सोडूनी दावणी, हैदोस नावरे
दारे उघडी कोंडवाड्यांची, प्राणी मित्रांचे ललकारे
मोकळ्या जागांची कुरणे, वाढे वस्ती अनाधिकारे
उध्वस्त कुंपने गायरानांची, वेशीबाहेर मसलती
फस्त चारा दुष्काळ छावणीचा, सरकारी गफलती
मस्तवाल निरंकुश, बाप पुण्याईवर शिरजोरी
गट आधारांनी झाल्या सत्ता स्पर्शाने हो वृत्ती माजोरी
मिळाले पद काय, ओरबाडायाचा मुक्त परवाना
नको असले प्यादे, करा वेळीच योग्य जागी रवाना
ढिले पडले अंमलदार गरीबा ना उरला दाता
कागदी बाणांचे फुसके वेध, वाली न उरे आकांता

**- बाबु फिलीप डिसोजा**
निगडी पुणे.

## चारोळी

पंखाला बळ येण्यासाठी
पक्ष्यांना फळ द्यावे
संचारत पडलेल्या बीयातून
निसर्गाचे गान गावे.
काळजाला सलतं
तेच आम्ही लिहितो
त्यातून काहीतरी
समाज प्रवोधन करतो.
लागली चाहूल
कानी तिच्या डूल
शेवंतीचे मूल रानफूल.
क्या बात है।
व्याकरणात कोणती जात
बायको घरात
आई-बाप वृध्दाश्रमात.

**- प्रकाश पोळ**
ठाणे (प.)

# दवं

किती वाट तुझी पाहू
थकले ग माझे डोळे
विरहात तुझ्या सखे
जळते ग मन भोळे
डोळे मिटताच क्षणी
तुझे स्वप्न ते पडते
तुझा शृंगार पाहुणी
मन उठून पळते
तुझ्या प्रेमात ग सखे
देहभान चारी दिशा
तुझ्या रंगात रंगलो
फैलवुनी दोन्ही हात
तुला मिठी मधी घ्यावं
तुझ्या मधाळ ओठांच
सखे अमृत चाखावं
हात तुझा मी धरता
अंग तुझ ग थिजलं
दवं प्रेमाचे पडता
अंग माझं ही भिजलं.

**- सुनिल गणपत केदारे**
मनमाड जि. नाशिक

# यश अपयश

यश आणि अपयश
होते दोन भाऊ
जीवनात म्हणे माणसाच्या
अदलून बदलून जाऊ
अपयशानेच अगोदर
लावला आपला नंबर
पछाडण्यासाठी माणसाला
चांगलीच कसली कंबर
अपयशाला घाबरुन ज्यांनी
सोडली आपली वाट
अपयशाने कधीच नाही
सोडली त्यांची पाठ
पण सर्वांनाच पछाडणे
त्याला काही जमले नाही
चिकाटी असलेले कुणीही
त्याच्या पुढे नमले नाही
ठाऊक होते त्यांना समुद्रात
खोल असतात मोती प्रवाळ
अंधाऱ्या रात्री मागुन नेहमी
उगवते सोनेरी सकाळ
यश-अपयशाचे काय
ते तर येतच राहणार
साखरेच खाईल जो
त्याला देव देतच राहणार

**- आनंद देशमुख**
शिरपुर, जि. धुळे

## दु :ख तर ऐवढे

दु :ख तर ऐवढे आहेत की,
पदरात घेऊ तरी मी कसे
अनेकदा शिवून घेतला पदर मी
तरी टाके उसवतात तरी कसे
हे दुदैव आहे माझे का, कर्म आहे माझे
आधीच चौदा विश्व दारिद्र्य घरात माझ्या
त्यात दिल जरी कुणी, तरी पदर फाटतो कसा
आधीच जिरलाया घडूत पार
त्याला तरी काय म्हणावा
त्यांनी ही पाहिल्यात माझ्या संग पावसाळे
दुसर नाही तर मी काय नेसावा
हीच तऱ्हा आहे सदा गोर गरीबांची
तरी आहे त्यांना भरोसा
कुणा कुणा पासून मी लपवू अंग
कुणा कुणा लपवू मी अन्न कुठ कुठे
जिरलाय ब्लाऊज
उघडी-नागडी लेकर माझी
मग मी घालू तरी कपडे कसे
वन वन फिरतोया धनी माझा
चिंधी बांधलीया इज्जतीला
राना बनात फिर फिरतोया काही मिळत का
आमच्या पोटाची आग विजवायाला
हे जगनच दिले आम्हा असे जगायला

**- अशोक दामोदर साठे**
कल्याण (प.) जि. ठाणे.

## नवे नाते

राखी स्त्री रक्षणाचे आश्वासन निखळ प्रेमाचे बंधन
नात्याच्या पवित्र दिलाशाचे संस्कृतीचे मनोमिलन
मुक्त, मुजोर, बेताल चंगलवादाने काढले स्त्रीचे शोषण
आणा भाका नाते ही विसरण असे झालय सैराट वर्तन
राखी स्त्री रक्षणाचे आश्वासन निखळ प्रेमाचे बंधन
तो विसरतो दायीत्व ओलांडतो निती नियमाच्या कक्षा
बहीण-बांधे भावा राखी, व्हावी तिची सुरक्षा
सारेच झाले अमंगल असुरक्षित कसले रक्षा बंधन
विसरुन सारे पवित्र नाते केवळ परंपरेचे दळण
राखी स्त्री रक्षणाचे आश्वासन निखल प्रेमाचे बंधन
भरदिवसा रस्त्यावरही टिपती सावज हेरुन
अब्रुची लक्तरे होती पण बघे बसती लपून
आपुल्या साऱ्या भगिनी तत्व हे जातो ते विसरुन
महिला उध्दारक शासक बसती मुग गिळून
राखी स्त्री रक्षणाचे आश्वासन निखळ प्रेमाचे बंधन
कायर नरपशू वृथा पिटती दिंडोरा पौरुषाचा
आजच्या पोरी लै भारी त्या बचाव करतील स्वत :चा
विसरु नका सिंधु साक्षी ललीता मलाला झेंडा कर्तृत्वाचा
त्याच म्हणतील बांधा राखी सन्मान होईल नव्या नात्याचा
त्याच म्हणतील बांधा राखी सन्मान होईल नव्या नात्याचा

**- सुभाषनगर अ. बागी**
डोंबिवली (पु.)

## पृथ्वी

आकाशाशी जुळले नाते, ग्रह गोलांचे
लुकलुकणाऱ्या चांदण्यांचे
पृथ्वीवरुन दिसे आभाळ ढगांचे
चांदण्याचे, चंद्र-सूर्याचे, इंद्रधनुचे
पक्ष्यांचे, पावसाचे आणि विमानाचे।।
पृथ्वीवरी तेज सूर्याचे, गाजवतो तो राज्य पृथ्वीवरी
तप्त वायुचा गोळा तो देतो, शक्ती प्रकाश पृथ्वीवर।।
आजची सर्व सृष्टी पृथ्वीवरी असे
कृपा त्या भास्कराची अवनी वर उतरे।।
सूर्याभोवती फिरती पृथ्वी, जणू प्रियाच असे ती त्याची
जीव टाकते ओवाळून त्यावर
सजीव सृष्टी निर्माण करते त्याच्या मदतीने।।
पृथ्वीवरील सागराची वाफ होऊन, बने त्याचे काळे मेघ
वर्षाव पावसाचा भिजवतो अंग पृथ्वीचे।।
ओली होते काळी माती, अंकुरले जीवन पृथ्वी पोटी,
नवजीवन निर्माण होतसे तृप्त ती धरणी माता
सूर्यास मारीत असते प्रदक्षिणा।।

**- अनघा कुलकर्णी**
नवी मुंबई ,नेरुळ.

## हैराण

तुझ्या आठवणीत घुटमळतंय जीवन
वाट पाहुन अंधुक पडले नयन
ठेका काळजाचा सारखा चुकतोय
छातीचा भाता फुगतोय ओसरतोय
मुखवट्याचा वाण पडू लागला काळपट
कपाळाच्या आठीची जाडी भरु लागली दुप्पट
मंद आवाजाचा कान घेई कानोसा
अंधाराची सावालीही देईना दिलासा
संभाषणासाठी ओठ झाले अतुर
भरल्या काळजीने होतोय चिंतातुर
वाटेवरच्या पाऊलखुणा शोधू पाही
वादळ वाट लावूनी जाई
प्रेमाच्या पायघड्या प्रतिक्षेत नटल्या
आनंदाच्या पाकळ्या बुडबुड्यात विरल्या
साखरेची गोडी भासू लागतेय कडू
अजुनी कसा येईना आपला भिडु
तुझ्या विना जग भासु लागले वैराण
माझ्या जगण्याचे जीणे झाले हैराण.

**- शिवाजी बाबर**
नवी सांगवी, पुणे.




# वाईची संध्याकाळ

- शुभांगी पासेबंद
ठाणे (प.)

महाबळेश्वर, वाई, पाचगणी हे पर्यटनाचे खास ठरलेले आकर्षक पर्याय आहेत. साताऱ्यापासून अगदी जवळच असलेले वाई हे चित्रपटाच्या चित्रीकरणासाठी लोकप्रिय गाव आहे. आकर्षक देखाव्यांसाठी चित्रपट निर्माते परदेशात जातात. मात्र ग्रामीण देखाव्यांसाठी नाशिक, वाई हे त्यांचे आवडते पर्याय आहेत. चौपदरी महामार्गामुळे दोन्ही ठिकाणी पोहचणे फारच सोपे झाले आहे. सुसंस्कृत, सौम्य गावकऱ्यांमुळे निसर्गरम्य परिसर थंड हवामानामुळे वाई अधिक लोकप्रिय होत आहे.

ऐतिहासिक वारसा असलेली सातारा पुणे शहर झपाट्याने विकसित झाली. वाई मात्र आपल्या ग्रामीण बाज, थाट व ऐतिहासिक साज अजुनही दिमाखात अंगावर मिरवत आहे. वाईला चित्रपटांचे गाव म्हणतात. वाईला अनेक चित्रपटांचे चित्रीकरण झाले आहे. त्यामुळे चित्रपटप्रेमी नेहमीच वाईला भेट देतात. सातारा, सज्जनगड, टोसेघर, महाबळेश्वर या सहलीमध्ये ओझरती भेट तरी देतातच. साताऱ्याच्या माहुलीला नदी किनारी हिंदी चित्रपट गुँज उठी शहनाई चे चित्रीकरण झाले. इथली काही दगडी देवळे आणि वाईच्या मेणवलीतील नदीचा घाट काळ्या कातळाचा बनला आहे. त्यामुळे चित्रीकरणाला प्राचीन छटा येते. वाईच्या घाटात पांडव राहत होते तेव्हा वाईला विराटनगरी म्हटले जाई. अनेक देवळांमुळे वाईचा मेणवली घाट पवित्र व प्राचीनकालीन वाटतो. काही वर्षापुर्वी वाईला इतिहासकालीन शस्त्राचा साठा सापडल्याचे बोलले जात होते. कृष्णा नदीवर बांधला गेलेला १२५ वर्षे जुना पुल वाईचा इतिहासाशी असलेला संबंध दर्शवितो. ब्रिटीशकालीन पुलावर व त्याच्याखाली सुध्दा चित्रीकरण होते. संपुर्ण सातारा जिल्हाच कलाकार, चित्रकार, शिल्पकार यांना पर्वणी देईल व स्फूर्ती, अत:प्रेरणा देईल असा सुंदर आहे.

साताऱ्याच्या खिंडीतल्या गणपती इतकाच पुरातन वाईच्या मंदिरातील गणपती असून तो जागृत आहे. व नवसाला पावतो. प्रभादेवीच्या (मुंबई) सिध्दीविनायकाइतकाच तो सिध्दीविनायक आहे. या देवळात असलेला नंदीच दरवर्षी एक गहू पुढे जातो व अर्धा गहू मागे जातो अशी अख्यायिका आहे. वाईच्या गणपती मंदिरात पुजाऱ्यांची गर्दी नाही, फुलेविक्यांचा गोंधळ नाही. देवदर्शन शांतपणे घेता येते. विघ्नविनाशक गणपती बाप्पा कलाधार नावानेसुध्दा प्रसिध्द आहे. कलेच्या क्षेत्रावर गणेशाचा वरदहस्त असतो. मेणवली

घाटावरील नान फडणीसांचा वाडा ऐतिहासिक वारसा सांगतो. कृष्णानदीचे सुशांत रुप वाईत सर्वत्र आढळते.

महाबळेश्वरपासून जवळ असल्याने वाईत कृष्णानदी हळूवार वाहते. वाईत स्ट्रॉबेरी सुध्दा पिकवतात. व तेवढ्याच रसदार असतात. वाईतील हॉटेलात पिठलं भाकरी जेवण मिळते. ब्रेड बटर व पिझ्झा येथे अजुनतरी मिळत नाही. येथील गावकरी प्रामुख्याने शेतकरी असून शेतीवरच त्यांचा उदनिर्वाह चालतो. येथील लोक चांगल्या स्वभावाचे आहेत. पर्यटक इथे संपुर्ण दिवसभर थांबुन संध्याकाळी सातारा किंवा महाबळेश्वराला मुक्कामास जातात. वाईची संध्याकाळ खूप सुंदर असते. सूर्यास्ताच्या वेळी बैलगाड्यांच्या चाकांचा लयबध्द आवाज ऐकू येतो. रंगाची उधळण होते. गोधुळ उडते. गाईच्या गळ्यातील घंटा व घुंगुरमाळा मंजुळ आवाज करतात. थंडगार वाऱ्याची झुळूक अंगावर शिरशिरी आणते. व मावळत्या दिनकराला साष्टांग दंडवत करुन आपण वाईच्या हळवेपणाने निरोप घेतो. मात्र वाईचे ते निसर्गरम्य रुप कॉम्प्युटरच्या स्क्रीनसेव्हरप्रमाणे पुन्हा-पुन्हा मनात रुंजी घालते. वाईची ती सावळी, जांभळी संध्याकाळ वारंवार आठवत राहते.



## वाढत्या वयात देखील सुंदर दिसा

वाढत्या वयात देखील सुंदर दिसण्यासाठी महिलांची धडपड असते. त्यासाठी वेळोवेळी आपण आपल्या शरीराची काळजी घेतली तर नक्कीच आपण सुंदर दिसू ते पाहा.

जर तुमची झोप पूर्ण झाली नाही तर तुमचा चेहरा सुकल्यासारखा व नाराज वाटेल. जेव्हा तुम्ही झोपता तेव्हा तुमच्या शरीरातील यंत्रणेला आराम मिळून त्या रिकव्हर होत असतात. ज्याच्यामुळे तुमच्या चेहऱ्यावर सुरकुत्या येत नाही व त्वचा तरुण दिसण्यास मदत होते.

तुम्हाला तुमच्या त्वचेसंदर्भात माहिती असणे गरजेचे आहे. जसं की, तुमची त्वचा कोरडी किंवा तेलकट आहे. त्यासाठी तुम्ही दररोजच्या जेवणात परिपूर्ण आहार घ्या. ज्यात हिरव्या पालेभाज्यांचा जास्त समावेश असावा. रोज सकाळी उठून जॉगिंगला गेलात तर तुमचे मन तंदुरुस्त राहते. राऊंड मारल्याने तुमची त्वचा प्रदूषणमुक्त राहते व त्यावर चमक येते. त्वचा सुंदर व तरुण दिसण्यासाठी दररोज ८-१० ग्लास पाणी पिणे आवश्यक आहे. तर अशा सर्व गोष्टी केल्या तर नक्कीच तुम्ही तरुण दिसाल.

## फर्निचरची काळजी

घराचं सौंदर्य फर्निचरमुळे वाढते. पण त्या फर्निचरची योग्य ती काळजी घ्यावी लागते. नाहीतर ते खराब होऊन घराची शोभा घालविते. यासाठी रोजच्या-रोज फर्निचर साफ करा. त्यावर धुळ, माती बसू देऊ नका. लाकडाचं फर्निचर जास्त वेळ उन्हात ठेवू नका. प्लास्टिकच्या फर्निचरचेही उन्हापासून संरक्षण करा. उन्हामुळे या फर्निचरचा रंग फिका पडतो. लाकडी फर्निचरला आवश्यकतेनुसार रंग लावा. त्यामुळे कीड आणि वाळवीपासून त्याचे संरक्षण होते. फर्निचर साफ करताना कापडावर निलगिरीच्या तेलाचे थेंब टाकल्याने छान सुगंधही येईल आणि जंतुही मरतील. अशा प्रकारे फर्निचरची स्वच्छता केल्यास फर्निचरचे आयुष्य नक्कीच वाढेल व घराची शोभाही वाढेल.

## सूर्यनमस्काराचे फायदे

सूर्यनमस्कारातूनही शरीराला परिपूर्ण व्यायाम मिळू शकतो. नियमितपणे सूर्यनमस्कार घातल्यास फिटनेस राखणे सहज सुलभ होऊ शकते. या एका व्यायामात अनेक प्रकारच्या व्यायामाचे लाभ मिळतात. कुठल्याही वयाची व्यक्ती या व्यायाम प्रकाराने फिटनेस मिळवू शकते. सूर्यनमस्कारामध्ये बारा आसने आहेत. ही बारा आसने करताना बारा श्लोकांचे उच्चारण होते. योग्य मार्गदर्शनाखाली सूर्यनमस्कार घातल्यास अत्यंत कमी वेळेत त्याचा फायदा होतो. सुरुवातीला एकावेळी तीन नमस्कार घालून नंतर संख्या वाढवावी.

## गुडघेदुखी वृध्दापकाळी सतावणारा विकार

उठता-बसता सतावणारी गुडघेदुखी आजकाल तरुणांमध्येही दिसू लागली आहे. गुडगेदुखीची अनेक कारणे आहेत.

**बेकर्स सिस्ट** - गुडघ्याच्या मागील बाजुस येणारी सूज, कधी सिस्ट फुटला तर वेदना गुडघ्याच्या मागील भागापासून खाली पोटऱ्यापर्यंत वाढतात.

**बरसाइट्स** - गुडघ्यांवर वारंवार सूज येणे, दीर्घकाळ गुडघ्यांवर बसणे, गुडघ्यांचा जास्त वापर वा दुखापतीमुळे.

**गुडघ्याला लागलेला जोराचा धक्का वा दुखापत** - अचानक वा चुकीच्या हालचालीमुळे धक्का लागून लिगमेंटला दुखापत झाल्याने गुडघ्यात वेदना होऊ लागतात. या तात्पुरत्या असतात. यावर उपाय म्हणजे आराम करणे, ज्यामुळे वेदना वाढतील अशा हालचाली टाळणे. बर्फाचा शेक घेणे, सुरुवातीला दर १५ मिनिटांनी आणि नंतर दिवसातून किमान चार वेळा, सुज कमी व्हावी म्हणून गुडघा उंचावर राहील असे बसावे. बँडेज वा इलेस्टिक स्लीव्ह वापरणे व हळूहळू दाबणे. याने सुज कमी होते. गुडघ्याला आधार मिळतो. झोपताना गुडघ्याखाली उशी घ्यावी. अशा प्रकारे काळजी घेतली तर वृध्दापकाळी सतावणारी गुडघेदुखीत जरा आराम मिळतो.



# कुटुंब

- माधुरी सॅम्युअल चक्रनारायण
बदलापूर (पू.)

"कुटुंब" ही परमेश्वरांनी दिलेली सर्वात सुंदर देणगी आहे. कुटुंब ही संकल्पना आपल्याला एक सुरक्षिततेची भावना देते. कुटुंबातील नातेसंबंध खुप महत्वाचे असतात. आपल्यावर कुणीतरी प्रेम करत आहे. आपले कुणीतरी आहे ही भावना माणसाच्या जगण्याचा आधार आहे. कुटुंब आपला आधार, आसरा असतो. हे प्रत्येकाला माहीत असते. आणि म्हणूनच आपल्याला रोजच्या संघर्षाला आणि अडथळ्यांना सामोरे जाण्याचे बळ येते. कुटुंबातील आपापसातील नाती घट्ट आणि दृढ असायला हवीत. मुलांना आपलेपणा वाटणे खूप महत्वाचे आहे. कुटुंबाकडून त्यांना हा आपलेपणा मिळतो. काही अडचण आली किंवा काही सांगायचे असेल तर आपल्याला कुणीतरी आहे ही भावना त्यांना सुरक्षित करते. नात्यातील हे अनुबंध, प्रेम, सामंजस्य हे सगळे कुटुंबातील व्यक्तींनी एकत्र वेळ घालवल्यामुळे परस्परातील सहवास फुलतो.

बदलत्या काळाप्रमाणे नात्यांची परिभाषाही बदलत चालली आहे. वातावरणात सतत होणारा बदल जगण्याचा संघर्ष या सगळ्याचा परिणाम परस्परातील अनुबंधावरही होतो. आजच्या काळात घटस्फोटांची वाढत जाणारी संख्या धक्कादायक आहे. या परिस्थितीत मुलांना कुटुंबाचे महत्व, किंमत, त्यातील संस्कार, नात्यांमधील प्रेम आणि कुटुंबीयांच्या सहवासातील आनंद आणि महत्व हे कळणे खूप गरजेचे आहे. त्यांच्या भावनिक सुरक्षेसाठी हे गरजेचे आहे. तुमच्या मुलांचे तुम्ही आदर्श पालक असता. तुमच्या वागण्याचे ते अनुकरण करतात. तुमच्या परस्परातील नातेसंबंधाचा त्यांच्यावरही परिणाम होतो. मुलांना गरज असेल आणि तुम्ही त्यावेळेला हजर नसाल तर त्यांच्या मुलांशीही ते असेच वागतील. किंवा त्याहीपेक्षा

टोकाची भूमिका ते घ्यायची शक्यता असेल. तुम्ही त्यांच्यासाठी आहात ही खात्री त्यांना सुरक्षित करेल. कुटुंबाचा सहवास हा मुलांच्या भावी जीवनाचा भक्कम पाया आहे. कुटुंबाच्या सहवासामुळे कुटुंब संस्थेचे महत्व, नात्याचे महत्व त्यासाठी करावी लागणारी तडजोड या सगळ्या गोष्टी त्यांच्या भविष्यातील आयुष्याकरिता आणि विकासातील अनुकूल आहेत. यामुळे त्यांना कुटुंबाचे महत्व कळेल आणि ते जास्त सकारात्मक दृष्टीने जीवनाकडे पाहू शकतील.

"लहानपणा देगा देवा" ही आपली सगळ्यांच्या मनातील सुप्त इच्छा असते. निरागस असे हे वाक्य चिरकालासाठी नसते. आपण सगळेच जीवनाचा एक एक टप्पा पार करत मोठे होत असतो. त्या मोठे होण्याच्या प्रवासात अनेक पाडाव असे येतात जिथे आपल्याला काही प्रतिकुल परिस्थितीना सामोरे जावे लागते. यावेळी आपल्याला गरज असते ती आपल्या कुटुंबाच्या आधाराची. आपली मुले वाढताना त्यांच्या विकासाच्या प्रवासात दैनंदिन जीवनात अनेक तऱ्हेने अनेक गोष्टी शिकत असतात. त्यांच्या वयानुसार त्यांना काही अवघड प्रसंगाना तोंड द्यावे लागते. अशा वेळी कुटुंब हाच त्यांचा आधार, हिम्मत असते. मुलांना जीवनातील महत्वाचे धडे शिकवा. एखाद्या परिस्थितीबद्दल किंवा प्रसंगावर एकत्रितपणे चर्चा करणे आवश्यक असते. या चर्चेतून मुलांचा जीवनाकडे बघण्याचा दृष्टीकोन विकसित होतो. म्हणून हा कुटुंबाचा सहवास, एकत्रितपणे वेळ घालवणे खूप महत्वाचे आहे.

जगण्यातला एकटेपणा कुठल्याही व्यक्तीला खिन्न करतो. प्रसंगी एकटेपणा बरा वाटतो. पण नेहमी एकटं असणे हे कंटाळवाणे असते. प्रत्येकाला आपले सुख आणि दु:ख वाटावेसे वाटतात. कठीण प्रसंगी आपले कुटुंब आपली नाती आपला आधार असतात. कोणत्याही प्रसंगाला किंवा अवघड परिस्थितीला सामोरे जाण्याची ताकद आपल्याला कुटुंबाकडून मिळते. आपला आनंद आपण आपल्या कुटुंबियांसमवेत वाटला की आपल्याला समाधान वाटते. कुटुंबातील नाती ही एकमेकांच्या सहवासाने एकत्रितपणे वेळ घालविल्याने दृढ होतात आणि फुलतात. कुटुंब हाच आपला आधार असतो. आपल्या कुटुंबियांबरोबर थोडा वेळ घालविणे किंवा सुट्टीच्या दिवशी एकमेकांच्या सहवासात वेळ व्यतीत केल्यानेही नाती अधिक दृढ आणि घट्ट होतात. यामुळे तुमचे कुटुंब सशक्त व तेजस्वी होईल.

प्रत्येकाची सौंदर्याची परिभाषा वेगळी असते. सामान्य माणसाकरीता त्याचे कुटुंब हे सर्वात महत्वाचे असते. आपली माणसे आपले घर आपले कुटुंब यात तो आपला आनंद शोधत असतो. त्याचे कुटुंब, त्याची माणसे, त्याची नाती हे सगळे त्याच्यासाठी स्वर्ग असतो. असा हा स्वर्ग तुम्हा-आम्हाला प्रिय असतो. तुमचे आसू, हासू सगळे या स्वर्गात सामावलेले असते. जीवनाची मूल्ये जगण्याचा आधार प्रेम, विश्वास, तडजोड, एकमेकांसाठी जगण्याचा ध्यास हा या स्वर्गातच असतो. आणि हाच जीवनाचा, नात्यांचा आणि जगण्याचा खरा मुलाधार असतो.

---

**हसा** पती-पत्नीचं मोटं भांडण सुरु होतं.

पत्नी : मी सगळं घर सांभाळते, मुलांना सांभाळते, सासु-सासऱ्यांना बघते, तुम्ही काय करता?

पती : मी तुला बघून स्वत:ला सांभाळतो. भांडण लगेच संपलं.

(सत्यनारायणाच्या पुजेनंतर)

नवरा : प्रसाद आवडला का?

बायको : खरं तर प्रसादच आवडलेला आधी. पण त्याचं पहिल्या मजल्यावरच्या आरतीसोबत जमलं. मग तुम्ही पाहायला आलात!

नवऱ्याने कायमचा शिरा सोडला.




- विष्णू रामू वासुदेव
जयसिंगपूर जि. कोल्हापूर

खरं पाहिलं तर प्रेम या शब्दाची व्याख्या अनेक कवी, लेखक, समिक्षक, परिक्षक आणि अनेक जाणकारानी वर्णन केले आहे. इतकेच नव्हे तर अनेक संतांनी ग्रंथ लेखकानी प्रेमाच्या व्याख्या सांगितल्या आहेत. प्रेम म्हटलं की ते पती-पत्नीचं प्रेम, मित्रा-मित्राचं प्रेम, मित्र-मैत्रिणीचं प्रेम, आई-मुलाचं प्रेम, भावा-भावाचं प्रेम अशा प्रकारे हे जे प्रेम आहे. त्याची व्याख्या माझ्या मते प्रेम म्हणजे प्रेमात माया, जिव्हाळा आणि कळवळा अंतरभुत म्हणजे प्रेम होय.

प्रेमात त्याग महत्वाचा. धन, दौलत, पैसा-अडका, स्वार्थ, लोभ, मोह इत्यादी गोष्टींचा त्याग करण्याची मनाची तयारी असावी लागते. याला निस्सीम, निष्पाप प्रेम म्हणता येईल. आज आय लव्ह यू म्हटलं की झालं. प्रेम आणि मग या प्रेमाची कस न पाहता पुढे पश्चाताप अशी बरीच उदाहरणे रोज घडतात. यात स्वार्थ, लोभ, मोह दडलेला असतो. ते फक्त तकलादू प्रेम होय. इथे प्रेमात माया, जिव्हाळा आणि कळवला म्हंटल कारण असे की माया म्हणजे ममता, जिव्हाळा म्हणजे जीवाला जीव देणारा जीव की प्राण आणि कळवळा म्हणजे तळमळ. तेव्हा प्रेमात वरील तिन्ही गोष्टींचा अंतरभाव असेल तर काही उदाहरणावरुन लक्षात येईल.

दोघे प्रियकर प्रेयसी निघालेत. आणि टवाळखोर गुंडानी वाटेत त्या प्रियशीचा विनयभंग करुन छेड काढली. तर प्रियकर प्रतिकार करतो. वेळप्रसंगी हाणामारी होते. आणि तिच्यासाठी तो जीवे मारलाही जातो. प्रेमासाठी ते दोघेही जीवही देतात अशी बरीच उदाहरणे आपणास वाचण्यात, ऐकण्यात मिळतात. मग सांगा या प्रेमात माया, जिव्हाळा आणि कळवळा या गोष्टी सातत्याने असल्याने असे या प्रसंगावरुन कळते. साधं उदाहरण घेऊ. एक हट्टी स्वभावाच्या मुलाला त्याच्या हट्टी स्वभावामुळे आई मारत असेल तर शेजारी किंवा वाटेने चाललेल्या एकाद्या व्यक्तीने विचारले की, "बाई तुम्ही त्या मुलाची आई नव्हे का?" आई आहात मग मुलाला मारता

का? येवढ्या प्रश्नावरुन आईचं हृदय जागं होतं. आणि मनात म्हणते अंगबाई माझं मुल हट्टामुळे सकाळपासून काय खाल्ल-पिलं नाही. वर त्याला मी मार देते. त्याला दुखलं असेल कळ येत असेल, तिच्या हृदयात कळवळा निर्माण होऊन ती त्याला हृदयाशी कवटाळते.

श्रीकृष्णाने बालपणी हट्ट केल्याच्या अनेक गोष्टी ग्रंथात नोंद आहेत. बाल श्रीकृष्णाने गवळणींच्या शिक्यावरचं लोणी चोरुन खाल्लं. हि तक्रार जेव्हा यशोदेच्या कानावर गेली. तेव्हा तिने हलकीसी चापट देऊन त्याला तोंड उघडण्यास सांगितले. श्रीकृष्णाने आपले मुख उघडले तेव्हा तिला सारे विश्व दिसले. दुसरे उदाहरण म्हणजे बालश्रीकृष्णाने आकाशातील पौर्णिमेचा चंद्र पाहिजे म्हणून हट्ट धरला. तेव्हा तिने वाटीत पाणी घेऊन अंगणात येऊन त्याच्या हातात ती वाटी दिली. वाटीत चंद्राचे प्रतिबिंब पडले. त्याला चंद्र मिळाल्याचा आनंद झाला. अशा रितीने यशोधेने प्रेम आणि मायेने त्याचा हट्ट पुरविला.

एखाद्या मित्र अपयश आले म्हणून विष प्राशन करतो. तेव्हा त्याला वाचविण्यासाठी त्याचा सच्चा प्रिय मित्र धडपडतो. स्वत:चे रक्त देतो, किडणीसुध्दा देतो आणि आपल्या मित्राचे प्राण वाचवतो. हे केवळ प्रेम आहे म्हणून नाही, तर त्याच्या त्या प्रेमात मित्राबद्दलची माया, जिव्हाळा आणि कळवळा आहे म्हणून. नुसतं स्वार्थीपणाने वरवरचे प्रेम हे नाटकी स्वरुपाचे असते. अशा तकलादू प्रेमाला काही अर्थ नाही. ज्यात माया, जिव्हाळा आणि कळवळा आहे तेच खऱ्या प्रेमाचं प्रतीक आहे. 

## स्वयंपाक घरातील छोटे-छोटे बदल

स्वयंपाक घरात लोखंडाचे किंवा कास्ट आर्यनचे तवे आणि कढया वापराव्यात. आमटी आमसुराचं सार, टोमॅटो सूप, सॉस इत्यादी आंबट पदार्थ बनवताना लोखंडांच्या कढईचा वापर करावा. त्यामुळे आहारातील लोहाचे प्रमाण वाढण्यास मदत होते.

पदार्थावर खूप प्रक्रिया करुन ते खाण्यापेक्षा ते ज्या स्वरुपात आहेत तसेच खाणे आरोग्यदायक टरेल.

मायक्रोवेव्हमध्ये पदार्थ गरम करताना काचेचीच भांडी वापरावीत.

डबे नेताना प्लॅस्टिकचे डबे वापरु नयेत, त्याऐवजी स्टेनलेस स्टीलचे डबे वापरावेत.

घरात पाणी भरुन ठेवण्यासाठी प्लास्टिकच्या बाटल्या वापरण्याऐवजी चांदीचा किंवा तांब्याचा वापर करावा. म्हणजे या धातुतील गुणधर्म आपल्या शरीरात जातील. असे छोटे-छोटे बदल करुन आपण आपले आरोग्य सुधारु या.




- विनयकुमार माळवे
बदलापूर (पू.).

रामदास स्वामी आपल्या मनाच्या श्लोकात असे म्हणतात,

जिवा कर्मयोगे जनी जन्म झाला।
परी शेवटी काळ घेवोनि गेला।।
महाथोर ते मृत्यूपंथेचि गेले।
किती एक ते जन्मले आणि मेले।।

वरील श्लोकामध्ये जीवाचा कर्मयोगाने लोकात जन्म झाला पण शेवटी त्याला मरण आले. मोठे व थोर लोक मृत्यूच्या मार्गे गेले अनेक जन्मले आणि मेले. मरणाचे हे वास्तव. एका गावाजवळ भगवान गौतम बुध्द आले होते. त्या दिवशी एका बाईच्या बाळाला मरण आले होते. त्या बाईला कोणीतरी सांगितले की, बुध्द भगवान आले आहेत. काही तरी करुन तुझ्या मृत बाळाला पुन: ते जीवंत करतील. बाईला खरे वाटले. ती बुध्दांकडे गेली. व रडत म्हणाली भगवान माझ्या बाळाला जीवंत करा. क्षणभर बुध्द स्तब्ध झाले. व नंतर म्हणाले, बाई ज्या घरात अद्याप कोणीही कधीही कसेही मृत्यू पडले नाही. मेले नाही अशा घरातून मुठभर मोहरा घेऊन ये. ती बाई तात्काळ घरोघर फिरु लागली. विचारु लागली तुमच्या घरी अद्याप कोणीही मृत्यू पडले नाही का? काही घरच्यांनी आपल्या घरातील आजा, चुलता, पुतण्या, वहिणी मृत्यूमुखी पडल्याचे सांगितले. बाई समजायची ते समजली व बुध्दाकडे पुन: गेली. बुध्दाला तिने सांगितले की असे एकही घर नाही ज्या घरात कोणीना कोणी कधी ना कधी मेले नाही. बुध्द उपदेश करु लागले. मरण अटळ आहे. त्याबद्दल शोक करणे व्यर्थ आहे.

नुकतेच धर्मानंद कोसंबी लिखित जातक कथासंग्रह पुस्तक माझ्या वाचनात आले. त्यातील शिर्षकाखाली एक कथा अशी आहे. एका श्रीमंत व्यापाऱ्याच्या कुटुंबात बोधिसत्व

जन्माला आला होता. त्याच्या लहानपणी त्याचा बाप मृत्यूमुखी पडला. घरची सर्व जबाबदारी बोधिसत्वाच्या वडिल भावावर पडली. काही काळाने वडिल भाऊ मरण पावला. तेव्हा सर्व नातेवाईक मंडळी मोठ-मोठ्याने आक्रोश करु लागली. बोधिसत्व काही रडत नव्हता अथवा शोक करीत नव्हता. सर्व सत्ता बोधिसत्वाच्या हाती आल्याने त्याला आनंद झाला असेल म्हणून तो रडत नाही किंवा शोक करीत नाही. हे ऐकून बोधिसत्व म्हणाला, गेल्याचा शोक करुन काही निष्पन्न होणार नाही. मेलेला माणूस परत येत नाही. किंवा आपल्या शोकाने त्याला सद्‌गती मिळते असे नाही. तेव्हा त्याबद्दल आक्रोश करुन आपल्या जीवाला पिडा देण्यात कोणता अर्थ बरे? शोकाचा आपल्या मनावर पगडा बसवून देणे हे सुज्ञ माणसाचे कर्तव्य आहे. तर लक्षात असावे की मरण अटळ आहे. आणि अगदी जवळचा प्रेमाचा मेला तरी आपण केलेल्या कोणत्याही उपायाने तो पुन:जिवंत होणार नाही. मनाच्या श्लोकात रामदास स्वामी सांगतात.

मना पाहता सत्य हे मृत्यूभुमी।
जिता बोलती सर्व ही जीव मीमी।।
चिरंजीव हे सर्वही मानिताती।
अकस्मात सांडुनिया सर्व जाती।।

ही मृत्यूभुमी आहे. तरी जीवंत असलेले मी मी करीत असतात. चिरंजीव असल्याचे समजणारे सुध्दा अकस्मात मरण पावतात. मरण अटळ असले म्हणून काय जाणून-बुजून मरणाला जवळ करायचे की काय? आत्महत्या करायची काय? या प्रश्नांची उत्तरे नाही अशीच आहेत. नैसर्गिक मृत्यू येईपर्यंत आनंदाने जगायचे. "मरावे परी किर्ती रुपे उरावे" आपण मेल्यावर आपली चांगल्या अर्थाने चांगली किर्ती होईल असे जगावे. मेल्यावर चांगला/चांगली होती स्वभावाने जीवंत असताना चांगले केले त्याने असे म्हटले पाहिजे.

समर्थ म्हणतात,
देहे त्यागिता किर्ती मागे उरावी।
मना सज्जना हेचि क्रिया धरावी।।
मना चंदनाचे परी त्वा झिजावे।
परी अंतरी सज्जना नीववावे।।

याप्रामणे सज्जन मनाने असे काम करावे की किर्ती मागे राहिल. चंदनाप्रमाणे सुगंध देत झिजावे. आणि अंत:करणामध्ये सज्जनाला शांत करावे.

## टिप्स

चेहऱ्याची त्वचा मुलायम टेवण्यासाठी लिंबाची पाने घेऊन त्यात हळद टाकून चेहऱ्यावर लावा. नंतर चेहरा कोमट पाण्याने धुतल्यावर ताजेतवाने वाटते.

कडुलिंबाची पाने वाटून त्यात लिंबाचा रस, ग्लिसरीन आणि दुध याचे मिश्रण लावल्याने चेहऱ्यावरील काळे डाग जातात.

चेहऱ्यावर मुरमे असतील तर तुळस, पुदिना, कडुलिंबाच्या पानांची पेस्ट १५ ते २० मिनिटे लावून चेहरा धुवावा. चेहऱ्यावर वेगळीच चमक येते.

ब्लिचिंग केल्याने रंग गोरा होत नाहीतर केवळ त्वचेवरील केसांचा रंग फिकट होण्यास मदत होते. गोरं दिसण्यासाठी वारंवार ब्लिचचा वापर करणे शक्यतो टाळावे.

डोळ्यावर १५ मिनिटे काकडीचे काप ठेवल्याने थकलेल्या डोळ्यांना आराम मिळतो.

नेल ब्लिचचा वापर केल्याने डाग पडलेली नखे आणि त्यांच्या भोवतीची त्वचा मुलायम बनते.

हाताच्या कोपऱ्यांचा व गुडघ्याचा काळेपणा घालवण्यासाठी त्या भागावर ग्लिसरीन लावावे. नंतर कोमट पाण्यात एक जाडसर कपडा भिजवुन त्याने रगडावे असे केल्याने काळेपणा दूर होतो.

लाकडी वस्तुवर चरे पडून पॉलिस खराब झाल्यास त्यावर नेसकॉफी पाण्यात कालवुन रंगाप्रमाणे लावावी. यामुळे चरे दिसत नाहीत.

बाथरुमच्या टाईल्स घासण्याआधी व्हिनेगर लावून टेवा. थोड्या वेळाने साबणाने टाईल्स घास यामुळे टाईल्सचा पिवळेपणा कमी होऊन पांढऱ्याशुभ्र होतात.

पावसाळ्यात कपाटात एका पुडीमध्ये दोन-चार कोळसे बांधून ठेवल्यास कुबटपणा शोषला जातो.

कपड्यावर बिटचा डाग पडला असेल तर पाण्यात थोडे मीट घालून डागाळलेला भाग त्यात बुडवून टेवा. नंतर साबणाने धुतल्यावर डाग जातो.

त्वचेवरील मुरुमे, डाग किंवा व्रण कमी करण्यात कोरफडीचा रस फायदेशीर टरतो. कोरफडीच्या रसामध्ये गुलाबजल मिसळून लावल्याने डाग आणि मुरुमे नाहीशी होतात.




**-विवेक वि. कुलकर्णी**
मु. पो. चोडण, गोवा.

एक छोटस खेडेगाव. डोंगर, दऱ्या खोऱ्यात वसलेले. सारेच शेतकरी. शेतात कष्ट करावेत आणि जे पिकेल, मिळेल त्यात समाधान. मानून आनंदान राहण्याची वृत्ती. सारे गाव म्हणजे जणू एक कुटुंब. एकमेकांना वेळप्रसंगी सहकार्य, आपलेपणाची भावना, सर्वांच्या सुख-दु :खात सर्वजण सारखेच सहभागी. ना भांडण, तंटा, द्वेष, इर्षा, मत्सर, चोरी काही नाही. सार काही अगदी झकास चाललेलं. पण म्हणतात ना सुखाला ही कधी-कधी दुष्ट लागते. सार वाईट पाप अनिष्ट, दुष्ट नरकात असत अस आपण मानतो. दुष्टांचे जीवनकार्य हेच असते की चांगल चाललेलं असतं त्यांच्यात खोडा घालायचा. वाईट करायच. यातच त्यांचा आनंद. जगात सर्व काळी सर्व स्थळी दुर्जन, पापी, दुष्ट असतात आणि ते नरकात जातात असं आपण मानतो. या नरकाचा अधिपती सैतान त्याला हे चांगल कसं ऐकवणार? चांगल कसं बघवणार. त्याने नरकात तावडतोब आपल्या दुतांची बैठक बोलावली. आणि या चांगल्या आदर्श खेडेगावाची माहिती देऊन त्या गावाची वाट लावायची म्हणजे तिथल्या माणसांना बिघडवायची कल्पना मांडली. सगळ्या दुतांनी शांतपणे सगळे ऐकून घेतले. आपापसात विचार विनिमय कुजबुज सुरु झाली. अखेर एक दूत उभा राहून म्हणाला, मालक मी घेतो ही जबाबदारी. मी आताच पृथ्वीवरच्या त्या गावात जातो आणि कामाला लागतो.

सैतानाला आनंद झाला. त्याला त्याने परवानगी दिली. सर्वांनी त्याला त्याच्या कार्यास शुभेच्छा दिल्या. तो दूत पृथ्वीवर आला व एका शेतात गेला. शेतकरी शेत नांगरत होता. त्याने आपल्याबरोबर आणलेली भाकरी एका झाडाखाली ठेवली होती. दूत गुपचूप त्या झाडाकडे गेला आणि शेतकऱ्याची नजर चुकवून ती भाकरी त्याने चोरली. व शेजारी लपून बसला. त्याला वाटले शेतकरी येईल. भाकरी सापडत

नाही म्हटल्यावर बैतागेल, संतापेल. काहीतरी वाईट शिव्याशाप देईल. आणि काम अर्धवट सोडून निघून जाईल. पण त्याचा अपेक्षाभंग झाला. त्याच्या कल्पनेप्रमाणे काहीही घडले नाही. दुपारी शेतकरी आला. भाकरी नाही म्हटल्यावर इकडे-तिकडे पाहिल. मग स्वत:शी म्हणाला, गेली कुठे भाकरी? इथेच तर ठेवली होती. आता नाही तर काय करणार? खाल्ली असेल कुणीतरी भुकेल्या प्राण्याने. असू दे एका अर्थी बरच झालं. कारण भाकरी खाण्यातला आणि खाल्ल्यानंतरच्या आरामाचा वेळ वाचला. आणखी थोड जास्त काम करता आलं. असं म्हणून तो पुन्हा कामाला लागला. दूताचा भ्रमनिरास झाला. निराशेने खाली मान घालून तो परत गेला व म्हणाला, मालक मी माझ्या कामात सपशेल अपयशी झालो. का? काय झाल? नीट सांग. माझ्या योजनेप्रमाणे मी त्या शेतकऱ्याची भाकरी चोरली. पण काहीही वेडेवाकडे न बोलता तो शेतकरी आपल्या कामाला गेला. त्याला भाकरी गेल्याची खंत अगर खेद काहीही वाटला नाही. असू दे ठीक आहे. आता तूच हे काम कर. हे पाहा तु वेश पालट. शेतकऱ्याच्या शेजारी राहायला जा. त्याच्याशी चांगली मैत्री कर. त्याला विश्वासात घे आणि हळू हळू त्याला सल्ला देऊन आपल काम फत्ते कर. यासाठी मी तुला तीन वर्षे देतो. जर तू यशस्वी झालास तर तुला प्रमोशन देईन नाही तर..

ठीक आहे मालक, बघाच मी काय करतो ते. असे म्हणून तो दूत निघाला. वेश पालटून शेतकऱ्याच्या शेजारी झोपडी बांधून राहीला. शेतकऱ्याशी मैत्री केली. त्याचा विश्वास संपादन केला. असे होता होता पावसाळा तोंडावर आला. मग एकदिवस तो शेतकऱ्याला म्हणाला, मित्रा यावर्षी तू आपले पीक कोठे पेरणार? अर्थात डोंगराच्या खाली. खोलगट भागात. अरे माझ ऐक यावर्षी डोंगर उतारावर पीक घे. कारण यावर्षी पाऊस खूप पडणार आहे. त्यामुळे खोलगट भागात पीक कुजुन जाईल. शेतकऱ्याने हा सल्ला ऐकला. त्याने डोंगर उतारावर पीक घेतले आणि खरोखरच पाऊस खूपच पडला. बाकी सर्वाचे पीक कुजून गेले. पण याचे पीक उत्तम आले. गरजेपेक्षा कितीतरी अधिक पट पीक आले. आता यावर्षी पीक कोठे घेणार? अर्थात डोंगर उतारावर. फार शहाणा आहेस. यावर्षी पाऊस अत्यंत कमी असणार. तेव्हा खाली खोलगट जागेत पेरणी कर. शेतकऱ्याचा दुतावरील विश्वास आता अगदी दृढ झाला होता. त्याने हा सल्ला ऐकला. बाकीच्या शेतकऱ्यांनी मागील वर्षीप्रमाणे पीक जाऊ नये म्हणून डोंगर उतारावर पीक लावले. त्यांना काहीच मिळाले नाही. कारण पाऊस अगदी अल्प झाला. या शेतकऱ्याचे मात्र रान पिकले. धान्य एवढे झाले की गेल्या वर्षीचे शिल्लक व यावर्षीचे नातेवाईक यांना दिले. विकले तरी कोठारे भरलेली तशीच. आता या इतक्या धान्याचे काय करायचे? तो दूताला म्हणाला, आता या जादा शिल्लक धान्याचे काय करायचे? व्होडका (दारु) बनव त्यापासून. पण मला कुठे येते दारु बनवायला. मी दाखवतो ना. बघ आणि कर.

दूताने धान्य कसे आंबवायचे, भट्टी कशी लावायची त्याचे प्रात्यक्षिक करुन दाखवले. दारु तयार झाली. शेतकऱ्याने ग्लास तोंडाला लावला. चव छान लागली. त्याला दारु आवडली. मग त्याने घरात भट्टी लावली व दारु बनवु लागला. हळु हळु लोक त्याच्या घरात दारु प्यायला येऊ लागले. तासंतास पीत बसणे, कामाकडे दुर्लक्ष, याचा आरोग्यावर परिणाम, भांडण, तंटे सुरु झाले. तो दूत मालकाकडे गेला. व त्याने सगळी हकीगत सांगितली. सैतान खूपच खूष झाला. तो म्हणाला, चल-चल मी तुझ्याबरोबर तुझे काम बघायला येतो. दोघे आले व शेतकऱ्याच्या घराजवळ लपून बसले. शेतकऱ्याची बायको आतून दारुचे ग्लास घेऊन येताना टेबलाजवळ आपटली व ग्लासातली दारु थोडी सांडली. लगेच तो शेतकरी संतापला "तुला दिसत नाही का? बघून चाल. दारु कशी आणि किती सांडलीस" तो रागाने ओरडला. दूत म्हणाला, बघा मालक भुकेसाठी आवश्यक असलेली भाकरी गेली तेव्हा काहीही न बोलणारा शेतकरी थोडी दारु सांडली म्हणून स्वत:च्या बायकोवर कसा चिडला ते बघा. वा वा फारच छान काम केलस तू, सैतान म्हणाला.

हे काहीच नाही. आता पुढे बघा मज्जा. तेथे दारु पिणारे हळू हळू मोठ्या आवाजात बोलू लागले. नंतर एकमेकांशी अद्वा,तद्वा बोलत भांडू लागले. एकमेकाच्या अंगावर धाऊन जाऊ लागले. आणि झिंगतच बाहेर पडू लागले. बाहेर पाऊस पडल्यामुळे चिखल झाला होता. तोल सांभाळता न आल्याने ते घसरुन चिखलात पडले व चिखलातच डुकरासारखे लोळू लागले. शेतकऱ्याने त्यांना बाहेर काढलेच होते. आता तो त्यांच्यावर ओरडू लागला. पण त्यांना कशाचीही शुध्द नव्हती. सैतान म्हणाला, हे लोक असे वेगवेगळ्या प्राण्याप्रमाणे वर्तन करत आहेत. तेव्हा त्या सगळ्या प्राण्याचे रक्त तू या व्होडकात

घातलेस काय? नाही नाही पशुप्रमाणे एखादा पुसटसा का होईना गुण माणसाच्या रक्तात असतोच. तोच आता यांच्या वर्तनातून दिसतो आहे. पण हे सगळ एवढ्या लवकर तु कस साध्य केलस? सैतानाने विचारले.

दूत गंभीरपणे म्हणाला, माणसाकडे जेव्हा गरजेपेक्षा अधिक पैसा नसतो तेव्हा माणसे सुखी असतात. जेव्हा त्यांच्याकडे अधिक पैसा येतो तेव्हा ती मौज मजा करण्याचे मार्ग शोधायला लागतात. आणि मग जेव्हा असे मार्ग ती शोधायला लागतात. तेव्हा साहजिकच ती हिस्त्रपशुप्रमाणे वागायला लागतात. हेच सत्य या शेतकऱ्याच्या उदाहरणावरुन मी सिध्द करुन दाखवल आहे.



## उत्साही राहण्यासाठी

आळस लपवण्यासाठी आपण अनेक प्रकारची कारणे देत असतो. सध्याच्या व्यस्त दिनचर्येत देखील व्यायामासाठी वेळ काढू शकतो. ऑफिसमध्ये राहून देखील करता येतील अशा काही व्यायामाबद्दल आपण माहिती घेऊया.

**वेस्ट स्ट्रेच एक्ससाईज** - वेस्ट स्ट्रेच एक्ससाईज खुर्चीवर बसून देखील करता येऊ शकते. दोन्ही हात कमरेवर ठेवा आणि शरीराचा वरचा भाग ताठ करुन कोणत्याही एका दिशेला वळवा. नंतर उलट्या बाजुने पुन्हा हीच क्रिया करा. परंतु यासाठी खुर्ची स्थिर हवी. चाकांच्या खुर्चीवर बसून जर तुम्ही हा व्यायाम करायला जाल तर खुर्ची हलल्याने तुम्हाला त्रास होईल.

**ॲक्टिव आर्म्स वर्कआऊट** - सर्वात आधी खुचीवर सरळ बसा. हात कोपऱ्यात दुमडून छातीजवळ घ्या. आणि दोन्ही तळवे जोडा. एका हाताने दुसऱ्या हातावर दाब देत मनगट वाकवा. दोन्ही हातांचा असा व्यायाम करा.

**बॅक टिस्ट एक्ससाईज** - बॅक टिस्ट एक्ससाईज करण्यासाठी खुर्चीवर सरळ बसा. आपला उजवा हात उजव्या कुल्ल्याजवळ ठेवा. तळवे पालथे घाला. आता पाठीमागच्या बाजुला वळा. दुसऱ्या बाजुने पुन्हा हीच कृती करा.

**स्ट्रॉग लेग्ज एक्ससाईज** - आपले पाय मजबुत असतील तर आयुष्यभर आपल्या शरीराचा बोजा सांभाळू शकतील. आरोग्याच्या दृष्टीकोनातून पाय चांगले असणे फार महत्वाचे आहे. पाय मजबुत राहण्यासाठी पायांना व्यायाम देणे महत्वाचे आहे. पायांना सरळ रेषेमध्ये वर उचला. गुडघे दुमडू नका. आता बसूनच पाय वर खाली करा. असे केल्याने पायांचे स्नायु मजबुत होतात. यानंतर पायांच्या बोटांवर उभे राहा आणि थोड्या वेळानंतर सरळ उभे राहा. दिवसातून अनेकदा हा व्यायाम करा. नियमित असा व्यायाम केल्याने पायांचे स्नायू मजबुत होतात.

**नो डबल चिन एक्ससाईज** - आपली हनुवटी वरच्या दिशेने उचला आणि तोंडाची उघडझाप करा. यामुळे हनुवटीच्या खालच्या स्नायुंवर ताण येईल. हा व्यायाम करताना तोंडाच्या स्नायुंचादेखील व्यायाम होतो.

**टेंशन रिलिज एक्ससाईज** - खांद्यावर ताण पडला की खांदेदुखी सुरु होते. यासाठी टेन्सन रिलिज एक्ससाईज करणे फायदेशीर होईल. खुर्चीवर ताठ बसा. खांदे वर उचलत कानापर्यंत न्या काही काळ या स्थितीत थांबा पुन्हा पुवर्वत व्हा. ही कृती वारंवार केल्याने खांद्याना आराम मिळतो. असे छोटे-छोटे व्यायाम करुन आपण उत्साही राहू शकतो.




- चारुलता कुलकर्णी
ठाणे (प.)

नेहमी कोलमडलेल्या मनाची परिणती आत्महत्येत होत असते. अशाप्रकारे मन कोलमडण्या मागची कारण वेगवेगळी असतात. अशा प्रकारच्या आत्महत्येच्या बबातीत तामिळनाडू अग्रेसर आहे. आत्महत्या करण्याच्या अनेक घटना महाराष्ट्रात गेल्या अनेक दिवसात मोठ्या प्रमाणात घडल्या. कॉलेजची तरुण मुल-मुली सुध्दा यात अग्रेसर आहेत. वडिलांनी सहलीस नकार दिला म्हणून, आईने आपल्या मित्राबद्दल चौकशी केली म्हणून, परिक्षेत पेपर चांगला गेला नाही म्हणून तर काही वेळा परिक्षेत नापास झाला-झाली म्हणून आत्महत्या. घरी अमुक एक वस्तू घेऊन दिली नाही म्हणून किवा मित्राबरोबर पार्टीला जाऊ दिले नाही म्हणून. एकतर्फी प्रेमामुळे प्रियकराने किंवा प्रेयसीने दुसऱ्याशी लग्न केले म्हणून आत्महत्या. सुनेने माहेराहून पैसे दागिने आणले नाही म्हणून छळ शेवट नवऱ्यामुलीची आत्महत्या. बापरे बाप साध्या-साध्या गोष्टीवरुन मुला-मुलींची आत्महत्या करण्याची प्रवृत्ती वाढत आहे. तारुण्याच्या उवरठ्याच्या जवळपास गेलेल्या मुला-मुलींनी असं का वागावं? हा मोठा गहन प्रश्न आहे. वृत्तपत्रे, टी.व्ही माध्यम व पोलिसांकडे गेलेल्या बातम्या सर्वापर्यंत पोहोचतात. पण वृत्तपत्रे माध्यम व पोलिस यांच्याकडे न पोहोचलेल्या अशा घटनांची संख्याही काही कमी नाही. अशा प्रकारे तरुण मुला-मुलींचं आत्महत्या करण्याचं प्रमाण वाढत आहे. आणि त्यामुळे मला वाटतं पालक वर्गामध्ये चिंता व नैराश्य फैलावत आहे. खरं तर पालकांचा व मुलांचा संबंध जन्मापासून असतो.

खरं तर जीवन अतिशय गतिमान झाल्यामुळे आपल्या मुलांकडे लक्ष देण्यास पालकांना वेळ मिळत नाही. तक्रार केली तरी पालकांना वेळ नसल्यामुळे ते दुर्लक्ष करतात. आपल्या मुला-मुलींबद्दल तक्रार केलेली त्यांना आवडत नाही. अशा प्रवृत्तीमुळे मुल बिथरतात. मुला-मुलीने कोणतं शिक्षण घ्या हे ठरविण्याचा अधिकार आजही मुलांना दिला जात नाही.

आवडीचं शिक्षण न मिळाल्यामुळे मुलांना महाविद्यालयात जायचा व शिक्षणाचा कंटाळा येतो. कारण आपल्या मुलाने अमुख शाखेतच जावे असा निर्णय पालक मुलांवर लादतात. मला डॉक्टर व्हायचे होते पण जमले नाही. आता मुलाने-मुलीने तरी व्हावे म्हणून प्रयत्न करतोय. असे अनेक पालक आपले भंगलेले स्वप्न मुलाने-मुलीने तरी पुर्ण करावे म्हणून धडपडतात. आपल्या स्वप्नाची पूर्तता करण्याची जिद्द क्षमता आपल्या मुलांमध्ये आहे की नाही हे पाहिले जात नाही. अशी तडजोड असह्य व्हायला लागली की मुले मार्ग बदलतात. हताश होतात. त्यांच्या भावनांचा कोंडमारा होतो व एक दिवस स्फोट होतो तो आत्महत्येचा. शिल्लक उरतो तो फक्त पश्चाताप.

दुसरी गोष्ट म्हणजे पालकांची प्रतिष्ठा ती वाढविण्याची जपण्याची जबाबदारी मुलांवरही असते. पालकांच्या प्रतिष्ठेचा परिघात जेवढे बसते तेवढेच करण्याचे स्वातंत्र्य मुलांना दिले जाते. हे आपल्याला शोभणारे नाही. असा रोज उपदेश केला जाते. मुलाला वेगळं भावविश्व नाही असच पालक गृहित धरतात. मुलगा-मुलगी जेव्हा आपलं वेगळं भावविश्व वास्तवात आणण्याचा प्रयत्न करतो तेव्हा मात्र ठिणगी उडते. त्यातूनच मुलांच्या स्वप्नावर अतिक्रमण होते. आणि मुले भावनाविवश होऊन आत्महत्या करतात.

पालकांनी अंधविश्वास टाकून मुलांकडे दुर्लक्ष करु नये अशी वातावरणामुळे विघडलेली मुले पालकांसमोर चांगले वागतात. त्यांचा अधिकाधिक विश्वास संपादन करतात. पण बाहेर मात्र वेगळ्या मार्गाने जाण्याचा प्रयत्न करतात. तेव्हा मात्र पालकांना धक्का बसतो. कधी कधी तो पेलण्या पलिकडचा असतो. त्याचा अर्थ आत्महत्या. काही वेळा मंदिरात देवाच्या दर्शनासाठी म्हणून बाहेर पडणारी मुलगी मंदिरातील देवाकडे न जाता बागेत बसलेल्या आपल्या जीवाच्या देवाकडे जाते. ह्यासाठी सुध्दा पालकांनी लक्ष द्यायला हवे. बागेत गेल्यावर तिच्यावर काय प्रसंग ओढवेल ह्याची कल्पना पालकांना असते का? आपण कामानिमित्त बाहेर पडल्यावर आपला मुलगा-मुलगी कॉलेजमध्ये जाते/जातो का? अभ्यास करतो का? यावाबतची थोडी जरी काळजी घेतली तरी सुध्दा पुरेशी असते. पुर्वी आपल्या मुलाची प्रगती पाहण्यासाठी पालक शाळा/कॉलेजमध्ये जायचे. शिक्षकांना भेटायचे पण अलिकडे पालकांना वेळ नाही. आपल्यावर कोणाचीच नजर नाही याची खात्री मुलांना पटते आणि अशी मुलं त्यांना वाटेल त्या गोष्टी बेधडक करतात. काही वेळा आपल्या मुलांबद्दलचे गुन्हे चुका पालकांपर्यंत पोहचतात. पंरतु ते माफ केले जातात किंवा दुर्लक्षित केले जातात. त्यातही काही पालक आपले वर्चस्व जपतात. आपला मुलगा-मुलगी असं करणारच नाही. असा अहंभाव प्रदर्शित करतात. अलिकडे पालकांच्या प्रेमाचा अविष्कार म्हणजे आपण जे काही मिळवितो ते सर्व मुलांसाठीच आहे. म्हणून त्याचा उपभोग त्यांनी कसाही घ्यावा. याचा परिणाम बऱ्याच वेळा वाईट होतो. कष्ट, श्रम, मूल्य न समजल्यामुळे मुले कसाही वापर करतात व वाईट मार्गी जातात. मुले बहकतात. आदराची व अंतराची भावना संपून जाते. आणि मग जेव्हा पालक विरोध करतात. तेव्हा मात्र तिव्र प्रतिक्रिया व्यक्त होते. आणि त्यामुळेच पालक किंवा मुलं ह्यापैकी एक बाजू आत्महत्या करते. स्वातंत्र्य ही एक संकल्पना आपण स्विकारली आहे. तिचा गैरवापर झाला की अनेक विकृतात विकृत गोष्टी घडतात. मुलांना स्वातंत्र्य देणे म्हणजे काय? ही गोष्ट आधी पालकांनी समजून घेतली पाहिजे. स्वातंत्र्याचा वापर मुले कोणत्या गोष्टीसाठी करीत आहे याचा विचार पालक करीत नाहीत. लक्ष ठेवत नाहीत. याची किंमत मात्र त्यांना चुकवावी लागते. आपण मुलांना किती स्वातंत्र्य द्यायचं ह्याच भान सुध्दा पालकांनी ठेवलं पाहिजे.

घरात आणि शाळेत मुलांच्या वैयक्तिक विकासासाठी त्यांचे भावविश्व ओळखण्यासाठी आवश्यक असणारे वातावरण उपलब्ध होत नाही. याच्या व्यतिरिक्त दूरदर्शनवरील मालिका पाहून मुले ही दृष्य मनात साठवितात अशा दृष्यात स्वत:ला पाहण्याचा प्रयत्न करतात. दूरदर्शन/माध्यमे ही मनोरंजनासाठी, ज्ञानासाठी न वापरता अशा हिडीस दृष्यासाठी वापरली तर ही भावी पिढी कुठल्या मार्गाने जाईल हे ठरविणे मात्र कठिण जाते. यामुळे सुध्दा मुलांचे मन आत्महत्येसाठी प्रवृत्त होते. आपल्या घरातील मुलं कोणत्या मानसिक प्रवृत्तित आहेत हे पाहणे आई-वडिल यांच कर्तव्य आहे. अशा तऱ्हेने प्रत्येक पालकाने स्वत:च्या मुलाची काळजी घेतली तर उद्याची पिढी बुध्दीमान, बलवान आणि आरोग्यमय होईल. आत्महत्येचे प्रमाण निश्चितच कमी होईल.






**मेष** - मेष राशीत म्हणजेच प्रथम स्थानी हर्शल, अकरावा नेपच्यून, नववा प्लुटो, चौथा राहू तर दशमात केतु आणि दशमाधिपती शनि भाग्यात वर्षभर राहिल. भाग्याधिपती गुरुमहाराज ऑक्टोबर पूर्वार्धापर्यंत विवाहस्थानी राहिल. त्यानंतर मृत्युस्थानी स्थिरावेल. मृत्युस्थानाधिपती मंगळ प्रदीर्घ कालावधीकरीता मे ते ऑक्टोबर दरम्यान उच्चीचा कर्मस्थानी मुक्काम करील. आठव्या शनिची छोटी परंतु अतिशय त्रासदायक साडेसती संपल्यामुळे बऱ्याच प्रमाणावर त्रास कमी होईल. तरीही काही व्यक्तींना आर्थिक अडचणी भेडसावतील. नोकरी धंद्यात, बाधा, मोठ्या लोकांकडून त्रास, नविन शत्रु निर्माण, धार्मिक गोष्टी करण्यात अडचणी, नको त्या कामात भाग घ्यावा लागणे. दुर्घटना, बंधु-भगिनींकडून त्रास, बहुतेक कामात अपयश अशा अशुभ फलांचा वर्षाव होईल. भाग्याधिपती गुरुमहाराज विवाहस्थानी विराजमान झाल्यामुळे विवाह कार्याकरीता अनुकूल काळ आहे. अडलेल्यांचे विवाह मार्गी लागतील. वैवाहिक जीवनातील ग्रहण संपुष्टात येईल. काहींना भाग्याने जीवनसाथी लाभेल. तर काहींना जीवनसाथीमुळे भाग्योदय होईल. बहुतेकांची प्रेम विवाहाची इच्छा पुर्ण होऊ शकेल. नोव्हें, जाने, एप्रिल, मे, ऑगस्ट, सप्टें. या महिन्यात प्रेम विवाहाचा योग साकारता येईल. संतानसौख्य लाभेल. विद्यार्थ्यांना विद्याभ्यासात, कलाकौशल्यात, मैदानी खेळात उत्तम प्रगती करता येईल. आजारपण आटोक्यात येईल. चौथ्या राहुमुळे राहत्या घरात बाधा, वडीलधारी व्यक्तीचा मृत्यू, जागा जमिनीच्या व्यवहारात अडचणी निर्माण होतील. श्री कालसर्प शांती आराधना श्रीक्षेत्र त्र्यंबकेश्वर येथे करावी. राहुमंत्राची समंत्र आराधना करावी. पुर्वजांच्या स्मरणार्थ गरजु/योग्य व्यक्तीस वा संस्थेस यथाशक्ती मदत करावी.

**वृषभ** - बारावा हर्शल, दहावा नेपच्यून, आठवा प्लुटो, तिसरा राहु, भाग्यात केतु, भाग्याधिपती कर्मेश, शनि आठवा वर्षभर राहील. आठव्या स्थानाचा अधिपती गुरु ऑक्टोबर पूर्वार्धापर्यंत

रोगस्थानी राहिल. नंतर विवाहस्थानी येईल. विवाहस्थानाधिपती मंगळ प्रदीर्घ काळाकरीता भाग्यस्थानी उच्चीचा भ्रमण करील. मृत्युस्थानातील आठवा शनि अतिशय अशुभ फळे देणारा/दर्शविणारा आहे. काहींना कोर्ट कचेरीत पराजयाला सामोरे जावे लागेल. आणि तुरुंगवासाची पाळी येऊ शकते. काहींना आजारपणामुळे हॉस्पीटलमध्ये अडकून राहावे लागेल. घरामध्ये जीवनसाथीला/संततीला काहींना काही पीडा निर्माण होईल. मानसिक ताण-तणाव वाढविणाऱ्या घटना घडतील. पैशाच्या बाबतीत अस्थिरपणा, फसवणुक, कर्जबाजारीपणा अशा आर्थिक विवंचना वाढविणाऱ्या प्रसंगांना सामोरे जावे लागेल. बहुतेक कार्यात अपयश आल्यामुळे आयुष्यातील आनंद निघून जाईल. जीवन जगण्यातला रस निघून जाईल. काहींना मृत्युसम पीडा/आत्महत्या करावीशी वाटेल. परंतु शत्रुस्थानी गुरु आणि भाग्यातील मंगळ केतु यामुळे संकटातून बाहेर पडण्याचा मार्ग मिळू शकेल. विवाहकार्यासाठी बेफिकीरपणा टाळल्यास योग्यवेळी मदत मिळु शकेल. विवाहकार्यासाठी मध्यम योग आहेत. प्रवास सांभाळुन करावा. आजारपणावर वेळीच योग्य इलाज केल्यास पुढील अनर्थ टाळता येईल. मैत्रीमध्ये अति विश्वासून राहू नका. विद्यार्थ्यांनी तसेच इतरांनी कोणत्याही प्रकारचा बेकायदेशिर/अनैतिक मार्ग अवलंबू नये. श्री शनिदेवाची आराधना श्रध्दापूर्वक करावी. गरजु/निराधार वृध्दांचा मान राखून यथाशक्ती मदत करावी. श्रीशनियंत्राची समंत्र आराधना करावी. प्रेमात आततायीपणे निर्णय घेऊ नका. सामाजिक कार्य सोडू नका. राजकारण कालांतराणे करता येईल. हाही काळ निघून जाईल हे लक्षात ठेवावे.

**मिथुन** - अकरावा हर्शल, नववा नेपच्यून, सातवा प्लुटो, दुसरा राहू, अष्टमात केतु आणि अष्टमाधिपती शनिदेव विवाहस्थानी वर्षभर राहतील. विवाहस्थानाधिपती गुरुमहाराज ऑक्टोबर पूर्वार्धापर्यंत प्रेमस्थानी राहील. नंतर रोगस्थानी प्रवेश करील. रोगस्थानाधिपती मंगळ मृत्यूस्थानी हैदोस घालील. प्रेम करणाऱ्यांसाठी उत्तम काळ राहिल. अनेकांच्या इच्छा प्रत्यक्षात साकारल्या जातील. प्रेम विवाह करता येईल. अतिचिकित्सकपणा तसेच द्विधा मानसिक स्थिती टाळल्यास परीक्षेतसुध्दा सुयश मिळविता येईल. परंतु अतिबुध्दीमत्ता काहीवेळा घातक ठरते. आरोग्याची काळजी घेणे जरुरीचे आहे. विशेषत: मे ते ऑक्टोबर दरम्यान प्रकृतीची तक्रार वाढू शकते. आजारपणात भर पडू शकते. शत्रुकडून काहीवेळा जादू होण्याची शक्यता आहे. त्यामुळे रोग आटोक्यात आणणे काही वेळा कठीण होईल. दव्याबरोबर दुव्याची आवश्यकता राहिल. श्रध्दा असल्यास वैद्यकीय इलाजाबरोबर दैवी उपाय करावेत. वैवाहिक जीवनात अतिव्यवहारीपणा टाळावा. भावनांचा विचार केल्यास दुरावा संपुष्टात येईल. अन्यथा हळूहळू घटस्फोटासारखी स्फोटक परिस्थिती निर्माण होईल. विवाहकार्यासाठी अनुकूल काळ राहील. दूरचे प्रवास योग येतील. विदेशवारी साधावी. संतान प्राप्तीसाठी केलेले प्रयत्न कारणा लागतील. नोकरी धंद्यात यश मिळविता येईल. राजकिय क्षेत्रात पुढील येणारा काळ मनाविरुध्द असणार आहे. त्यासाठी आताचा प्राप्तकाळ योग्य रीतीने साधावा.

शुभाशुभ काल-अनुकुल दिनांक - डिसें. १४,२५, जाने. २,२०,२९, मार्च ६,१६,२५, मे ९,१८,२७, जुलै ३,१२,२१,३०, सप्टें. ५,१४,२३.

प्रतिकुल दिनांक - फेब्रु. ५,१४,२३, एप्रिल ९,१८,२७, जून ३,१२,२१,३०, ऑगस्ट ६,१५,२४. श्री मंगळ, श्रीशनि आणि श्री केतु यंत्रांची तज्ज्ञ व्यक्तीकडून समंत्र आराधना समजून घ्यावी. आणि करावी. गोरगरीबांना यथाशक्ती श्रध्दापूर्वक दानधर्म करावा.

**कर्क** - दहावा हर्शल, आठवा नेपच्यून, सहावा प्लुटो, अकरावा राहू विवाहस्थानी केतु आणि विवाहस्थानाधिपती शनिदेव शत्रुस्थानी वर्षभर राहतील. शत्रुस्थानाधिपती गुरुमहाराज ऑक्टोबर पूर्वार्धापर्यंत सुखस्थानी भ्रमण करील. त्यानंतर पंचमात प्रवेश करील. पंचमाधिपती योगकारक मंगळ उच्चीचा विवाहस्तानी मे ते ऑक्टोबर दरम्यान स्थिरावेल. शत्रुस्थानातील गोचरीचा शनि अतिशय फलदायी असल्यामुळे अनेकांच्या आर्थिक समस्या दूर होतील. आतापर्यंत झालेले कर्ज जास्तीत-जास्त प्रमाणावर फेडता येईल. त्याप्रमाणे इतरांना दिलेले उसने/उधारी तसेच कर्ज देखील वसूल करता येईल. आतापर्यंत निर्माण झालेले वेगवेगळे आजार आटोक्यात येतील. काही दुर्धर रोगांवर उपाय सापडतील. त्यासाठी पथ्यपाणी व्यवस्थित पाळले पाहिजेत. आतापर्यंत निष्कारण निर्माण झालेले शत्रुदेखील हळूहळू नष्ट होतील. काही जिवलग मित्रांमध्ये रुपांतरीत होतील. आतापर्यंत ज्या-ज्या मित्रांनी मदत नाकारली होती ते सर्वजण स्वत:हून मदत करतील. आतापर्यंत ज्या-ज्या कार्यात व कामात अपयश काही कारणास्तव वा कारणाशिवाय आले त्या-त्या सर्व कामांमध्ये बहुतेकांना यश प्राप्त होईल. असा सहाव्या शनिचा उदारपणा हलगर्जीपणा न करता तसेच कोणत्याही प्रकारची चूक न करता शक्य तितका जास्तीत-जास्त प्रमाणावर साधून घ्यावा. भविष्यकाळात पुन्हा असा काळ येण्यास बरीच वर्षे लागतील. चौथ्या गुरुचा तसेच विवाहस्थानी केतुचा आणि लग्नस्थानी राहुचा कालसर्पयोगाचा त्रास काही प्रमाणात जाणवेल. विवाह टिकून राहण्यासाठी श्रीकालसर्प विधी करावा. श्री गुरुचरित्राचे पारायण श्रध्दापुर्वक करावे. त्याचप्रमाणे श्रीगुरुची आराधना करावी. विवाहकार्यात तसेच वैवाहिक जीवनात यश/स्थिरता निर्माण होईल. परीक्षेत उत्तम गुण मिळतील. साहित्यकला क्षेत्रात स्वत:च्या संवेदनशील स्वभावाचा ठसा उमटवू शकाल.

**सिंह** - नववा हर्शल, सातवा नेपच्यून, पाचवा प्लुटो, बारावा राहू, रोगस्थानी केतू आणि रोगस्थानाधिपती शनिदेव पंचमात वर्षभर राहतील. पंचमेश गुरुमहाराज पराक्रमात ऑक्टोबर पूर्वार्धापर्यंत राहील. नंतर चतुर्थस्थानी येईल. चतुर्थस्थानाधिपती योगकारक मंगळ उच्चीचा शस्त्रुस्थानी प्रदीर्घ काळाकरीता भ्रमण करील. सिंह राशीच्या

व्यक्तीसाठी शुभाशुभ काळ अनुकूल दिनांक : डिसें. १,१०,१९,२८, जाने. ६,१५,२४, फेब्रु. ३,१२,२१, मार्च २,११,२०२३, एप्रिल ७,१६,२५, मे. ५,१४,२३, जून १,१०,१९,२८, जुलै ७,१६,२५, ऑगस्ट ४,१३,२२, सप्टें. ९,१८,२७, ऑक्टो.६,१५,२४,

प्रतिकुल दिनांक : डिसें. ८,१७,२६, जाने, ४,१३,१८,१९, फेब्रु. ९,१८,२७, मार्च ९,१८,२७, एप्रिल ५,१४,२३, मे २,११,२०,२९, जून ८,१७,२६, जुलै ५,१४,२३, ऑगस्ट २,११,१९,२९, सप्टे. ७,१६,२५ ऑक्टो. ४,१३,२२,३१.

वैवाहिक जीवनात निर्माण झालेली स्फोटक परिस्थिती गुरुदृष्टीमुळे निवळेल. गैरसमज दूर होतील. तापट, मानी, हट्टी, अहंकारी स्वभाव दूर ठेवल्यावर बऱ्याच प्रमाणावर मन :शांती लाभेल. प्रेमविवाहा करीता अनुकूल काळ येईल. मार्च, एप्रिल, मे महिन्यात बलवान योग पंचमातील शनि अशुभ काळ दर्शवितो. लॉटरी, सट्टा, रेस सारख्या प्रकाराने आर्थिक स्थिती बदलेल. स्वत :च्या मुलांना त्रास संभवितो. शैक्षणिक क्षेत्रात अडचणी येतील. मैत्रीच्या नात्यात बदल होईल. घरातील वातावरणदेखील बदलल्यासारखे वाटेल. बऱ्याच आजारी व्यक्तीना बाहेरील बाधा झाल्यासारखे वाटेल. बाराव्या राहुमुळे खर्चाचे प्रमाण अचानक वाढेल. नोकरी धंद्यात नवीन जबाबदाऱ्या सांभाळून हाताळा. अध्यात्मिक क्षेत्रात अहंकार चालत नाही. राजकारणात नेहमीच दांडगाई चालतेच असे नाही. नाहीतर तोंडावर गोड बोलणारी आणि पाठीत खंजिर खुपसणारी माणसे आपला गैरफायदा घेतील. या वर्षी मध्यम शुभफल प्राप्त होईल. वृध्दाश्रमास यथाशक्ती दानधर्म जग जाहीर करु नये. अडलेल्यांना निस्वार्थ सहाय्य करावे.

**कन्या** - अष्टमात हर्शल,षष्ठात नेपच्युन, चतुर्थात प्लुटो, एकादशात राहू पंचमात केतू आणि पंचमाधिपती शनिमहाराज चतुर्थात वर्षभर राहतील. चतुर्थाधिपती गुरुदेव द्वितीयस्थानी ऑक्टोबर पूर्वार्धापर्यंत राहतील. त्यानंतर तृतीयस्थानी स्थिरावतील. तृतीयस्थानाधिपती मंगळ उच्चीचा पंचमात प्रदीर्घ काळाकरीता भ्रमण करील. कन्या राशीच्या व्यक्तीसाठी शुभाशुभ काळ.

अनुकूल दिनांक : डिसें. ३,१२,२१,३०, जाने. ८,१८,२७, फेब्रु. ५,१४,२३, मार्च ४,१३,२२,३१, एप्रिल १०,१९,२८, मे ७,१६,२५ जून ४,१३,२२,३०, जुलै १०,१९,२८, ऑगस्ट ६,१५,२४, सप्टे २,११,२०,२९, ऑक्टो ९,१८,२७.

प्रतिकुल दिनांक : डिसें. १,१०,१९,२८, जाने.६,१५,२५, फेब्रु. ३,१२,२१, मार्च २,११,२०,२९, एप्रिल ७,१६,२५, मे ५,१४,२३, जुन २,११,१९,२८, जुलै ८,१७,२६, ऑगस्ट ४,१३,२२,३१, सप्टें. ९,१८,२७,ऑक्टो. ७,१६,२५.

गोचरीचा चौथा शनि अशुभ फले दर्शवितो. काहींना मातृवियोग त्रास होईल. नोकरी धंद्यात अडीअडची वाढतील. प्रमोशन वा पगारवाढ मिळण्यात दिरंगाई. जागाजमिनीचे वाद/व्यवहारात अडचणी निर्माण होतील. घरामध्ये मृत्यू होण्याचा योग. काहींचा अपमान होईल. धनमान अस्थिर होईल. या ना त्या कारणाने सुखाचा नाश. सुखभोगात अडथळे होईल. परंतु धनस्थानी गुरुमहाराज असल्यामुळे अर्थिक समस्येवर काही ना काही तोडगा काढता येईल. विद्यार्थ्यांनी श्रीगणपती अथर्वशीर्ष वाचन करावे. म्हणजे अभ्यासाचेवेळी तसेच परिक्षेत अस्थिर मनस्थिती राहणार नाही. एकाग्रतेने यश संपादन करता येईल. वैवाहिक जीवनात सामंजस्याने वागल्यास तंटे उद्‌भवणार नाहीत. विवाहकार्यास मध्यम अनुकूल काळ असला तरी प्रेमविवाहास प्रतिकुल राहील. मानसिक अशांती बहुतेक रोगांचे मूळ असते. राजकारणात डावपेच लागू पडले तरी स्वत :साठी कितपत फायदा होतो हे पाहणे आवश्यक आहे. श्री शनियंत्राह्णी समंत्र आराधना करावी. श्री शनिमहात्म्य वाचावे. तेलकट वस्तुंचे दान करावे.

**तुळ** - सातवा हर्शल, पाचवा नेपच्यून, तिसरा प्लुटो, दहावा राहू, चतुर्थात केतु आणि चतुर्थेश योगकारक शनिमहाराज तृतीय स्थानी वर्षभर राहतील. तृतीयेश गुरुदेव प्रथमस्थानी ऑक्टोबर पूर्वार्धापर्यंत राहतील. त्यानंतर द्वितियस्थानी प्रवेश करतील. द्वितियस्थानाधिपती मंगळ उच्चीचा चतुर्थातून दीर्घ काळाकरीता भ्रमण करील.

तुळ राशीच्या व्यक्तींसाठी शुभाशुभ काळ

अनुकूल दिनांक : डिसें. ५,१४,२४, जाने. २,११,२०,२९, फेब्रु. ७,१६,२५, मार्च ६,१५,२४, एप्रिल ३,१२,२१,३०, मे ९,१८,२७ जून ६,१५,२४, जुलै ३,१२,२१,३०, ऑगस्ट ८,१७,२६, सप्टे ५,१४,२३, ऑक्टो २,११,२०,२९.

प्रतिकुल दिनांक : डिसें. ३,१२,२१,३०, जाने.८,१८,२७, फेब्रु. ५,१४,२३, मार्च ४,१३,२२,३१, एप्रिल १,१०,१९,२८, मे ७,१६,२५, जुन ३,१२,२१,३०, जुलै १,१०,१९,२८, ऑगस्ट ६,१५,२४, सप्टें. २,११,२०,२९,ऑक्टो. ९,१८,२७.

साडेसाती संपुर्णपणे सरल्यामुळे केंद्राधिपती तसेच कोनाधिपती योगकारक शनिमहाराज पराक्रमात स्थिरावले असून तृतीयात स्थानांतरण हे अतिशय शुभ फलदायी असते. बहुतेकांच्या आयुष्यातील काळरात्र सरुन नवीन आनंददायी पहाट बऱ्याच कालावधीनंतर होत असल्याचे अनुभवास येईल. सर्व प्रकारच्या कार्यात यश संपादन करता येईल. गैरसमज दूर होतील. कोर्टातील निर्णय मनासारखे मानासिक स्थिरता/ शांती काहींना मान प्रतिष्ठा अधिकार प्राप्ती. एकंदरीत सर्व प्रकारचे कल्याण होण्याचा काळ बहुतेकांच्या वाट्याला येईल. चौथा केतू आणि मंगळाचा अपवाद सोडल्यास जगी सर्व सुखी आपणच असल्याचे वाटेल. आईला त्रास/ मातृवियोग संभवितो. राहत्या घरातील अदृश्य वाईट प्रभावांचा परिणाम अस्वस्थ करील. राजकीय क्षेत्रात तसेच सामाजिक कार्यात अचानक उच्च पद प्राप्त मिळविता येईल. विवाह कार्याकरिता अनुकूल काळ. वैवाहिक जीवनातील कटुता संपुष्टात येईल. अति चंचळपणामुळे गोत्यात येऊ शकता. शिक्षणात प्रगती/ परदेशगमनाची संधी. श्रीमंगळ आणि श्री

केतू यांची उपासना/आराधना दुग्धशर्करा योग करील.

**वृश्चिक** - सहावा हर्शल, चौता नेपच्युन, दुसरा प्लुटो, नववा राहू, तृतीयस्थानी केतु आणि तृतीयस्थानाधिपती शनि, द्वितीयस्थानी वर्षभर राहतील. द्वितियस्थानाधिपती गुरु ऑक्टोर पूर्वाधीपर्यंत बाराव्यास्थानी राहिल. त्यानंतर प्रथमात स्थिरावतील. प्रथमेश मंगळ पराक्रमात उच्चीचा दीर्घ कालावधीकरीता भ्रमण करील. वृश्चिक राशीच्या व्यक्तींसाठी शुभाशुभ काळ

अनुकूल दिनांक : डिसें. ८,१७,२६, जाने. ४,१३,२२,३१, फेब्रु. १,९,१८,२७, मार्च ९,१८,२७, एप्रिल ५,१४,२३, मे ३,१२,२१,३० जून ८,१७२६, जुलै ५,१४,२३, ऑगस्ट २,११,२०,२९, सप्टे ७,१६,२५, ऑक्टो ४,१३,२२,३१.

प्रतिकुल दिनांक : डिसें. ६,१५,२४, जाने.२,११,२०,२९, फेब्रु. ७,१६,२५, मार्च ६,१५,२४, एप्रिल ३,१२,२१,३०, मे ९,१८,२७, जुन ६,१५,२४, जुलै ३,१२,२१,३०, ऑगस्ट ८,१७,२६, सप्टें. ५,१४,२६,ऑक्टो.२,११,२०,२९.

धनस्थानातील साडेसातीचा शेवटचा भाग दर्शविणारा शनि अतिशय अशुभ फले दर्शवितो. धनस्थानातील शनि धनहानी करवितो. आर्थिक समस्या निर्माण होतात. राहत्या जागेतील त्रास दर्शवितो. काहींना अधिकार पदावरुन पायउतार व्हावे लागेल. न्यायालयीन कामात यश मिळत नाही. नोकरीधंद्यात अस्थिरता होईल. शैक्षणिक क्षेत्रात काही ना काही अडचणी निघतील. आजारी व्यक्तींना रोगनिवारण होत नसल्याने जगण्याचा कंटाळा येईल. पदोपदी अपमानित झाल्यासारखे वाटेल. अशा अनेक संकटांचा वर्षाव काही जणांवर बऱ्याच प्रमाणात होईल. साडेसातीत भर टाकणारा प्रकार म्हणजे गुरुदेखील बारावा. दुष्काळात तेरावा महिना असल्यासरखा. त्यामुळे सहनशीलतेचा कडेलोट होतोय की काय असे वाटेल. पराक्रमातील केतु मंगळ आणि भाग्यातील राहू यामुळे काहींना काही प्रमाणात संकटातून मुक्त होण्याचा मार्ग सापडेल. त्यासाठी श्रीगुरुची आणि श्री शनिची श्रध्दापूर्वक आराधना करणे जरुरीचे यंत्राची समंत्र उपासना, दानधर्म, नियम पालन अशा काही उपायांनी त्रासाची तीव्रता कमी होऊ शकेल. त्यामुळे स्थानलाभ, धनवृध्दी, ऋणलाभ व्यवसायात सफलता, वादविवादात यश अशा गोष्टी घडू शकतील. मात्र सर्वांनी हे वर्ष अतिशय सांभाळून घालविले पाहिजे. अशी सद्याची गोचर ग्रहस्थिती आहे.

**धनु** - पंचमात हर्शल, तृतीयात नेपच्यून, प्रथमात प्लुटो, अष्टमात राहू द्वितियात केतु आणि द्वितियेश शनिमहाराज प्रथमात वर्षभर राहतील. प्रथमेश गुरुदेव ऑक्टोबर पूर्वाधीपर्यंत अकराव्यास्थानी राहील. नंतर बाराव्यास्थानी प्रवेश करतील. बाराव्यास्थानाचा अधिपती मंगळ उच्चीचा धनस्थानी दीर्घकाकरीता स्थिरावेल. धनुराशीच्या व्यक्तीसाठी शुभाशुभ काळ.

अनुकूल दिनांक : डिसें. १,१०,१९,२८, जाने. ६,१६,२५, फेब्रु. ३,१२,२१, मार्च २,११,२०,२९, एप्रिल ७,१६,२५, मे ४,१४,२२,३१ जून १,१०,१९,२९, जुलै ८,१७,२६, ऑगस्ट ४,१३,२२,३१, सप्टे ९,१८,२३, ऑक्टो ७,१६,२५.

प्रतिकुल दिनांक : डिसें. ८,१७,२६, जाने.४,१३,२२,३१, फेब्रु. १,१०,१९,२८, मार्च ९,१८,२७, एप्रिल ५,१४,२३, मे २,११,२०,२९, जुन ८,१७,२६, जुलै ५,१४,२३, ऑगस्ट २,११,२०,२९, सप्टें. ७,१६,२५,ऑक्टो.४,१३,२२,३१.

मध्यावधी साडेसतीचा जन्मस्थ शनिमहाराज अतिशय अशुभ फले दर्शवितो. अशी संकटे येणार की ज्यामुळे आत्मविश्वास उरणार नाही. नोकरीधंद्यात अनपेक्षितपणे मनाविरुध्द घटना घडतील. आर्थिक अंदाजपत्रक कोलमडून पडेल. अचानक खर्च करावा लागेल. आतापर्यंत साठविलेला पैसा कधीच संपून गेला अशी परिस्थिती येईल. काहींना कर्जबाजारी व्हावे लागेल. आपलीच लोकं आपल्यापासून या ना त्या कारणाने दुरावली जातील. आजारपणात मरण यातना भोगतोय की काय असे वाटेल. विद्याभ्यासात संभ्रमित अवस्था होईल. इकडे-तिकडे पळावे लागेल. परंतु लग्नेश गुरुमहाराज लाभात असल्यामुळे निदान ऑक्टोबर पूर्वार्धात तरी साडेसातीच्या त्रासाची तीव्रता काहीशी कमी राहील. त्यामुळे बऱ्याच प्रमाणावर मनासारखे करता येईल. त्याच बरोबर मित्र मंगळ उच्चीचा धनस्थानी आल्यामुळे धनमान नियंत्रणात ठेवता येईल. परंतु अनावश्यक खर्चावर नियंत्रण ठेवणे आवश्यक. आठव्या राहूचा आणि जन्मस्थ साडेसातीचा शनि यांची योग्य ती आराधना केल्यास निदान हे वर्ष थोडेफार व्यवस्थित जाईल. त्यासाठी शनिराहूची सयंत्र मंत्र साधना तज्ज्ञ व्यक्तीच्या मार्गदर्शनाने करावी. त्याचप्रमाणे अमावस्येला एक चांगला नारळ वाहत्या पाण्यात अर्पण करावा.

**मकर** - चौथा हर्शल, दुसरा नेपच्यून, बारावा प्लुटो, सातवा राहू, प्रथमात केतु आणि प्रथमेश शनिमहाराज बाराव्यास्थानी वर्षभर राहतील. बाराव्या स्थानाचा मालक गुरुदेव ऑक्टोबर पूर्वाधीपर्यंत दशमात राहिल. नंतर अकराव्यास्थानी प्रवेश करील. अकराव्या स्थानाचा स्वामी मंगळ हा प्रथमस्थानी दीर्घ काळाकरीता भ्रमण करील.

अनुकूल दिनांक : डिसें. ३,१२,२१,३०, जाने. ८,१८,२८, फेब्रु. ५,१४,२३, मार्च ४,१३,२२,३१, एप्रिल १,१०,१९,२८, मे ७,१६,२५ जून ३,१२,२१,३०, जुलै १,१०,१९,२८, ऑगस्ट ६,१५,२४, सप्टे २,११,२०,२९, ऑक्टो ९,१८,२७.

साडेसातीची सुरुवात झाल्यामुळे वेगवेगळ्या संकटांना तोंड द्यावे लागेल. जीवनसाथी वियोग/भांडण संभवितो. कोर्टकचेरीच्या कामात अपयश आल्यामुळे निराश्या वाढेल. काहींना तुरुंगवास भोगावा लागेल. राहते घर सोडून दूर जाण्याचा प्रसंग येईल. नोकरीधंद्यात अचानक बदलीचे योग येतील. अथवा डच्चू मिळण्याची शक्यता राहिल. सुरु असलेला धंदा काही कारणाने बंद करावा लागेल वा

कमी होईल. या ना त्या कारणाने मैत्रीदेखील शत्रुमध्ये रुपांतरीत होऊ शकेल. नको तिथे उगाचच पैसा खर्च करावा लागेल. एकंदरीत अधोगतीसारखी परिस्थिती निर्माण होईल. परंतु केंद्रातील गुरुकृपेमुळे त्यावर काहीना काही उपाय सापडेल. तसेच शनि हा राशीस्थानी असल्यामुळे साडेसातीची तीव्रता बऱ्याच प्रमाणावर कमी होऊ शकेल. त्याकरीता शनिदेवाची आराधना करावी. आणि काही नियमांचे पालन करावे. साडेसातीच्या काळात निष्कारण असत्य बोलू नये. अनैतिक तसेच बेकायदेशीर कृत्ये टाळावीत. तसेच अशा कृत्यामध्ये कोणत्याही प्रकारे सहभागी होऊ नये. कोणत्याही प्रकारच्या पैजा लावू नये. अडलेल्यांच्या अंत्यविधीत मदत करावी. वृध्दांचा अपमान करु नये. कोणाचीही चेष्टा/मस्करी करु नये. श्रीशनिमंत्राची समंत्र आराधना करावी. ज्यांच्या मूळ जन्मकुंडलीत विवाह आणि लग्न स्थानात राहू/केतु असेल त्यांना घटस्फोटासारखी स्फोटक परिस्थिती प्राप्त ह ोईल. त्यांनी कालसर्प शांती आराधना करावी. श्रीशंकराची अखंड उपासना करावी. विद्यार्थ्यांना प्रगतीसाधता येईल. प्रेमात आणाभाका सांभाळून कराव्यात. युध्दात/भांडणात यश मिळेल.

**कुंभ** - तृतीयात हर्शल, पंचमात नेपच्युन, एकादशात प्लुटो, षष्टात राहू, द्वादशात केतू आणि द्वादशाधिपती शनिमहाराज लाभात वर्षभर राहिल. लाभाधिपती गुरुदेव ऑक्टोबर पूर्वार्धापर्यंत भाग्यात राहिल. नंतर दशमात स्थिरावेल. दशमाधिपती मंगळ दीर्घकाळ बारावा राहिल. कुंभ राशीच्या व्यक्तींसाठी शुभाशुभ काळ.

अनुकूल दिनांक : डिसें. ५,१४,२४, जाने. २,१०,२०,२९, फेब्रु. ७,१६,२५, मार्च ६,१५,२४, एप्रिल ३,१२,२१,३०, मे ९,१८,२७ जून ६,१५,२४, जुलै ३,१२,२१,३०, ऑगस्ट ८,१७,२६, सप्टे. ५,१४,२३, ऑक्टो. २,११,२०,२९.

प्रतिकुल दिनांक : डिसें. ३,१२,२१,३०, जाने.८,१८,२७, फेब्रु. ५,१४,२३, मार्च ४,१३,२२,३१, एप्रिल १,१०,१९,२८, मे ७,१६,२५, जुन ३,१२,२१,३०, जुलै १,१०,१९, ऑगस्ट ६,१५,२४, सप्टें. २,१३,२०,२९,ऑक्टो.३,१८,२७.

बाराव्या केतुचा त्रासदायक अपवाद वगळल्यास लाभातील शनि आणि भाग्यातील गुरुचा त्रिकोदश योग हा अतिशय शुभ लाभ योग कुंभ व्यक्तींच्या जीवनात अतिशय उत्तम परिवर्तन आणल्याशिवाय राहणार नाही. त्यासाठी मूळ जन्मपत्रिकेत शनि आणि गुरु शुभस्थितीत राहणार नाही. त्यासाठी मुळ जन्मपत्रिकेत शनि आणि गुरु शुभस्थितीत असायला पाहिजे. लाभस्थानातील गोचरीचा शनि अतिशय उत्तम फलदायी त्यामुळे काहींना लॉटरी, रेस, सट्टा अशा मार्गाने अचानक धनस्थानाची शक्यता राहिल. इतर मार्गातदेखील काहींना काही लाभ होईल. मान-सन्मान मिळविण्याचा योग येईल. आतापर्यंत केलेले संशोधनात्मक कार्य नावाजले जाईल. शैक्षणिक बाबतीत अनपेक्षित निकाल आश्चर्याचा धक्का देणारा ठरावा. काहींना स्कॉलरशिप, पुरस्कार मिळविता येईल. नोकरी धंद्यातील बहुतेक अडीअडचणी दूर करता येतील. नविन नोकरी, प्रमोशन, पगारवाढ इत्यादी मनासारखे घडेल. काहींना परदेशगमनाची संधी मिळेल. नविन वास्तुलाभ पदरात पडेल. भाग्योदयाचा काळ आहे. मनातल्या संशयीपणा, तापटपणा तसेच सुडबुध्दी यासारख्या गोष्टींना दूर करुन आपण आपली प्रगती वेळेवर साधून घेणे शहाणपणाचे ठरेल. कारण असा उत्तम काळ काळ आपल्या जीवनात पुन्हा लवकर बेळेवर येईल असे नाही. श्रीकेतुची आराधना यंत्र पुजेसह करावी. काळ्या उपयुक्त वस्तुंचे दान योग्य गरजू व्यक्तींना निरपेक्ष बुध्दीने यथाशक्ती करावे. भविष्यकाळाची तरतूद वर्तमानकाळात करुन ठेवावी. म्हणजे नंतर पश्चाताप करण्याची पाळी येणार नाही.

**मीन** - दुसरा हर्शल, बारावा नेपच्युन, दहावा प्लुटो, पाचवा राहू, अकरावा केतु आणि अकराव्या स्थानाचा स्वामी शनि. दहाव्या स्थानात वर्षभर राहतील. दहाव्या स्थानाचा अधिपती गुरुमहाराज ऑक्टोबर पूर्वार्धापर्यंत आठव्या स्थानात नंतर दीर्घ काळाकरिता भ्रमण करील. मीन राशीच्या व्यक्तींसाठी शुभाशुभ काळ.

अनुकूल दिनांक : डिसें. ८,१७,२६, जाने. ४,१३,२२,३१, फेब्रु. १,९,१८,२७, मार्च ९,१८,२७, एप्रिल ५,१४,२३, मे ३,१२,२१,३०, जून ८,१७,२६, जुलै ५,१४,२३, ऑगस्ट २,११,२०,२९, सप्टे. ७,१६,२५, ऑक्टो. ४,१३,२२,३१.

प्रतिकुल दिनांक : डिसें. ६,१५,२४, जाने.२,१३,२०,२९, फेब्रु. ७,१६,२५, मार्च ६,१५,२४, एप्रिल ३,१२,२१,३०, मे ९,१८,२७, जुन ६,१५,२४, जुलै ३,१२,२१,३०, ऑगस्ट ८,१७,२६, सप्टें. ५,१८,२३,ऑक्टो.२,११,२०,२९.

पूर्वार्धात संमिश्र काळ राहिल. उत्तरार्धात उत्तम प्रगती साधता येईल. अति चांगुलपणा तसेच द्विधा मानसिक स्थिती. अहंकार युक्त बोलणे टाळल्यास काही संकटे उद्‌भवणारच नाहीत. काहींच्या नोकरी धंद्यात त्रास निर्माण होईल. धंदा बंद होण्याची नोकरी सुटण्याची भिती राहिल. आजारी व्यक्तींच्या रोगात भर पडणार नाही याची सावधगिरी बाळगावी. तसेच आजाराचे अचूक निदान वेळेवर होण्यासाठी दैवी उपायांची योजना करावी. जवळच्या नातेवाईकांशी कोणत्याही प्रकारे उगीच भांडण करु नये. दुरावण्याची शक्यता राहिल. काहींना आर्थिक हानी सोसावी लागेल. विवाह कार्याकरीता अनुकुल काळ नसल्यामुळे प्रेमविवाहत अडचणी निर्माण होतील. तथापि मार्च ते ऑक्टोबर दरम्यान योग येईल. विद्याभ्यासात मानसिक असंतुलन घात करेल. वैवाहिक जीवनात काहींना अतिविश्वासाचा फटका बसेल. विनाशकाले विपरित बुध्दी असा अनुभव येईल. म्हणून मन स्थिर ठेवून योग्य निर्णय घ्यावा. त्याकरीता श्रीगुरुची आराधना करावी. श्रीगुरुचरित्र पारायण, श्रीगुरुयंत्राची समंत्र आराधना, श्रीगुरुजनांचा आदर. तेलकट पिवळ्या खाद्यपदार्थाचे योग्य व्यक्तीस दान, वृध्दाश्रम, धर्मादाय संस्थांस यथाशक्ती मदत इत्यादी गोष्टी जास्तीत-जास्त प्रमाणात श्रध्दापूर्वक कराव्यात. कुलदेवतेची तसेच ग्रामदेवतेची उपासना/दर्शन जीवनात सुख निर्माण करतील.

## गुरुमंत्र

सुखी जीवनाचा यशस्वी मार्ग

मोटिवेशनल गुरु श्री.गुरुनाथ बनोटे

हसा डॉक्टर रोग्याला म्हणाले, ऑपरेशनसाठी तुम्हाला दोन तास बेशुध्द व्हावे लागेल. त्यासाठी तुम्हाला काही औषध देऊ की तुमचे होणारे बील पाहायला देऊ.

# चांगला मनुष्य कोण ?

धर्माचा उपदेश देणारे, कार्य-अकार्य, शुभ-अशुभ सांगणारे हे नीतीशास्त्र वाचून जो याला सत्य स्वरुपात जाणतो, तोच श्रेष्ठ मनुष्य होय या नीतीशास्त्रात कर्माची व्याख्या करताना काय केले पाहिजे. काय करावे, काय नाही, काय चांगले, वाईट आहे. इत्यादी ज्ञानाचे वर्णन केले आहे. याचे अध्ययन करुन आपल्या जीवनात आचरणारा मनुष्यच श्रेष्ठ मनुष्य आहे. आचार्य विष्णुगुत यांचे म्हणणे आहे की, ज्ञानी व्यक्ती नीतीशास्त्र वाचून जाणून घेते की, त्याच्यासाठी काय करणे योग्य व काय अयोग्य आहे त्याबरोबरच त्याला कर्माच्या चांगल्या वाईटाविषयीचे सुध्दा ज्ञान होत जाते. कर्तव्याप्रति व्यक्तीने ज्ञानाने मिळविलेली प्राप्त करुन घेतलेली ही दृष्टीच धर्मोपदेशाचा मुख्य परस्पर व्यवहार, संबंध व प्रयोजन आहे. कार्याच्या प्रती व्यक्तींचा धर्मच व्यक्ती धर्म समजला जातो. अर्थात मनुष्य किंवा एखाद्या वस्तुचा गुण आणि स्वभाव म्हणजे जसा अग्नीचा धर्म जाळणे व पाण्याचा धर्म विझवणे आहे. त्याच प्रकारे राजनीती काही कर्म धर्माला अनुकूल असतात. गीतेमध्ये कृष्णाने युध्दाच्या वेळी अर्जुनाला क्षत्रिय धर्म याच अर्थाने सांगितला होता की, रणांगणावर जेव्हा शत्रु समोर येतो तेव्हा युध्द करणे हाच क्षत्रियाचा एकमेव धर्म असतो. युध्दातून पलायन किंवा पाठ फिरवणे डरफोकपणा समजला जातो. याच अर्थाने आचार्य चाणक्य धर्माला ज्ञानसंमत समजतात.

# डाळिंबाचे फायदे

डाळिंबाचा रस मधासोबत खाल्ल्यास पचनक्रिया बळकट होते. मुलांचा खोकला व श्वास फुलणे यावर डाळिंबाच्या झाडाची साल चघळून रस पिल्याने लाभ होतो. या रसात काळी मिरी घातल्यास अति उत्तम.

डाळिंबात असलेली पांढरी जाळी एकत्र करुन जाळावी. व त्याचा डोळ्यात काजळासारखा वापर करावा. यामुळे डोळ्यांचा निस्तेजपणा नष्ट होतो.

डाळिंबाची वाळलेली साल कुटुन, दही मिसळून पेस्ट तयार करुन डोक्याला चोळावी. यामुळे केस मुलायम होतात.

**सुंदर विचार** : जीवनात एकदा ध्येय निर्धारित केल्यानंतर पुन्हा मागे वळून पाहू नका, कारण वळून पाहणारे इतिहास घडवीत नसतात.

# त्वचेचे सौंदर्य खुलवा

आपण सुंदर दिसण्यासाठी अनेक उपाय करतो. त्यापैकी काहींचा इफेक्ट लवकर पडतो तर काहींचा उशीरा. तेलाचा उल्लेख आपण सौंदर्यप्रसाधनांमध्ये क्वचितच करतो. मात्र तेलाचा जर योग्य पध्दतीने वापर केला तर त्वचेचा पोतही सुधारु शकतो. त्यासाठी एक नवी थेरपी आली आहे. ही थेरपी घरच्या घरी करता येणारी आहे. तेलामध्ये आपल्याला भरपूर प्रकार बघायला मिळतात. पण एरंडेल व ऑलिव्ह ऑईलची त्यासाठी निवड उत्तम.

त्वचेच्या प्रकारानुसार एक चमचा एरंडेल तेल आणि ३ चमचे ऑलिव्ह एकत्र करुन (नॉर्मल त्वचा असणाऱ्यांनी ऑलिव्ह आणि एरंडेल तेलाचा प्रत्येकी दोन चमचे करावा.) त्वचेवर हळुवारपणे लावावं व नंतर पाच मिनिटं मसाज करावा. कपड्याचा एक तुकडा गरम पाण्यात बुडवून तो पिळून घ्यावा. म्हणजे कपड्यातील अतिरिक्त पाणी निघून जाईल. आता तो कपडा चेहऱ्यावर पसरावा. एक ते दोन मिनिटांसाठी कपडा चेहऱ्यावर तसाच ठेवावा. कपड्यातील गरम वाफ चेहऱ्याला व्यवस्थित लागते. त्या कपड्याला लागलेलं अतिरिक्त तेल पिळून टाकावं. नंतर चेहऱ्यावरचं तेलही पुसून काढावं. गरज वाटल्यास चेहरा पाण्याने धुवावा. अशा प्रकारे चेहऱ्याचं मॉइश्चरायझर व्यवस्थित टिकून राहण्यास मदत होते. त्वचेतील ओलावा वाढण्यास मदत होते. ब्लॅकहेड्स, छिद्रांमधील घाण आणि चेहऱ्यावरचं अतिरिक्त तेल निघून जातं. कोरड्या त्वचेचं तेलामुळे पोषण होतं. चेहऱ्याला दररोज तेलाने मसाज केल्याने त्वचेचं रक्तभिसरण सुधारतं. त्वचेच्या पेशी बळकट होतात. मृत पेशी काढून टाकता येतात. म्हणून ही थेरपी वापरुन तुम्ही आपल्या त्वचेचे सौंदर्य खुलवा.



# काही रोगांवर उपयुक्त योगासने

असने केल्यामुळे विशिष्ट स्थितीमध्ये आपले शरीर काही वेळ राहते व त्यामुळे संबंधित अवयवांवर ताण पडतो. त्या इंद्रियांकडे रक्तप्रवाह अधिक वाहतो. शुध्द रक्त मिळाल्याने तेथील आजार वा दु:ख हळूहळू कमी होते. परंतु अशक्त, रक्तदाब, हृदयविकार वगैरे तक्रार असल्यास वैद्यकीय सल्ल्यानेच खालील उपाय करावेत.

**अर्धशिशी** - शीर्षासन, सर्वांगासन, पवन मुक्तासन, पित्तप्रकृती असल्यास जलधौती, जलनेती, प्राणायाम, नाकाचे उष:पान.

**डोकेदुखी** - पवन मुक्तासन, हलासन, धनुरासन, शीतली प्राणायाम.

**थकवा** - कोकिळासन, शवासन

**निद्रानाश** -शीतली प्राणायाम, सर्वांगासन, भस्त्रिका प्राणायाम, सकाळी व झोपतेवेळी थंड पाणी डोक्यावर थोपटणे. इत्यादी छोटे छोटे व्यायाम केल्याने आपल्याला घरच्या घरी बरे होता येते.

आमचे स्फुर्तिस्थान.... आदरणीय काका

मृत्यू १४ जुन २०१४ तृतिय स्मृतिदिन

# स्वर्गीय रावजी काळू ठाकरे

संस्थापक-अध्यक्ष :

आर. के. ठाकरे सहकारी पतसंस्था मर्यादित

संस्था स्थापनेपासुन सलग १० वर्षे अध्यक्ष :

शिवकृपा नागरी सहकारी पतसंस्था मर्यादित

## ॲड. दिनेश आर. ठाकरे

Mob. 9323049095

RNI No. MAHMAR/2002/10557 पोस्ट रजि. नं. : THC/133/2015-17

# दिपावलीच्या






कॅप्टन

# आशिष दामले

माजी उपनगराध्यक्ष

नगरसेवक: कुळगांव-बदलापूर नगरपरिषद, कुळगांव

अध्यक्ष, युवाराज प्रतिष्ठान

विशेष कार्यकारी अधिकारी

